॥ श्रीः ॥




# सार्थ तर्कसंग्रह

न्यायबोधिनी व पदकृत्य या टीका आणि त्यांच्या

भाषांतरांसह.



भाषांतरकर्ता

कल्याण श्रीपाद कुलकर्णी,

इचलकरंजी.

---

शनिवार, विजयादशमी शके १८४१.

—०—

ता. ४ आक्टोबर १९१९ इ.

---

किंमत १॥ रुपया.




॥ श्रीः ॥

# सार्थ तर्कसंग्रह

न्यायबोधिनी व पदकृत्य या टीका आणि त्यांच्या

भाषांतरांसह.



भाषांतरकर्ता

कल्याण श्रीपाद कुलकर्णी,

इचलकरंजी.

---

शनिवार, विजयादशमी शके १८४१.

---

ता. ४ आक्टोबर १९१९ इ.

---

किंमत १॥ रुपया.

प्रकाशक
कल्याण श्रीपाद कुलकर्णी
यांनी इचलकरंजी येथें नारोबाच्या कट्ट्याजवळ घर नं. २०४
येथें प्रसिद्ध केलें.
मुद्रक
त्र्यंबक हरी आवटे
पुणें सदाशिव पेठ नं. १८१, यांनी पुणें पेठ सदाशिव नं. १८१
येथील आपल्या " इंदिरा " छापखान्यांत छापिलें.




# अर्पणपत्रिका.

श्रीमंत राजश्री

## नारायणराव बाबासाहेब सरकार

### चीफ ऑफ इचलकरंजी

यांच्या—विद्याभिवृद्धीविषयी असलेली औदार्य-
युक्त सक्रियउत्कंठा, गीर्वाणभाषेविषयींचें
निर्व्याज प्रेम, न्यायप्रियता, प्रजा-
वात्सल्य—इत्यादि सद्गुणसमू
हावर लुब्ध होऊन, सदा-
प्रफुल्लित, अनेक-
विद्वद्जनभ्रमरगुंजारव
मनोहर, व ज्ञानसुगंधयुक्त असें
हें न्यायशास्त्रसरोवरांतील ' सार्थ
तर्कसंग्रह ' कमल, श्रीमंताच्या कर-
कमलीं विनयपूर्वक समर्पण केलें आहे.

श्रीमंतांचा एक अत्यंत नम्र सेवक,

कल्याण श्रीपाद कुलकर्णी

ऊर्फ

अण्णा कुलकर्णी

श्रीलक्ष्मीनरसिंह प्रसन्न.




# प्रस्तावना.

—※—

आम्ही भारतवासी जनांचा धर्म वैदिक आहे आणि त्या धर्माच्या पायावरच सर्व शास्त्रांची इमारत उभारलेली आहे. ह्मणूनच त्या धर्माचें विवेचन वेद, स्मृति, पुराणें, षड्दर्शनें, व वेदांचीं सहा अंगें यांत सविस्तर व सोपपत्तिक केलें आहे. ज्याला त्या धर्माचें यथार्थ ज्ञान व्हावें अशी इच्छा असेल त्याला या सर्व ग्रंथांचा चांगला अभ्यास करावा लागतो. वरील सर्व ग्रंथ संस्कृतभाषेंत आहेत. परंतु अलीकडे अनेक कारणांनीं संस्कृतभाषेचें अध्ययन ब्राह्मणही थोडेंच करितात. हिंदुस्थानांतील लोकही संस्कृताचें जें अध्ययन करितात, तेंही काव्य, नाटक, व फार तर व्याकरण आणि त्यावरील कांहीं टीका यांपर्यंतच असतें. वैदिक किंवा याज्ञिक लोकही वेदांचें सार्थ अध्ययन करीत नाहींत. मग गृहस्थांविषयीं बोलणेंच नको. तथापि हायस्कूल व कॉलेज यांतून संस्कृतभाषा शिकविण्याची पद्धत असल्यानें बऱ्याच सुशिक्षित लोकांस संस्कृताचा परिचय असतो. तथापि त्यांचा तो परिचय अगदींच परिमित असल्यामुळें धर्मज्ञानास आवश्यक असलेल्या वरील ग्रंथांत प्रवेश होण्यास फार अवघड पडतें. धर्माची यथार्थ उपपत्ति समजण्यास षट्शास्त्रांचें अध्ययन अवश्य आहे. न्याय, मीमांसा, सांख्य व योग हीं तीं शास्त्रें होत. न्यायशास्त्रांत तर्कशास्त्राचा व मीमांसेंत उत्तरमीमांसेचा म्हणजे वेदान्तशास्त्राचा अन्तर्भाव होत असल्यामुळें, या त्यांची सहा ही संख्या पूर्ण होते. व्याकरण हें कोणत्याही भाषेचें मुख्य द्वार आहे. यास्तव व्याकरण, न्याय व मीमांसा यांचें अध्ययन केल्यावांचून वैदिक वाङ्मयांत कोणाचाही उत्तम प्रकारें प्रवेश होऊं शकत नाहीं. व्याकरणशास्त्र शब्दांचें सदोषत्व व निर्दोषत्व यांचें ज्ञान करून देतें. न्यायशास्त्र उपपत्ति दाखविते व मीमांसा वाक्यार्थ कसा करावा हें दाखविते. श्रद्धावान् लोकांना धर्माचें ज्ञान जरी विशेष उपपत्तीवांचून होणें शक्य असलें तरी विशेषतः हल्लींच्या चिकित्सक काळीं प्रत्येक धर्मसिद्धान्ताचीही उपपत्ति कळावी अशीच बहुतेक सर्वांची इच्छा असते. त्यामुळे हल्लीं व्याकरणाचें अवश्य तितकेंच ज्ञान असलें तरी पुरें होतें, पण धर्मोपपत्तीसाठीं न्याय व वाक्यार्थासाठीं मीमांसेचें ज्ञान अवश्य असलें पाहिजे. श्रीशंकराचार्यांनीं ही वरील शास्त्राचा योग्य आदर ठेवूनच आपलें विस्तृत भाष्य लिहिलें आहे व त्यामुळेंच तें सर्वमान्य झालें आहे. एवढ्या विवेचनावरूनही धर्मज्ञानाच्या दृष्टीनें न्यायशास्त्राची किती योग्यता आहे, हें सर्वांच्या ध्यानांत येईल. पण, संस्कृत भाषा जितकी कठिण आहे

लक्षांत ठेव, असें म्हणतांच दार उघडलें, व दर्शनही झालें. वरील श्लोक गिरी-च्या ध्यंकोबाला उद्देशून आहे असें वाटतें. कारण ऐश्वर्यसंपन्न तोच देव दिसतो. असो. वरील दोन्ही शास्त्रांचीं हीं मतें ज्यांत प्रतिपादिलीं आहेत असा हा तर्कसंग्रहनांवाचा प्रस्तुत ग्रंथ प्रसिद्ध नैयायिक अन्नंभट्ट नांवाच्या पुरुषानें लिहिला. अन्नंभट्ट हे इ. स. १६०० पासून १७०० पर्यंतच्या कालांत असा-वेत असा विद्वानांचा अंदाज आहे. कांहीं लोक हे कानडी असावेत असें म्हणतात. कांहीं हे तेलंगी ब्राह्मण असावेत असें म्हणतात. यांच्या अजोबाचें नांव राघव असून वडिलांचें नांव तिरुमल्ल होतें. यांचें घराणें ऋग्वेदी, स्मार्त, व सच्छील होतें. अन्नंभट्टाचे वडीलही वेदान्तांत महापंडित होते. अन्नंभट्टांच्या राम-कृष्णभट्ट नावाच्या वडील बंधूनें सिद्धान्तकौमुदीवर 'सिद्धान्तरत्न' म्हणून एक टीका लिहिली आहे अन्नंभट्टांना पुष्कळ मुलें झालीं होतीं, पण सर्वच वारलीं. अशी किंवदन्ती आहे. हे केवळ तर्कशास्त्रांतच पंडित नसून सर्वच शास्त्रांत यांचे ग्रंथ आढळत असल्यानें हे लोकोत्तर बुद्धिवैभवशाली होते याबद्दल कोणाही सूज्ञाचा मतभेद असणें शक्य नाहीं. यांचे व्याकरणशास्त्रावर मिता-क्षरा, मीमांसेवर राणकोज्जीवनी, व जैमिनिसूत्रावर एक सुंदर वृत्तिही आहे. तशीच यांची ब्रह्मसूत्रावरही उत्कृष्ट वृत्ति आहे, आणि न्यायशास्त्रांत तर पुष्कळच ग्रंथ आहेत. हे अध्ययनास काशीस राहिले असावेत असें वाटतें. कारण यांची अपूर्व विद्वत्ता दाखविणारा एक श्लोक म्हणण्यांत येत असतो. तो श्लोक असा आहे ' काशीगमनमात्रेण नान्नंभट्टायते द्विजः। अपि गंगाजलस्नानान्नाधः केशः कुशायते' हा श्लोक वरील म्हणण्यास पुष्टि देत आहे. स्वतः काढिलेल्या पाठशाळेंत स्वकृत तर्कसंग्रह शिकवीत असतां ज्या अड-चणी वाटल्या त्या दूर करण्यासाठीं त्यांनी तर्कसंग्रहावर दीपिका नावाची टीका लिहिली. दीपिकेचें कांही ठिकाणीं गदाधरीशीं साम्य असल्यानें हिला ' बाल-गदाधरी ' असेंही म्हणत असतात. या दीपिकेवर 'नीलकंठी नावाची टीका' नीलकंठ रामभट पाणी गोत्र कौंडिन्य या आंध्र देशांतील विद्वान् पुरुषानें लिहिली. हे नीलकंठ उत्तरवयांत काशीस येऊन राहिले असतां यांच्या समीपच पितृ-सेवातत्पर होऊन राहिलेल्या लक्ष्मीनृसिंह नामक यांच्या मुलानें 'भास्करोदया' नांवाची नीलकंठीची टीका लिहिली. यावरही आणखी एक टिप्पणी आहेच. या सर्वांचें अध्ययन करावयाचें म्हणजे ते एक मोठेंच काम होतें. अगर तर्क-संग्रहाच्या स्वतंत्र टीका वाचावयाच्या म्हटल्यास २०।२५ टीका वाचणें अश-क्यच होतें परंतु यन्यास टीकांपैकीं न्यायबोधिनी व पदकृत्य या टीका प्राथ-मिक विद्यार्थ्यांनाही तर्कसंग्रहाचें मर्म व न्यायघटित परिभाषेचा बराच परिचय करून देतील असें समजून मीं त्याच दोन टीकांचा या पुस्तकांत समावेश केला आहे. न्यायबोधिनी टीका गोवर्धन नांवाच्या पंडितांनी केली आहे, व पदकृत्यटीका चंद्रजसिंह नांवाच्या पंडितानें लिहिलेली आहे. या दोघांविषयीं

फारशी माहिती मिळत नाहीं. ग्रीक लोकांप्रमाणें आपल्याकडे तात्त्विक ग्रंथाचा अगर त्याच्या कर्त्यांचा विश्वसनीय इतिहास असता तर किती उत्तम झालें असतें ! पण तसा विश्वसनीय इतिहास फारसा सांपडत नाहीं तथापि या शास्त्राचा उगम २१ शे वर्षांपासून झाला असावा, असा कांहीं विद्वानांचा अंदाज आहे. मूळसूत्रें होण्यापूर्वीसुद्धां कांहीं तरी या शास्त्राचा विचार झालाच असेल. तेव्हां या शास्त्रांतील लघु पुस्तक असा हा तर्कसंग्रह वाचूं लागल्यास न्यायशास्त्राचें निर्दोष लक्षण करण्याकडे किती लक्ष आहे व निर्दोष अनुमान करण्यासाठीं किती सूक्ष्म विचार केले आहेत वगैरे लक्षांत येतें. युरोपियन ग्रंथकारांनाही निर्दोष लक्षण करण्याची पद्धति मान्य आहे असें दिसतें. आणि वरील कारणांनींच न्यायशास्त्र कठीण झालें आहे त्यामुळें मी जरी टीकाचें सुबोध भाषान्तर करण्याचा शक्य तेवढा यत्न केला आहे, तरी न्यायघटित भाषेचा परिचय होण्यापूर्वी हें भाषान्तरही वाचकांना अवघड वाटेल व या गोष्टीचा प्रत्यय म्हणजे, प्रोफेसर पराजपे यांचें दीपिकेचें भाषान्तर वाचतांना नाटकें व कादंबऱ्यांचें अध्ययन करणारे लोक, ' हें भाषान्तर फार अवघड आहे असें म्हणत असतात ' हा होय परंतु या गोष्टीचें उत्तर एवढेंच कीं, शास्त्रीय ग्रंथाचें भाषान्तर कोणीही केल्यास सामान्य वाचकवर्गाला तें अवघड वाटणारच हें सिद्ध आहे तथापि सुज्ञ वाचकांनीं थोडा प्रयत्न केल्यास हें भाषान्तर मूळ संस्कृत ग्रंथांत प्रवेश होण्यास बरेंच साह्य करील अशी मला आशा आहे.

वैशेषिक व न्याय या दोन दर्शनांत परमाणुवाद व अनुमानप्रामाण्य इत्यादि गोष्टींत जसें साम्य आहे तसेंच कांहीं बाबतींत वैषम्यही आहे जसें वैशेषिक सप्तपदार्थवादी असून नैयायिक षोडशपदार्थवादी आहेत. वैशेषिक प्रत्यक्ष, अनुमान, व शब्द हीं तीनच प्रमाणें मानतात व नैयायिक उपमान हें चौथेंही प्रमाण मानितात. पण तर्कसंग्रह हा ग्रंथ वैशेषिक व न्याय या दोन मताच्या मिश्रणानें केलेला असल्यामुळें त्यांत नैयायिकांच्या चार प्रमाणांचा जसा उल्लेख आहे, तसाच शेवटीं षोडश पदार्थांचाही नाममात्र उल्लेख आहे. यास्तव हा एकच ग्रंथ वाचल्यानें वैशेषिक व न्याय या दोन्ही शास्त्रांचें सामान्यतः पदपदार्थज्ञान होऊन त्यावरील न्यायबोधिनीसारख्या अल्पटीकेचा परिचय करून घेतल्यास वेदान्त वाचण्यासही बरीच मदत होईल सारांश, सदरहू ग्रंथ असा अल्प पण बहुगुणी असल्यामुळें मीं धर्मबंधूंच्या उपयोगासाठीं तो मराठींत आणिला आहे. वस्तुतः असलीं कामें, मोठमोठे विद्वान् व श्रीमान् गृहस्थ या लोकांनीच परस्पराच्या साहाय्यानें केवळ स्वधर्म व स्वभाषा यांविषयींच्या सात्त्विक अभिमानानें करावयास पाहिजेत. वरील दोन्ही बाबतींत असमर्थ असलेल्या माझ्यासारख्या मनुष्याचें हें काम नव्हे तथापि वरील दोन्ही प्रकारचे लोक प्रायः स्वधर्म व स्वभाषा यांविषयीं उदासीन अस-

लेले पाहून आपणच यथामति शास्त्रसेवा करावी असें श्रीलक्ष्मीनरा
प्रेरणेनें मनामध्यें आलें व हें पुस्तक त्या प्रेरणेचेंच मूर्तरूप आहे. माझी
अगदी पहिली कृति असल्यानें हिच्यांत असंख्य दोष असतील हें मी
आहें. तथापि माझे धर्मबंधू हंसक्षीरन्यायानें माझ्या अंशाचा संग्रह करून
अंशांची केवळ उपेक्षाच न करतां माझे दोष मला कळावेत, म्हणून ते कळ
वितील अशी इच्छा धरून व तसें करण्याबद्दल सर्व विद्वानांच्या चरण
प्रार्थना करून ही लांबलेली प्रस्तावना संपवितों.

| | |
|---|---|
| इचलकरंजी.<br>वैशाखशुद्ध १४ मंगळवार<br>( नरसिंहजयंति शके ) १८४१ | सर्व विद्वानांचा नम्र सेवक.<br>कल्याण श्रीपाद उर्फ<br>अण्णा कुलकर्णी. |

—

# या पुस्तकाविषयीं कांहीं विद्वानांचे अभिप्राय.

—*—

रा. रा. कल्याण श्रीपाद उर्फ अण्णा कुलकर्णी, ( इचलकरंजी ) यांनीं लिहिलेलें हें पुस्तक मी समग्र वाचून पाहिलें, त्यांत त्यांनीं मूळ तर्कसंग्रह व त्यावरील न्यायबोधिनी आणि पदकृत्य या प्रसिद्ध टीका यांचें सरळ भाषांतर केलें आहे. भाषांतर मूळाला अगदीं धरून आहे. क्वचित् त्याचा विस्तारही केला आहे. एकंदरीत मूळ व टीका यांचें रहस्य सर्वांना समजून न्यायघटित भाषेचाही महाराष्ट्रियांना परिचय व्हावा, म्हणून या पुस्तकाच्या द्वारां पुष्कळ यत्न केला आहे, यांत संशय नाहीं, याचा हा पहिलाच प्रयत्न असल्यामुळें यांत क्वचित् भाषेसंबंधी वगैरे जरी अगदींच थोडे प्रमाद राहिलेले असण्याचा संभव असला तरी त्यांचा उत्साह वर्णनीय आहे. त्यामुळें त्याना प्रोत्साहन मिळाल्यास त्यांच्या हातून या दिशेनें याहून अधिक कामगिरी खचित होईल अशी खात्री वाटते. म्हणून मी यांच्या या कृतीचें मनापासून अभिनंदन करितों.

पुणें. } विष्णुशास्त्री बापट,
ता. २१।६।१९१९ } संपादक ' आचार्य ' व ' ब्रह्मविद्याग्रंथरत्नमाला '

—

रा. रा. कल्याण श्रीपाद कुलकर्णी वास्तव्य इचलकरंजी यांनी तर्कसंग्रह व त्यावरील न्यायबोधिनी व पदकृत्य अशा दोन टीकांचें मूळ देऊन मराठींत तयार केलेलें भाषांतर मी ठिकठिकाणीं वाचून पाहिलें. दीपिकेचें मराठी भाषांतर झालेलेंच आहे. तर्कसंग्रहावर ज्या दुसऱ्या अनेक टीका आहेत ( ९ टीका असलेली प्रत मद्रासेस छापिली आहे. ) त्यांत न्यायबोधिनी व पदकृत्य या व्याख्या श्रेष्ठ आहेत व संस्कृत पाठशाळांतून त्या शिकविल्याही जातात. गुरुमुख झाल्यावर पुनरपि शास्त्रीय ग्रंथांचें स्वतः परिशीलन करण्याचे वेळीं स्वभाषेंत झालेल्या भाषांतरांचा फार उपयोग होतो हा सर्वांचाच अनुभव आहे. प्रस्तुत भाषांतर एकंदरींत व्यवस्थित व विशद झालें आहे. रा. कल्याणराव हे होतकरू विद्यार्थी असून या तऱ्हेचा हा त्यांचा पहिलाच प्रयत्न आहे. या दृष्टीनें तो चांगला साधला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. मराठी भाषेंत असे ग्रंथ निर्माण होणें अवश्यक आहे व आमची अशी आशा आहे कीं, प्रस्तुत भाषांतरकार आणखीही याच प्रकारचे ग्रंथ निर्माण करून आपली निरपेक्ष सारस्वतसेवा अव्याहत सुरू ठेवितील.

पुणें. } श्रीपाद कृष्ण बेलवलकर,
ता. २४।६।१९१९ } एम्. ए. पीएच्. डी., संस्कृतप्रोफेसर, डेक्कन कॉलेज.

—

रा. रा. कल्याण श्रीपाद कुलकर्णी, यांनी न्यायबोधिनी व पदकृत्य व्याख्या यांसह तर्कसंग्रहाचें केलेलें भाषांतर कांहीं वाचून पाहिलें. पहिला प्रयत्न असूनही तें त्यांना चांगलें साधलें आहे असें म्हणण्यास आनंद वाटतो. संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास देशी भाषांच्या द्वारें होऊं लागण्याचीं सुचिन्हें दिसूं लागलीं आहेत; अशा वेळीं संस्कृत शास्त्रीय ग्रंथांचीं भाषांतरें शिक्षक व विद्यार्थी या दोघांसही अतिशय उपयोगी पडतील. या दृष्टीनें रा. कुलकर्णी यांचा प्रयत्न महत्वाचा व स्तुत्य आहे.

पुणें. ता. १५।१०।१९१९ } पांडुरंग दामोदर गुणे, एम्. ए. पीएच्. डा., संस्कृतप्रोफेसर, फर्ग्युसन कॉलेज.

---

रा. रा. कल्याण श्रीपाद कुलकर्णी, यांनीं केलेल्या तर्कसंग्रह, न्यायबोधिनी व पदकृत्यांच्या भाषांतरांपैकीं कांहीं भाग, विशेषतः व्याप्तीसंबंधाचा, वाचून पाहिला, त्याचप्रमाणें प्रस्तावनाही पाहिली. शास्त्रीय विषय जितका सुगम करणें शक्य आहे तितका करण्याचा रा. कुलकर्णी यांनीं प्रयत्न केला आहे व तो उत्तम साधला आहे असें म्हणतां येईल. गुरुपरंपरेनें शास्त्र शिकणें ज्यांना शक्य नाहीं त्यांच्याकरितां शास्त्रीय पुस्तकांचीं भाषांतरें जितक्या लवकर होतील तितकीं पाहिजेत, कारण जुन्या तऱ्हेचे शास्त्री आतां फारसे राहिले नाहींत; व या दृष्टीनें रा. कुलकर्णी यांची कृति फार अभिनंदनीय आहे व त्यांच्याकडून अशीच महाराष्ट्रवाङ्मयाच्या द्वारें शास्त्रसेवा यापुढेंही होईल व त्यांना चांगला लोकाश्रय मिळेल अशी मला उमेद आहे.

पुणें ता. २५।६।१९१९ } वासुदेव गोपाळ परांजपे, एम्. ए. एल्एल्. बी., संस्कृतप्रोफेसर फर्ग्युसन, कॉलेज.

---

रा. रा. कल्याण श्रीपाद कुलकर्णी यांनीं केलेल्या तर्कसंग्रहाचें न्यायबोधिनी व पदकृत्य व्याख्यासहित केलेल्या मराठी भाषांतरांतील बराचसा भाग वाचून पाहिला. सदर भाषांतर चांगलें झालें असून मराठींतून तर्कसंग्रह शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना त्याचा पुष्कळच उपयोग होईल यांत शंका नाहीं. संस्कृतांतील शास्त्रीय ग्रंथांचें मराठींत भाषांतर होण्याची फार आवश्यकता आहे. कोणताही विषय मातृभाषेंतूनच लवकर व चांगल्या रीतीनें कळतो ही गोष्ट निर्विवाद आहे. तेव्हां अशा तऱ्हेनेंच संस्कृतांतील अन्य ग्रंथांचें भाषांतर करून रा. कुलकर्णी यांनीं मराठींतून शिकणाऱ्या विद्यार्थ्यांना साहाय्य करावें

अशी माझी त्यांना सूचना आहे. सदर भाषांतरांचा कॉलेजमधील न्याय शिकणाऱ्याही विद्यार्थ्यांना बराच उपयोग होईल.

पुणें. ता. २५।९।१९१९ } रघुनाथ दामोदर करमरकर, एम्. ए., संस्कृतप्रोफेसर, न्यू पूना कॉलेज.

---

रा. रा. कल्याण श्रीपाद कुलकर्णी मुक्काम इचलकरंजी यांनीं केलेल्या साथें तर्कसंग्रहाचा बराच भाग वाचून पाहिला. तर्कसंग्रहासारख्या ग्रंथाचें अध्ययन करण्यास प्रथम गुरुमुखाची अवश्यकता आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. थोडेसें गुरुमुख झाल्यानंतर समग्र ग्रंथाचें अध्ययन करण्यास प्रस्तुत भाषांतरापासून फार उपयोग होईल. न्यायबोधिनी ही टीका फार उत्कृष्ट आहे, व भाषांतरकारांनी सुलभ शब्दांनीं ती विशद केली असल्यामुळें समजण्यास अडचण पडणार नाहीं. विकट व अडचणीच्या ठिकाणीं भाषांतर बिनचूक झालें आहे. भाषांतराबरोबर कांहीं ठिकाणीं विषय अधिक विशद व सुलभ करण्याकरितां टीपा दिल्या असत्या तर ग्रंथापासून अधिक फायदा झाला असता. सदर टीपांची उणीव कोणाच्याही लक्ष्यांत आल्यावांचून राहणार नाहीं कदाचित् शेवटीं टीपा देण्याचा भाषांतरकारांचा हेतु असल्यास नकळे. एकंदरीत भाषांतर चांगलें असून तर्कसंग्रहाचें अध्ययन करणारास त्यापासून चांगला उपयोग होईल असा माझा अभिप्राय आहे.

पुणें. ता. २४।६।१९१९ } नारायण सखाराम पानसे, बी. ए., माजी संस्कृतप्रोफेसर, फर्ग्युसन कॉलेज

---

# विपयानुक्रमणिका.

—:०:—

| विषय. | पृष्ठ. |
|---|---|


| विषय. | पृ |
|---|---|

श्रीः

# तर्कसंग्रह




( न्यायबोधिनी व पदकृत्यव्याख्या व त्याचें सरळ भाषांतर यांसह )

निधाय हृदि विश्वेशं विधाय गुरुवन्दनम् ।
बालानां सुखबोधाय क्रियते तर्कसंग्रहः ॥ १ ॥

( त० भा० )–*विश्वेश्वराला हृदयांत धारण करून व गुरूंना नमस्कार करून तर्कशास्त्राचें अध्ययन न केलेल्या विद्यार्थ्यांना त्या शास्त्राचा सुखानें बोध व्हावा म्हणून मी हा तर्कसंग्रहनांवाचा ग्रंथ करीत आहें.*

( न्यायबोधिनी ) अखिलागमसंचारि श्रीकृष्णाख्यं परं महः ।
ध्यात्वा गोवर्धनसुधीस्तनुते न्यायबोधिनीम् ॥ १ ॥

चिकीर्षितस्य ग्रन्थस्य निर्विघ्नपरिसमाप्त्यर्थमिष्टदेवतानमस्कारात्मकं मङ्गलं शिष्यशिक्षार्थं ग्रन्थादौ निबध्नाति—निधायेति ॥ १ ॥

( न्या० भा० )–सर्व वेद-शास्त्रांमध्यें असलेल्या–प्रतिपादिलेल्या श्रीकृष्णनांवाच्या श्रेष्ठ तेजाचें ध्यान करून गोवर्धननांवाचा पंडीत न्यायबोधिनीनांवाचा ग्रंथ लिहीत आहे. चिकीर्षितं–करण्यास इच्छिलेला–ग्रंथ निर्विघ्नपणें समाप्त व्हावा म्हणून आपल्या उपास्य देवतेला नमस्कार करणें, एतद्रूप मंगल करून शिष्यांनींही तसेंच तें करावें, असें त्यांस शिक्षण देण्यासाठीं अन्नंभट्ट ग्रंथाचे आरंभीं तेंच मंगल 'निधाय०' इत्यादि श्लोकानें लिहून ठेवतात ॥ १ ॥

( पदकृत्यं– ) श्रीगणेशं नमस्कृत्य पार्वतीशंकरं परम् ।
मया चन्द्रजसिंहेन क्रियते पदकृत्यकम् ॥ १ ॥
यस्मादिदमहं मन्ये बालानामुपकारकम् ।
तस्माद्धितकरं वाक्यं वक्तव्यं विदुषा सदा ॥ २ ॥

विश्वेशं जगत्कर्तारं श्रीसाम्बमूर्तिं हृदि मनसि निधाय नितरां धारयित्वा गुरुवन्दनं च विधाय करवेस्यर्थः । बालेति । अत्राधीतव्याकरणकाव्यकोशान-धीतन्यायशास्त्रो बालः । व्यासादावतिव्याप्तिवारणायानधीतन्यायेति । स्तनंधयेऽ-

तिप्रसक्तिवारणायाधीतव्याकरणेति । सुखेति । सुखेनानायासेन बोधाय पदार्थ-तत्त्वज्ञानायेत्यर्थः । तर्क्यन्ते प्रमितिविषयीक्रियन्ते इति तर्का द्रव्यादिपदार्था-स्तेषां संग्रहः संक्षेपेणोद्देशलक्षणपरीक्षा यस्मिन् स ग्रन्थः । नाममात्रेण वस्तु-संकीर्तनमुद्देशः । यथा द्रव्यं गुणा इति । असाधारणधर्मो लक्षणम् । यथा गन्धवत्त्वं पृथिव्याः । लक्षितस्य लक्षणं संभवति न वेति विचारः परीक्षा । अत्रोद्देशस्य पक्षज्ञानं फलं लक्षणस्येतरभेदज्ञानं परीक्षाया लक्षणे दोषपरिहार इति मन्तव्यम् ॥

( प० भा० )–श्रीगणपतीला नमस्कार करून व श्रेष्ठ अशा शंकर-पार्वतींनाही वंदन करून मी चंद्रजसिंहनांवाचा ग्रंथकार 'पदकृत्य' नांवाचा ( तर्कसंग्रहावरील टीका ) ग्रंथ लिहितों. ज्याअर्थी हें पदकृत्यक विद्यार्थ्यांना साद्य करणारें–उपकारक होईल असें मला वाटतें त्याअर्थी विद्वानानें नेहमी कल्याणकारक–उपकारक वाक्य बोलावें हें योग्यच आहे. 'विश्वेशं' जगाचा कर्ता व ज्याची मूर्ति अंबेसह–पार्वतीसह आहे अशा विश्वेशाला 'हृदि' आपल्या मनामध्यें 'निधाय' पूर्णपणें धारण करून व 'विधाय गुरुवंद-नम्' गुरूंना वंदन करून 'बालानां' बालकांच्या; ज्यांनी व्याकरण, काव्य, कोश, इत्यादिकांचें अध्ययन केलें आहे, पण न्यायशास्त्राचें अध्ययन केलेलें नाहीं, असें येथील बालशब्दाचें लक्षण आहे. 'ज्यानें व्याकरण-काव्य-कोशाचें अध्ययन केलें आहे तो बाल' एवढेंच बालशब्दाचें लक्षण केल्यास व्यासादिकही तसे अधीत असल्यानें त्यांचेवर या बाललक्षणाची अतिव्याप्ति जाईल ती न जावी म्हणून 'ज्यानें न्यायशास्त्राचें अध्ययन केलें नाहीं' असेंही या लक्षणांत म्हटलें आहे. त्यामुळें व्यासादिकांनीं न्यायशास्त्राचेंही अध्ययन केलेलें असल्यानें त्यांचेवर या लक्षणाची अतिव्याप्ति जाणार नाहीं. आतां 'ज्यानें न्यायशास्त्राचें अध्ययन केलें नाहीं तो बाल' एवढेंच म्हटल्यास मातेचें स्तनपान करणाऱ्या बालावरही हें लक्षण जातें. कारण त्या-नेंही न्यायशास्त्राचें अध्ययन केलेलें नसतें, म्हणून या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'ज्यानें व्याकरणादिकांचें अध्ययन केलें आहे तो बाल' असें म्हटलें आहे. त्यामुळें स्तनपान करणाऱ्या बालांनीं व्याकरणा-दिकांचें अध्ययन केलेलें नसल्यामुळें त्यांचेवर बाललक्षणाची अति-व्याप्ति जात नाहीं. अशा व्युत्पन्न बालांच्या 'सुखबोधाय' म्हणजे

त्यांना आयासावांचून पदार्थांचें तत्त्वज्ञान होण्याकरितां, असा भावार्थ. ' तर्कसंग्रहः-' ज्यांचा तर्क केला जातो, ज्यांना यथार्थज्ञानाचे विषय केलें जातें ते तर्क म्हणजे द्रव्यादि पदार्थ त्यांचा ' संग्रह ' म्हणजे संक्षेपानें उद्देश, लक्षण, परीक्षा ज्या ग्रंथांत केली आहे तो हा तर्कसंग्रहनांवाचा ग्रंथ होय. नुसत्या नांवांनींच वस्तूंचा निर्देश करणें यास उद्देश म्हणतात. जसें–द्रव्य-गुण-कर्म इत्यादि. असाधारण धर्मास ' लक्षण ' असें म्हणतात. जसें गंधवत्त्व हें पृथ्वीचें लक्षण आहे. लक्षित वस्तूचें लक्षण संभवतें किंवा नाहीं या विचाराला ' परीक्षा ' असें म्हणतात. पक्षाचें ज्ञान होणें हें उद्देशाचें फल आहे. लक्ष्याचा इतर पदार्थांपासून भेद–तें इतरांहून निराळें आहे, असें समजणें हे लक्षणाचें फल आहे व लक्षणावर येणाऱ्या दोषांचा परिहार होणें हें परीक्षेचें फल आहे, असें येथें समजावें.

द्रव्यगुणकर्मसामान्यविशेषसमवायाभावाः सप्त पदार्थाः ॥

( त० भा० )–द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष, समवाय व अभाव हे सात पदार्थ आहेत.

( न्या० ) अथ पदार्थान्विभजते—द्रव्येति । तत्र सप्तग्रहणं पदार्थत्वं द्रव्यादिसप्तान्यतमत्वव्याप्यमिति व्याप्तिलाभाय । ननु शक्तिपदार्थस्याष्टमस्य सत्त्वात्कथं सप्तैवेति । तथाहि—वह्निसंयुक्तेन्धनादौ सत्यपि मणिसंयोगे दाहो न जायते । तच्छून्येन तु जायते । अतो मणिसमवधाने शक्तिर्नश्यति । मण्यभावदशायां दाहानुकूला शक्तिरुत्पद्यत इति कल्प्यते । तस्माच्छक्तिरतिरिक्तः पदार्थ इति चेत् । न । मणेः प्रतिबन्धकत्वेन मण्यभावस्य कारणत्वेनैव निर्वाहे मणिसमवधानासमवधानाभ्यामनन्तशक्तितद्ध्वंसतत्प्रागभावकल्पनाया अन्याय्यत्वात् । तस्मात्सप्तैवेति सिद्धम् ॥

(न्या० भा०)–' द्रव्य०-' इत्यादि खंडानें ग्रंथकार अन्नंभट्ट पदार्थांचा विभाग करितात. या वाक्यांत 'सप्तैव' म्ह० सातच, असा जो शब्द आहे तो पदार्थत्व हें द्रव्यादि सातांतील प्रत्येकाचें व्याप्य आहे म्हणजे जेथें जेथें पदार्थत्व असतें तेथें तेथें द्रव्यादिसातांतील कोणती तरी एक वस्तु असते, अशी व्याप्ति मिळावी म्हणून आहे. "अहो पण ' शक्ति-'नांवाचा आठवा पदार्थ असतांना तुम्ही पदार्थ सातच आहेत असें कसें म्हणतां ? इंधन–काष्ठ इत्यादि पदार्थ अग्नीशीं जरी

संयुक्त झाले तरी मणीजवळ असेल तर दाह होत नाहीं; व तो जर जवळ नसेल तर दाह होतो, त्यामुळें मणीजवळ असतांना अग्नीची दाहशक्ति नाहींशी होते व तो नसतांना दाहाला अनुकूल अशी शक्ति उत्पन्न होते, अशी कल्पना करावी लागते. यावरून शक्ति हा वेगळा आठवा पदार्थ मानिला पाहिजे," असें जर म्हणाल तर तसें मानितां येत नाहीं. कारण मणी दाहाला प्रतिबंध करणारा असल्यामुळें त्याचा अभाव हाच दाहाला कारण होतो. ( सर्व ठिकाणीं प्रतिबंधकाचा अभाव कार्यमात्राला कारण होत असतो, असा नियम आहे.) असें मानिल्यानें सर्व व्यवस्था लागत असल्यामुळें मणीजवळ असतांना व तो नसतांना त्यापासून उत्पन्न होणाऱ्या ( दहाला अनुकूल अशा) अनंत शक्ति, त्यांचे ध्वंस व त्यांचे प्रागभाव इत्यादिकांची कल्पना करणें अयोग्य आहे. म्हणून 'पदार्थ सातच' आहेत असें सिद्ध झालें.

तत्र द्रव्याणि पृथिव्यप्तेजोवाय्वाकाशकालदिगात्ममनांसि नवैव ॥

( त० भा० )–पूर्वोक्त सात पदार्थांपैकीं द्रव्य या पहिल्या पदार्थाचे पृथ्वी, जल, तेज, वायु, आकाश, काल, दिशा, आत्मा व मन, असे नऊच भेद आहेत.

( न्या० ) द्रव्याणि विभजते—पृथिवीति ॥ ननु अन्धकारस्य दशमद्रव्यस्य सत्त्वात्कथं नवैवेति । तथाहि—नीलं तमश्चलतीति प्रतीतेर्नीलरूपाश्रयत्वेन क्रियाश्रयत्वेन च द्रव्यत्वं सिद्धम् । न च क्लृप्तद्रव्येष्वन्तर्भावात्कुतो दशमद्रव्यत्वमिति वाच्यम् । आकाशादिचतुष्कस्य वायोश्च नीरूपत्वान्न तेष्वन्तर्भावः । तमसो निर्गन्धत्वान्न पृथिव्यामन्तर्भावः । जलतेजसोः शीतोष्णस्पर्शवत्त्वान्न तयोरन्तर्भावः । तस्मात्तमसो दशमद्रव्यत्वं सिद्धमिति चेत् । न । तेजोभावेनैवोपपत्तावतिरिक्तकल्पनायां मानाभावात् ॥ न च विनिगमनाविरहात्तेज एव तमोभावस्वरूपमस्त्विति वाच्यम् । तेजसोऽभावस्वरूपत्वे सर्वानुभूतोष्णस्पर्शाश्रयद्रव्यान्तरकल्पने गौरवात् । तस्मादुष्णस्पर्शगुणाश्रयतया तेजसो द्रव्यत्वं सिद्धम् ॥ तमसि नीलत्वादिप्रतीतिस्तु भ्रान्तिरेव, दीपापसरणक्रियाया एव तत्र भानात् ॥

( न्या० भा० )–'पृथ्वी०-' या वाक्यानें ग्रंथकार द्रव्यांचा विभाग करितात. "अहो पण अंधकाररूपी दहावें द्रव्य असतांना तुम्ही नऊच द्रव्यें कशीं म्हणतां? कारण 'काळा अंधकार चालतो,' अशी प्रतीति येते. यावरून नीलरूप हा गुण व चालणें ही

क्रिया यांचा तो आश्रय आहे असें ठरतें, व त्यामुळेंच तो द्रव्य आहे असें सिद्ध होतें. ( कारण गुणक्रियाश्रयत्व हेंच द्रव्याचें लक्षण आहे. ) ' बरे पण कल्पना केलेल्या वरील नऊ द्रव्यांमध्येंच त्याचा अंतर्भाव होवो. त्यामुळें त्यास दहावें द्रव्य मानण्याचें कांहीं कारण नाहीं ' असें जर म्हणाल तर तसेंही म्हणतां येणार नाहीं. कारण आकाशादि पांच व वायु अशा सहा द्रव्यांना रूप नसल्यानें त्यांत अंधकाराचा अन्तर्भाव होत नाहीं. तसेंच, अंधकाराला गंध नसल्यानें त्याचा पृथ्वींत अन्तर्भाव होत नाहीं. जल व तेज यांचा अनुक्रमानें शीत व उष्ण स्पर्श असल्यानें त्या दोघांतही अंधकाराचा अन्तर्भाव होत नाहीं. म्हणून अंधकार हें दहावें द्रव्य आहे, असें सिद्ध होतें." असें जर म्हणाल तर तसें म्हणतां येत नाहीं. कारण तेजाचा अभाव म्हणजेच अंधकार असें म्हटलें असतां सर्व व्यवस्था लागते व अंधकार हें वेगळें द्रव्य आहे अशी कल्पना करण्यास कांहीं प्रमाणही नाहीं, त्यामुळें तें वेगळें द्रव्य आहे अशी कल्पना करितां येत नाहीं. आतां ' अंधकार हा तेजाचा अभाव आहे कीं तेज हा अंधकाराचा अभाव आहे, याचा निर्णय करण्यास प्रबळ युक्ति नसल्यानें तेजच अंधकाराच्या अभावरूप असूं दे, ' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण ' तेज अभावरूप आहे ' असें म्हटल्यास सर्वांच्या अनुभवाला येणाऱ्या उष्ण स्पर्शाचा आश्रय म्हणून दुसऱ्या एखाद्या द्रव्याची कल्पना करावी लागेल. पण तसें करण्यात गौरव हा दोष येतो. याकरितां उष्णस्पर्श या गुणाचा आश्रय या रूपानें तेजच द्रव्य आहे, असें सिद्ध होतें. आतां अंधकाराच्या नीलरूपाची किंवा चालण्याची जी प्रतीति येते ती भ्रान्तिच आहे. कारण दीप व.जूला सारणें या क्रियेचेंच अंधकारामध्यें भान होत असतें.

( प० ) तत्रेति । तत्र सप्तपदार्थमध्ये इत्यर्थः । द्रव्याणि नवैवेत्यन्वयः । एवं तत्रेति पदं चतुर्विंशतिर्गुणा इत्यादिनाऽप्यन्वेति । द्रव्यत्वजातिमत्त्वं गुणवत्त्वं समवायिकारणत्वं वा द्रव्यसामान्यलक्षणम् ॥

( प० भा० )–' तत्र-' म्हणजे त्या सात पदार्थांमध्यें. द्रव्यें नऊच आहेत, असा अन्वय करावा. अशाच रीतीनें ' तत्र ' हें पद चोवीस गुण इत्यादिकांशीं जोडतां येतें. द्रव्यत्वजातीनें युक्त असणें,

गुणवान् असणें किंवा समवायिकारण होणें, हें द्रव्याचें सामान्य लक्षण आहे.

रूपरसगन्धस्पर्शसंख्यापरिमाणपृथक्त्वसंयोगविभागपरत्वापरत्वगुरुत्वद्रवत्वस्नेहशब्दबुद्धिसुखदुःखेच्छाद्वेषप्रयत्नधर्माधर्मसंस्काराश्चतुर्विंशतिर्गुणाः । उत्क्षेपणापक्षेपणाकुञ्चनप्रसारणगमनानि पञ्च कर्माणि । परमपरं चेति द्विविधं सामान्यम् ॥

( त० भा० )–रूप, रस, गंध, स्पर्श, संख्या, परिमाण, पृथक्त्व, संयोग, विभाग, परत्व, अपरत्व, गुरुत्व, द्रवत्व, स्नेह, शब्द, बुद्धि, सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्म, अधर्म व संस्कार हे चोवीस गुण आहेत. वर फेकणें, खालीं फेकणें, संकुचित करणें, पसरणें, व गमन हीं पांच कर्मे आहेत. पर व अपर असें दोन प्रकारचें सामान्य आहे.

( प० ) परमपरं चेति । परसामान्यमपरसामान्यमित्यर्थः । परत्वं चाधिकदेशवृत्तित्वम् । अपरत्वं न्यूनदेशवृत्तित्वम् ॥

( प० भा० )–' परमपरं० ' इत्यादि–याचा परसामान्य व अपरसामान्य असा अर्थ आहे. परत्व म्हणजे अधिकदेशीं राहणें व अपरत्व म्हणजे कमी देशीं राहणें.

नित्यद्रव्यवृत्तयो विशेषास्त्वनन्ता एव । समवायस्त्वेक एव । अभावश्चतुर्विधः । प्रागभावः प्रध्वंसाभावोऽत्यन्ताभावोऽन्योन्याभावश्चेति ॥ इत्युद्देशग्रन्थः ॥ तत्र गन्धवती पृथिवी । सा द्विविधा । नित्याऽनित्या च । नित्या परमाणुरूपा । अनित्या कार्यरूपा । पुनस्त्रिविधा शरीरेन्द्रियविषयभेदात् । शरीरमस्मदादीनाम् । इन्द्रियं गन्धग्राहकं घ्राणं नासाग्रवर्ति । विषयो मृत्पाषाणादिः ॥

( त० भा० )–नित्यद्रव्यांमध्यें राहणारे विशेष तर अनंतच आहेत. पण समवाय हा एकच आहे. प्रागभाव, प्रध्वंसाभाव, अत्यंताभाव व अन्योन्याभाव असा चार प्रकारचा अभाव आहे. ( येथें उद्देशग्रंथ संपला. ) आतां वर जीं नऊ द्रव्यें सांगितलीं आहेत त्यापैकीं जी गंधवती असते ती पृथ्वी होय. ती नित्य व अनित्य अशी दोन प्रकारची आहे. ती परमाणुरूपानें नित्य असते व कार्यरूपानें अनित्य असते. पृथ्वीचे शरीर, इंद्रिय व विषय असे आ-

णखी तीन विभाग आहेत. आपल्या सारख्या मनुष्य प्राण्यादिकांचीं जीं शरीरें तीं शरीररूप पृथ्वी, ज्याला गंधाचें ज्ञान होतें तें पार्थिव इंद्रिय, त्यास 'घ्राण' म्हणतात व तें नासिकेच्या अग्रभागीं राहतें. मृत्तिका, पाषाण इत्यादि वस्तूंला पार्थिव विषय म्हणतात.

(न्या०) गन्धवतीति। गन्धवत्त्वं पृथिव्या लक्षणम्। लक्ष्या पृथिवी। पृथिवीत्वं लक्ष्यतावच्छेदकम्। यद्धर्मावच्छिन्नं लक्ष्यं स धर्मो लक्ष्यतावच्छेदकः। यो धर्मो यस्यावच्छेदकः सः तद्धर्मावच्छिन्नः। तथा च लक्ष्यतावच्छेदकं पृथिवीत्वं चेल्लक्ष्यता पृथिवीत्वावच्छिन्ना। गन्धसमानाधिकरणद्रव्यत्वव्याप्यजातिमत्त्वं पृथिव्या लक्षणम्॥ एवं शीतस्पर्शवत्त्वादिलक्षणेषु जलत्वादीनां लक्ष्यतावच्छेदकत्वं बोध्यम्॥

(न्या० भा०,—गंधवत्त्व हें पृथ्वीचें लक्षण आहे. म्हणून पृथ्वी ही लक्ष्या आहे व पृथ्वीत्व हें पृथ्वीवर असणाऱ्या लक्ष्यतेचें अवच्छेदक आहे. ज्या धर्मानें लक्ष्य अवच्छिन्न असतें तो धर्म लक्ष्यतेचा अवच्छेदक असतो व जो धर्म ज्याचा भेदक असतो तो त्या धर्मानें युक्त असतो. म्हणून पृथ्वीत्व हें जर लक्ष्यतेचें अवच्छेदक (भेदक) असलें तर पृथ्वीवर असणारी लक्ष्यता ही पृथ्वीत्वानें युक्त असते. गंध ज्या अधिकरणावर राहतो त्या अधिकरणावर राहणारी व द्रव्यत्व या जातीची व्याप्य जी जाती ती पृथ्वीचें लक्षण होय. ती जाती म्हणजे पृथ्वीत्वच आहे. तेव्हां तीच पृथ्वीचें लक्षण आहे. अशाच रीतीनें जलादिकांचीं जीं शीतस्पर्शवत्वादि लक्षणें त्यांतही जलत्व इत्यादिकच लक्ष्यतावच्छेदक आहेत, असें समजावें.

(प०) तदेव हि लक्षणं यदव्याप्त्यतिव्याप्त्यसंभवरूपदोषत्रयशून्यम्। यथा गोः सास्नादिमत्त्वम्। अव्याप्तिश्च लक्ष्यैकदेशावृत्तित्वम्। अत एव गोर्न कपिलत्वं लक्षणं तस्याव्याप्तिमत्त्वात्। अतिव्याप्तिश्च लक्ष्यवृत्तित्वे सत्यलक्ष्यवृत्तित्वम्। अत एव गोर्न शृङ्गित्वं लक्षणं तस्यातिव्याप्तिमत्त्वात्। असंभवश्च लक्ष्यमात्रावृत्तित्वम्। यथा गोरेकशफवत्त्वं न लक्षणं। तस्यासंभवमत्त्वात्। नित्येति। ध्वंसभिन्नत्वे सति ध्वंसाप्रतियोगित्वं नित्यत्वम्। ध्वंसेऽतिव्याप्तिवारणाय ध्वंसभिन्नेति विशेषणम्। घटादावतिव्याप्तिवारणाय विशेष्यदलम्। ध्वंसप्रतियोगित्वं प्रागभावप्रतियोगित्वं वाऽनित्यत्वम्। यच्चेष्टायतनं तदेव शरीरं चेष्टाश्रयो वा। इन्द्रियमिति। चक्षुरादावतिव्याप्तिवारणाय गन्धग्राहकमिति।

---

१ 'गंधवत्त्व' येथें विशिष्टाहून केलेला 'त्व'-प्रत्यय विशेषण जो गंध त्याचें ज्ञान करून देतो. गंधवत् म्ह० गंधविशिष्ट—गंधयुक्त.

कालादावतिप्रसक्तिवारणायेन्द्रियावितिं । विषय इति । शरीरेन्द्रियभिन्नत्वे सत्युपभोगसाधनं विषयः । शरीरादावतिव्याप्तिनिरासाय सत्यन्तम् । परमाण्वादावतिव्याप्तिवारणाय विशेष्यदलम् । कालादिवारणाय जन्यत्वे सतीत्यपि बोध्यम्॥

(प० भा० )-तेंच लक्षण होय कीं जें अव्याप्ति, अतिव्याप्ति व असंभव या तीन दोषांनीं रहित असतें. जसें गाईचें सास्नादिमत्व हें लक्षण आहे. कारण तें वरील तीन्ही दोषांनीं रहित आहे. अव्याप्ति म्हणजे लक्षणानें लक्ष्याच्या एका देशावर न राहणें. म्हणूनच ' कपिलत्व ' हें गाईचें लक्षण होत नाहीं, कारण पांढरी गाय हा जो ' लक्ष्याचा एकदेश ' त्यावर तें राहत नसल्यानें त्याच्यावर अव्याप्ति हा दोष येतो. म्हणून तें लक्षण निर्दोष होऊं शकत नाहीं. लक्षणानें लक्ष्यावर राहून, जें लक्ष्य नव्हे त्याच्यावरही राहणें यास अतिव्याप्ति म्हणतात. म्हणूनच ' शिंगें असणें ' हें गाईचें लक्षण होत नाहीं. कारण तें लक्ष्य जी गाय तिच्यामध्यें राहून शिवाय लक्ष्य नसलेल्या म्हशीमध्यें, बकरीमध्यें वगैरेही दिसतें. म्हणून ' शृंगित्व ' हें गाईचें अतिव्याप्त लक्षण आहे. लक्षणानें लक्ष्यामध्यें कोठेंच नसणें हा असंभव दोष होय. जसें-गाईचें ' एकशफत्व ' म्ह० एक खूर असणें, हें लक्षण असंभव दोषानें दूषित आहे. कारण तें लक्ष्य जी गोजाति तिच्यामध्यें कोठेंही राहत नाहीं. म्हणून तेंही निर्दोष लक्षण नव्हे. (' नित्या० ' इत्यादि-) जें ध्वंसाहून वेगळें असून ध्वंसाचें प्रतियोगी होत नाहीं. त्यास ' नित्य ' म्हणतात, पण 'जें ध्वंसाचें अप्रतियोगी तें नित्य' इतकेंच नित्यत्वाचें लक्षण केल्यास त्याची ध्वंसावर अतिव्याप्ति जाते. कारण स्वतः ध्वंसही ध्वंसाचा अप्रतियोगी आहे. ( ज्याचा अभाव होतो तोच त्या अभावाचा प्रतियोगी असतो. जसा घटाचा अभाव होतो म्हणून घटच त्या घटाभावाचा प्रतियोगी आहे.) पण ध्वंस स्वतः अभावरूप असल्यानें त्याचा पुन्हा अभाव होत नाहीं. त्यामुळें ध्वंस ध्वंसाभावाचा प्रतियोगी नाहीं, तर अप्रतियोगी आहे. म्हणून 'ध्वंसाप्रतियोगित्वं नित्यत्वं ' इतकेंच नित्यत्वाचें लक्षण केल्यास त्याची ध्वंसावर वरीलप्रमाणें अतिव्याप्ति जाते. तिचें निवारण करण्यासाठीं नित्यत्वाच्या लक्षणांत ' ध्वंसाहून वेगळें असून ' असें विशेषण घालावें. म्हणजे ध्वंस ध्वंसाहून भिन्न नसल्यानें त्यावर

लक्षण जात नाहीं. आतां 'जें ध्वंसाहून भिन्न तें नित्य' एवढेंच लक्षण केल्यास घटादि वस्तुही ध्वंसाहून भिन्न असल्यानें त्यांच्यावर नित्यत्वाच्या लक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी म्हणून 'ध्वंसाप्रतियोगित्वं' हें विशेष्य लक्षणांत घातलें आहे. घट-पटादि हे ध्वंसाचे *प्रतियोगी आहेत. अप्रतियोगी नाहींत.* कारण त्यांचा नाश—अभाव संभवतो. म्हणून त्या नाशाचे ( ध्वंसाचे ) ते प्रतियोगी आहेत. यास्तव नित्यत्वाच्या लक्षणांत 'ध्वंसभिन्न असून' हें विशेषण व 'ध्वंसाप्रतियोगी' हें विशेष्य या दोघांची आवश्यकता आहे.

( आतां अनित्यत्वाचें लक्षण—) 'जें ध्वंसाचें प्रतियोगी तें अनित्य' किंवा 'जें प्रागभावाचें प्रतियोगी तें अनित्य' असें अनित्याचें लक्षण समजावें. ( तसेंच शरीराचें लक्षण—) जें सुखदुःखादिभोगांचें स्थान तें शरीर किंवा जो चेष्टेचा ( हालचालीचा ) आश्रय तें शरीर.

अन्नंभट्टांनीं 'गंधग्राहकं इंद्रियं' असें पार्थिव इंद्रियाचें लक्षण केलें आहे. पण 'नुस्तें जें इंद्रिय तें पार्थिव इंद्रिय—घ्राण,' असें त्याचें लक्षण केलें असतें तर चक्षुः, श्रोत्र इत्यादि दुसरींही इंद्रियें असल्यानें त्यांच्यावर घ्राणलक्षणाची अतिव्याप्ति गेली असती. ती जाऊं नये म्हणून 'गंधग्राहक' असें म्हटलें आहे. चक्षुरादि इतर इंद्रियें गंधग्राहक—गंधाचें ग्रहण करणारीं नाहींत, त्यामुळें घ्राणलक्षणाची त्यांचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. बरें 'जें गंधाचें ग्रहण करितें तें घ्राण' एवढेंच घ्राणाचें लक्षण केल्यास कालिकसंबंधानें काल सर्व कार्यांचें कारण असल्यानें तो गंधालाही ग्रहण करणारा आहेच. यास्तव त्याच्यावर जाणाऱ्या घ्राणलक्षणाच्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'इंद्रिय' हें पदही लक्षणांत अवश्य पाहिजे. तें घातल्यानें काल हें इंद्रिय नसल्यामुळें त्याच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं.(विषयाचें लक्षण—) 'शरीर व इंद्रिय यांहून भिन्न असून जें उपभोगाचें साधन तो विषय होय.' उपभोगाच्या साधनासच विषय म्हटल्यास शरीर व इंद्रियेंही सुखादिकांच्या उपभोगाचें साधन असल्यानें विषयाचें लक्षण शरीरेंद्रियांत अतिव्याप्त होतें. म्हणून 'शरीर व इंद्रियें यांहून भिन्न असून'

व कार्यरूपानें अनित्य असतें. फिरून तें तेज तीन प्रकारचें आहे. शरीर, इंद्रिय, व विषय असे ते तीन प्रकार होत. तैजसशरीर सूर्यलोकांत प्रसिद्ध आहे. रूपाचें ग्रहण करणारें जें चक्षु तें तैजस इंद्रिय होय. तें आपल्या डोळ्यांत जी काळी बाहुली दिसते तिच्या अग्रभागीं राहतें. तैजस विषय चार प्रकारचा आहे. भौम, दिव्य, उदर्य, व आकरज. भौम म्हणजे भूमीवरील अग्नि वगैरे. पाणी हें ज्याचें इंधन आहे असें विद्युत् वगैरे हें 'दिव्य–तेज' आहे. खाल्लेलें अन्न ज्याच्या योगानें पचतें त्या उदरांतील तेजाला 'उदर्य' असें म्हणतात आणि खाणींत सांपडणाऱ्या सुवर्णादिकाला 'आकरज तेजोविषय' असें म्हणतात.

(प०) उष्णेति । जलादावतिव्याप्तिनिरासायोष्णेति । कालादावतिप्रसङ्गवारणाय समवायसंबन्धेनेति पदं देयम् । इन्द्रियमिति । घ्राणादावतिव्याप्तिवारणाय रूपग्राहकमिति । कालादावतिव्याप्तिनिरसनायेन्द्रियमिति । भौमादिपदं प्रत्येकमभिसंबध्यते । भौममिति । आदिपदेन खद्योतगततेजःप्रभृतेः परिग्रहः । विद्युदादीति । आदिनार्कचन्द्रादीनां परिग्रहः । भुक्तेति । भुक्तस्याहारादेः पीतस्य जलस्य परिणामो जरणं तस्य हेतुरुदर्यमित्यर्थः । सुवर्णेति । आदिना रजतादिपरिग्रहः ।

(प० भा०)–'जें स्पर्शवान् असतें तें तेज' असें म्हटल्यास जलही शीतस्पर्शवान् असल्यानें त्याचेवर तेजाच्या लक्षणाची अतिव्याप्ति जाईल. ती न जावी म्हणून 'उष्ण' असें पद घातलें आहे. त्यामुळें जलाचा स्पर्श थंड असल्यानें, त्याचेवर लक्षणाची अतिव्याप्ति होत नाहीं. कालिकसंबंधानें कालही उष्णस्पर्शवान् असल्यानें कालादिकांमध्यें अतिव्याप्ति होऊं नये म्हणून 'जें समवायसंबंधानें उष्णस्पर्शवत् तें तेज' असें लक्षण करावें म्हणजे कालादिकांतील कोणीही समवायसंबंधानें उष्णस्पर्शवान् नसल्यानें त्यांत अतिव्याप्ति होत नाहीं. 'जें इंद्रिय तें चक्षु' असें तैजस इंद्रियाचें लक्षण केल्यास घ्राणादिकहि इंद्रियें असल्यानें त्यांच्यावर या लक्षणाची अतिव्याप्ति जाते, ती न जावी म्हणून 'रूपग्राहक' असें विशेषण दिलें आहे. घ्राणेंद्रियादि इतर इंद्रियें रूपाचें ग्रहण करणारीं नसल्यानें त्यांवर अतिव्याप्ति जात नाहीं. तसेंच, कालादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'इंद्रिय' असें पद घातलें आहे. त्यामुळें काल

जरी कालिकसंबंधानें रूपग्राहक असला तरी तो इंद्रिय नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. 'आकरजभेदात्' येथील 'भेदात्' हें पद भौमादि प्रत्येकाशीं संबद्ध होतें. जसें—भौमभेदानें, दिव्यभेदानें, इत्यादि. विषयरूप तेज चार प्रकारचें आहे. 'वह्न्यादि' येथील आदिपदानें खद्योतांत असणाऱ्या तेजादिकांचेंही ग्रहण करावें. 'विद्युदादि' येथील आदिपदानें सूर्य-चंद्रादिकांचें ग्रहण करावें. खाल्लेल्या अन्नादिकाचा व प्यालेल्या पाण्याचा परिणाम हीच जीर्णता, तिचा हेतु उदर्य तेज आहे. 'सुवर्णादि' येथील आदिपदानें रुपें इत्यादिकांचें ग्रहण करावें.

> रूपरहितः स्पर्शवान्वायुः। स द्विविधः। नित्योऽनित्यश्च। नित्यः परमाणुरूपः। अनित्यः कार्यरूपः। पुनस्त्रिविधः शरीरेन्द्रियविषयभेदात्। शरीरं वायुलोके। इन्द्रियं स्पर्शग्राहकं त्वक् सर्वशरीरवर्ति। विषयो वृक्षादिकम्पनहेतुः। शरीरान्तःसंचारी वायुः प्राणः। स चैकोऽप्युपाधिभेदात्प्राणापानादिसंज्ञां लभते॥

(त० भा०)—जो रूपरहित असून स्पर्शवान् असतो तो वायु होय. तो नित्य व अनित्य असा दोन प्रकारचा आहे. तो परमाणुरूपानें नित्य व कार्यरूपानें अनित्य आहे. वायूचे आणखी शरीर, इंद्रिय व विषय असे तीन भेद आहेत. वाय्वात्मक शरीर वायुलोकीं असतें. ज्याच्यायोगानें स्पर्शाचें ज्ञान होतें तें वायवीय इंद्रिय होय. त्याला 'त्वक्' असें म्हणतात. हें त्वगिंद्रिय सर्व शरीराला व्यापून राहतें. झाडें वगैरे हलण्याला जो वायु कारण होतो तो वायूचा विषय होय. शरीराच्या आंत संचार करणाऱ्या वायूला 'प्राण' म्हणतात. तो जरी एकच आहे तरी भिन्न भिन्न उपाधीमुळें त्याला प्राण, अपान, इत्यादि संज्ञा प्राप्त होतात.

(न्या०) एवं पृथिव्यादित्रिकं निरूप्य वायुं निरूपयति—रूपरहित इति। रूपरहितत्वे सति स्पर्शवत्त्वं वायोर्लक्षणम्। सतिसप्तम्या विशिष्टार्थकतया रूपरहितत्वविशिष्टस्पर्शवत्त्वं वायोर्लक्षणम्। विशेषणांशानुपादाने स्पर्शवत्त्वमात्रस्य लक्षणत्वे पृथिव्यादित्रिकेऽतिव्याप्तिः। तद्वारणाय विशेषणोपादानम्। तावन्मात्रोपादाने आकाशादावतिव्याप्तिः। तद्वारणाय विशेष्योपादानम्। अतिव्याप्तिर्नाम अलक्ष्ये लक्षणसत्त्वम्। यथा गोः शृङ्गित्वं लक्षणं कृतं चेल्लक्ष्य-

भूतगोभिन्नमहिष्यादावतिव्याप्तिस्तत्रापि शृङ्गित्वस्य विद्यमानत्वात् । अव्याप्तिर्नाम लक्ष्यैकदेशावृत्तित्वम् । लक्ष्यैकदेशे लक्ष्यतावच्छेदकाश्रयीभूतकस्मिंश्चिल्लक्ष्ये लक्षणासत्त्वमव्याप्तिरित्यर्थः । यथा गोर्नीलरूपवत्त्वं लक्षणं कृतं चेल्लक्ष्यतावच्छेदकाश्रयीभूतश्वेतगवि अव्याप्तिस्तत्र नीलरूपाभावात् । असंभवो नाम लक्ष्यमात्रे कुत्रापि लक्षणासत्त्वम् । यथा गोरेकशफवत्त्वम् । गोसामान्यस्य द्विशफवत्त्वेन एकशफवत्त्वस्य कुत्राप्यसत्त्वात् । अतिव्याप्त्यव्याप्त्यसंभवानां निष्कृष्टलक्षणानि---लक्ष्यतावच्छेदकावच्छिन्नप्रतियोगिताकभेदसामानाधिकरण्यमतिव्याप्तिः । अव्याप्तिस्तु लक्ष्यतावच्छेदकसमानाधिकरणात्यन्ताभावप्रतियोगित्वम् । असंभवस्तु लक्ष्यतावच्छेदकव्यापकीभूताभावप्रतियोगित्वम् ॥

( न्या० भा० )--अशारीतीनें पृथ्वी, जल व तेज या तिघांचें निरूपण करून ' रूपरहित० ' इत्यादि ग्रंथानें वायूचें निरूपण करितात. ' रूपरहितत्व असून स्पर्शवत्त्व ' हें वायूचें लक्षण आहे. येथील ' सति- ' सप्तमीचा ' विशिष्ट ' असा अर्थ असल्यामुळें ' रूपरहितत्वानें विशिष्ट जें स्पर्शवत्त्व ' तें वायूचें लक्षण होतें. येथें ' रूपरहितत्व ' या विशेषणांशाचें ग्रहण न करितां नुसतें ' स्पर्शवत्त्व ' एवढेंच जर लक्षण केलें असतें तर पृथ्वी, जल व तेज या तिघांच्या ठिकाणी त्याची अतिव्याप्ति झाली असती. त्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं वरील विशेषणाचें ग्रहण केलें आहे. पृथ्वी इत्यादि तिघांमध्यें रूपरहितत्व नसल्यामुळें आतां अतिव्याप्ति होत नाहीं. वरें ' जो रूपरहित असतो तो वायु असें वायूचें ' लक्षण केल्यास आकाशादि पांच द्रव्यांवरही ' रूप ' हा गुण नसल्यानें त्यांवर वायूचें लक्षण जाऊं लागेल. म्हणजे त्याची अतिव्याप्ति होईल. ती न व्हावी म्हणून लक्षणांतील ' स्पर्शवत्त्व ' या विशेष्याचें ग्रहण केलें पाहिजे. स्पर्श हा गुण आकाशादिकांवर राहत नसल्यानें आतां त्यांचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. जें लक्ष्य नव्हे. त्याच्यावर लक्षणानें असणें यास अतिव्याप्ति म्हणतात. जसें ' शिंग असणें ' हें जर गाईचें लक्षण केलें तर लक्ष्य जी गाय तिच्याहून वेगळ्या--म्हैस इत्यादि प्राण्यांमध्यें ' शिंग असणें ' हें गाईचें लक्षण दिसत असल्यामुळें त्या लक्षणावर अतिव्याप्ति हा दोष येतो. अव्याप्ति म्हणजे लक्ष्याच्या एकाभागावर लक्षणानें नसणें. लक्ष्याच्या एकदेशीं--म्हणजे लक्ष्यतावच्छेदकाचा आश्रय अशा एखाद्या लक्ष्यावर--लक्षणानें नसणें हीच अव्याप्ति होय.

असा भावार्थ. जसें गाईचें ' नीलरूपवत्त्व ' (काळेपणा) हें लक्षण केल्यास लक्ष्यतावच्छेदक जें गोत्व त्याला आश्रय असणारी जी पांढरी गाय तिच्यामध्यें नीलरूपाचा अभाव असल्यानें ' नीलरूपत्व ' या लक्षणाची अव्याप्ति होते. असंभव म्हणजे जेवढें म्हणून लक्ष्य आहे तेवढया सर्व लक्ष्यामध्यें लक्षण कोठेंच नसणें. जसें–' एकशफत्व ' म्हणजे एकच खुर असणें, हें गाईचें लक्षण केल्यास लक्ष्य जी गायजात ( गोत्व ) त्या सर्व गोजातींत तें लक्षण नसल्यानें या लक्षणावर असंभव हा दोष येतो. कारण गाय या जातीला दोन खुर असतात एक खुर एकाही गाईला नसतो. गाढव, घोडा यांना एकेक खुर असतो. आतां अतिव्याप्ति, अव्याप्ति व असंभव, यांचीं अगदीं सारांशरूप लक्षणें अशीं आहेत. जें लक्ष्यतावच्छेदकानें अवच्छिन्न असतें त्यावर ज्याची प्रतियोगिता आहे असा भेद ज्या ठिकाणीं राहतो त्या ठिकाणींच लक्षणानें राहणें ही अतिव्याप्ति होय. कित्येक पुस्तकांत ' लक्ष्यतावच्छेदक ज्या ठिकाणीं राहतें त्या ठिकाणीं राहून ' असें अधिक आहे. ( लक्ष्यतावच्छेदक गोत्व, त्यानें अवच्छिन्न गाय ही व्यक्ति, तिच्यावर ज्याची प्रतियोगिता आहे असा जो म्हशीचा वगैरे भेद तो म्हैस, बकरी इत्यादि ठिकाणीं राहतो, आणि तेंच ' शृंगित्व ' इत्यादि लक्षणाचें स्थान आहे. म्हणून शृंगित्व हें अतिव्याप्त लक्षण आहे. ) म्हणजे जें लक्षण लक्ष्यावर असून शिवाय अलक्ष्यावरही असतें तें अतिव्याप्त लक्षण होय. लक्ष्यतावच्छेदक ज्या अधिकरणावर राहतें तेथें राहणारा जो अत्यन्ताभाव त्याचें प्रतियोगित्व हीच अव्याप्ति आहे. ( गोत्व हें लक्ष्यतावच्छेदक पांढऱ्या गाईवरही राहतें, पण त्या पांढऱ्या गाईचे ठिकाणीं असणारा जो 'नीलरूपत्व' या लक्षणाचा अत्यन्ताभाव त्याचें नीलरूप प्रतियोगी आहे. यास्तव नीलरूपानें श्वेतगाईवरील अत्यन्ताभावाचें प्रतियोगी होणें हीच ' नीलरूपत्व ' या गाईच्या लक्षणाची अव्याप्ति आहे. ) तसेंच, लक्ष्यतावच्छेदकाला व्यापून राहणारा जो अभाव त्याचें प्रतियोगित्व हाच असंभव दोष होय. ( लक्ष्यतावच्छेदक गोत्वाला व्यापणारा जो एकशफत्वाभाव म० एक खुर असणें, त्याचा अभाव, त्याचें प्रतियोगित्व एकशफत्वाला आहे, म्हणून तोच असंभव होय. जेथें जेथें

गोत्व आहे तेथें तेथें एकशफत्वाभाव आहेच, हेंच त्यानें लक्ष्यतावच्छेदकाला व्यापणें होय. )

(प० )–रूपेति । घटादिवारणाय विशेषणम् । आकाशादिवारणाय विशेष्यम् । इन्द्रियमिति । चक्षुरादिवारणाय स्पर्शग्राहकमिति । कालादावतिव्याप्तिवारणायेन्द्रियमिति । वृक्षेति, आदिपदेन जलादिपरिग्रहः । शरीरान्तरिति । महावाय्वादावतिव्याप्तिवारणाय विशेषणम् । मनआदिवारणाय विशेष्यम् । धनंजयवारणाय संचारीति । उपाधीति । मुखनासिकाभ्यां निर्गमनप्रवेशनात्प्राणः । जलादेरधोनयनादपानः । भुक्तपरिणामाय जाठरानलस्य समुन्नयनात्समानः । अन्नादेरूर्ध्वनयनादुदानः । नाडीमुखेषु वितननाद्व्यान इति क्रियारूपोपाधिभेदात्तथा व्यवह्रियत इत्यर्थः ॥

( पं० भा० ) ' जो स्पर्शवान् असतो तो वायु ' असें म्हटल्यास घटादिवस्तुहि स्पर्शवान् असल्यानें वायूचें लक्षण त्यावर जातें. तें न जावें म्हणून ' रूपरहित ' हें विशेषण घातलें आहे. त्यामुळें घटादिवस्तूंना रूप असल्यानें त्यांवर हें लक्षण जात नाहीं ' रूपरहित ' एवढेंच लक्षण केल्यास आकाशादि द्रव्येंही ' रूपरहित ' असल्यानें त्यांच्यावर वायूचें लक्षण जातें. यासाठीं ' स्पर्शवान् ' हें विशेषण घातलें आहे. आकाशादि द्रव्यांना स्पर्शवत्त्व नाहीं. त्यामुळें त्यांच्यावर या वायूच्या लक्षणाची अतिव्याप्ति होत नाहीं. ' जें इंद्रिय असतें तें वायवीय त्वगिंद्रिय ' असें म्हटल्यास ' चक्षु ' इत्यादिकही इंद्रियेंच असल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जाईल. ती न जावी म्हणून ' स्पर्शाचें ग्रहण करणारें ' असें म्हटलें आहे. चक्षुरादिक इंद्रियें स्पर्शाचें ग्रहण करणारीं नसल्यामुळें त्यांचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. तसेंच जें स्पर्शाचें ग्रहण करणारें तें ' त्वक् ' असें म्हटल्यास कालिकसंबंधानें कालसुद्धां स्पर्शग्राहक असल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जाते. ती न जावी म्हणून ' इंद्रिय ' असें म्हटलें आहे. ' काल ' इंद्रिय नसल्यानें त्यावर आतां अतिव्याप्ति जात नाहीं. ' वृक्षादि ' येथील आदिपदानें जलादिक घ्यावेत. ' जो वायु तो प्राण ' असें म्हटल्यास महावायुही वायुच असल्यानें त्याचेवर प्राणलक्षणाची अतिव्याप्ति होईल. ती न व्हावी म्हणून ' शरीराच्या आंत संचार करणारा ' असें वायूला विशेषण दिलें आहे पण ' जो शरीराच्या आंत संचार करणारा तो प्राण ' असें म्हटल्यास ' मन '

इत्यादिकही शरीरान्तःसंचारी असल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जाते. ती न जावी म्हणून 'वायु' असें विशेष्य प्राणलक्षणांत घातलें आहे. 'शरीराच्या आंत असणाऱ्या वायूस प्राण' असें म्हटल्यास 'धनंजय-'नावाचा वायुही शरीराच्या आंत असल्यानें त्यावर प्राणलक्षणाची अतिव्याप्ति जाईल. म्हणून ' संचारी ' हें पद घातलें आहे. म्हणजे धनंजय वायु संचार करणारा नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति होत नाहीं. (' शरीरान्तःसंचारी वायु उपाधि-भेदामुळें प्राणादिसंज्ञांस प्राप्त होतो असें मुळांत म्हटलें आहे. त्या उपाधिभेदांचेंच स्पष्टीकरण–) मुख व नासिक यांच्या द्वारा बाहेर येणें व आंत जाणें हा व्यापार करीत असल्यामुळें त्या वायूस प्राण म्हणतात. जलादिकांना खालीं नेत असल्यामुळें त्याला अपान म्हणतात. खाल्लेल्या अन्नादिकांचें पचन करण्यासाठीं पोटांतील अग्नीस चागल्याप्रकारें नेत प्रदीप्त करीत असल्यामुळें त्यालाच समान म्हणतात. अन्नादिकाना वर नेत असल्यामुळें त्याला उदान म्हणतात. नाड्यांच्या तोंडातून विस्तार पावत असल्यामुळें त्यालाच व्यान म्हणतात. अशा क्रियारूपी उपाधींच्या भेदामुळें एका वायूचा पाच नांवानीं व्यवहार केला जातो.

शब्दगुणकमाकाशम् । तच्चैकं विभु नित्य च ॥

( त०भा० )–ज्याचा शब्द हा गुण आहे, त्यास आकाश म्हणतात. तें एक, विभु व नित्य आहे.

( न्या० ) आकाशं लक्षयति–शब्दगुणकमिति । गुणपदमाकाशे शब्द एव विशेषगुण इति द्योतनाय न त्वतिव्याप्तिवारणाय, समवायेन शब्दवत्त्वमात्रस्य सम्यक्त्वात् । तच्चैकमिति । अनेकत्वे मानाभावादिति भावः । विभ्विति । सर्वमूर्तद्रव्यसंयोगित्वं विभुत्वम् । मूर्तत्व च क्रियावत्त्वम् । पृथिव्यप्तेजोवायुमनांसि मूर्तानि । पृथिव्यप्तेजोवाय्वाकाशेतिपञ्चक भूतपदवाच्यम् । भूतत्वं नाम बहिरिन्द्रियग्राह्यविशेषगुणवत्त्वम् ॥

( न्या०भा० )–' शब्दगुणकं० ' इत्यादि ग्रंथानें अन्नंभट्ट आकाशाचें लक्षण करितात. लक्षणांतील ' गुण ' हें पद आकाशांत शब्द हाच विशेष गुण आहे असें दाखविण्यासाठीं घातलें आहे. एखाद्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं तें पद घातलेलें नाहीं. कारण ' समवायसंबंधानें शब्दवत्त्व ' एवढेंच आकाशाचें उत्तम लक्षण आहे. त्यांत गुणपदाचें कांहीं विशेष कारण नाहीं.

आकाशें पुष्कळ आहेत असें मानण्यास कांहीं प्रमाण नाहीं. म्हणून तें एक आहे असें जें म्हटलें तें योग्यच आहे. ज्याचा सर्व मूर्तद्रव्यांशीं संयोग झालेला असतो त्यास विभु म्हणतात व क्रियावान् पदार्थाला मूर्त म्हणतात. पृथ्वी, जल, तेज, वायु आणि मन हीं मूर्त द्रव्यें आहेत. पृथ्वी, जल, तेज, वायु, व आकाश या पांचांना 'भूतें' असें म्हणतात. ('भूत' हें पद वाचक व पांचभूतें हें त्याचें वाच्य आहे.) ज्यांचा विशेषगुण बाह्य इंद्रियांनीं ग्राह्य असतो त्यांना 'भूत' असें म्हणतात.

(प०) शब्देति। शब्दो गुणो यस्य तत्तथा। असंभववारणाय शब्दगुणो-भयम्। विभ्विति। सर्वमूर्तद्रव्यसंयोगित्वम्।

(प० भा०)—ज्याचा शब्द हा गुण आहे तें शब्दगुणक होय. असंभवदोषाचें निवारण करण्यासाठीं लक्षणांत 'शब्द व गुण' अशीं दोन्ही पदें घेतलीं आहेत. कारण नुसता शब्द हें आकाशाचें लक्षण संभवत नाहीं व नुसता 'गुण' हेंही आकाशाचें लक्षण संभवत नाहीं. ज्याचा सर्वमूर्तद्रव्याशीं संयोग झालेला असतो त्यास विभु असें म्हणतात.

अतीतादिव्यवहारहेतुः कालः स चैको विभुर्नित्यश्च ॥

(त० भा०)—भूत, वर्तमान, इत्यादि प्रकारच्या व्यवहाराला जो कारण होतो तो काल होय. तो एक, विभु व नित्य आहे.

(न्या०) कालं लक्षयति–अतीतेति। व्यवहारहेतुत्वस्य लक्षणत्वे घट इति व्यवहारहेतुभूतघटादावतिव्याप्तिः। तद्वारणाय अतीतादीति विशेषणोपादानम्॥

(न्या० भा०)—'अतीत०' इत्यादि ग्रंथानें कालाचें लक्षण करितात. व्यवहाराला कारण होणें एवढेंच जर कालाचें लक्षण केलें तर 'घट' अशा व्यवहाराला कारण होणारा जो घट त्यावर या कालाच्या लक्षणाची अतिव्याप्ति जाते. तिचें निवारण करण्याकरितां 'अतीतादि' या विशेषणाचें ग्रहण केलें आहे.

(प०)—अतीतेति। अतीत इत्यादिर्यो व्यवहारोऽतीतो भविष्यन्वर्तमान इत्यात्मकस्तस्यासाधारणहेतुः काल इत्यर्थः। नन्विदं लक्षणमाकाशेऽतिव्याप्तं व्यवहारस्य शब्दात्मकत्वादिति चेत्। न। अत्र हेतुपदेन निमित्तहेतोर्विवक्षितत्वात्। न चैवं कण्ठताल्वाद्यभिघातेऽतिव्याप्तिरिति वाच्यं, विभुत्वस्यापि निवेशात्।

( प० भा० )–भूत, भविष्यत्, वर्तमान, अशाप्रकारच्या व्यवहाराचें असाधारण कारण काल आहे, असा याचा इत्यर्थ. 'अहोएण हें कालाचें लक्षण आकाशावर अतिव्याप्त होतें. कारण व्यवहार शब्दात्मक असतो व शब्द हा आकाशाचा गुण आहे.' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण या ठिकाणीं 'हेतु' या पदाचा अर्थ 'निमित्त कारण' असा विवक्षित आहे. शब्द व्यवहाराचें निमित्त कारण नाहीं. काल आहे. त्यामुळें आकाशांत लक्षण अतिव्याप्त होत नाहीं. पण 'येथें हेतु म्हणजे निमित्त कारण असें म्हटल्यास कंठ व तालु इत्यादि स्थानीं वायूचा अभिघात होऊन शब्दाचा व्यवहार होत असल्यामुळें अभिघातामध्यें कालाच्या लक्षणाची अतिव्याप्ति होते' म्हणून म्हणाल तर तसेंही म्हणूं नये. कारण कालाच्या लक्षणांत विभुत्वाचाही संनिवेश करावा. म्हणजे कंठ व तालु इत्यादिस्थानीं होणारा अभिघात विभु नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जाणार नाहीं.

प्राच्यादिव्यवहारहेतुर्दिक् । सा चैका नित्या विभ्वी च ॥

( त० भा० )–पूर्व, पश्चिम, इत्यादि व्यवहाराला जी कारण होते ती दिशा होय. ती एक, नित्य, व विभु आहे.

( न्या० ) दिशो लक्षणमाह–प्राच्येति । उदयाचलसंनिहिता या दिक् सा प्राची । अस्ताचलसंनिहिता या दिक्सा प्रतीची । मेरो सनिहिता या दिक् सोदीची । मेरोर्व्यवहिता या दिक् सावाची ॥

( न्या० भा० ) 'प्राच्यादि०' इत्यादि वाक्यानें दिशेचें लक्षण करितात. उदयपर्वताच्या जवळ असणाऱ्या दिशेला पूर्व म्हणतात. अस्ताचलाच्या जवळ असणाऱ्या दिशेला पश्चिम म्हणतात. मेरुपर्वताच्या जवळच्या दिशेला उत्तर म्हणतात. मेरूच्या पलीकडे असलेल्या दूरच्या दिशेला दक्षिण म्हणतात.

( प० )–प्राचीति । इयं प्राचीयमवाचीयं प्रतीचीयमुदीचीत्याद्दिव्यवहारासाधारणं कारणं दिगित्यर्थः । हेतुर्दिगित्युच्यमाने परमाण्वादावतिव्याप्तिः स्यात्तद्वारणाय प्राच्यादिव्यवहारहेतुरिति । आकाशादिवारणायासाधारणेत्यपि बोध्यम् ॥

( प० भा० ) 'ही पूर्व, ही पश्चिम, ही उत्तर, ही दक्षिण' अशा व्यवहाराचें असाधारण कारण दिशा आहे, असा भावार्थ. 'जें कारण असतें ती दिशा' असें दिशेचें लक्षण केल्यास परमाणु सर्व

कार्यद्रव्यांचें कारण असल्यानें त्यांचेवर या लक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती दूर करण्यासाठीं 'जें पूर्व इत्यादि व्यवहाराचें कारण ती दिशा' असें ह्मटलें आहे. परमाणु तशा व्यवहाराला कारण होत नसल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. परंतु तशा व्यवहाराला आकाशादिकही कारण होत असल्यानें दिशेच्या लक्षणांत 'असाधारण' हेंही पद आहे असें समजावें. ह्मणजे तशा व्यवहाराला आकाश साधारण कारण असल्यानें अतिव्याप्ति होत नाहीं.

ज्ञानाधिकरणमात्मा । स द्विविधः । जीवात्मा परमात्मा चेति । तत्रेश्वरः सर्वज्ञः परमात्मा एक एव । जीवस्तु प्रतिशरीरं भिन्नो विभुर्नित्यश्च ॥

( ४० भा० ) जो ज्ञानाचें अधिकरण असतो तो आत्मा होय. तो जीवात्मा व परमात्मा असा दोन प्रकारचा आहे. त्यांपैकीं ईश्वर, सर्वज्ञ, परमात्मा एकच आहे. परंतु जीव प्रत्येक शरीरांत भिन्न भिन्न, विभु व नित्य आहे.

( न्या० ) आत्मानं निरूपयति–ज्ञानाधिकरणमिति । अधिकरणपदं समवायेन ज्ञानाश्रयत्वलाभार्थम् ॥

( न्या० भा० ) 'ज्ञानाधिकरणं०' येथून आत्म्याचें निरूपण करितात. 'जो ज्ञानवान् तो आत्मा' एवढेंच न ह्मणतां आत्म्याच्या लक्षणांत 'अधिकरण' हें पद आत्मा समवायसंबंधानें ज्ञानाचा आश्रय आहे असें सांगण्यासाठीं घातलें आहे.

( प० )–ज्ञानाधिकरणेति । भूतलादिवारणाय ज्ञानेति । कालादिवारणाय समवायेनेत्यपि देयम् । ईश्वर इति । समवायसंबन्धेन नित्यज्ञानवानीश्वरः । जीव इति । सुखादिसमवायिकारणं जीव इत्यर्थः ॥

( प० भा० ) 'जें अधिकरण तो आत्मा' असें ह्मटल्यास भूतल हेंही घटादिकाचें अधिकरण असल्यानें त्यावर आत्मलक्षणाची अतिव्याप्ति होते. तिच्या निवारणासाठीं 'ज्ञान' हें पद आहे. भूतल ज्ञानाचें अधिकरण नाहीं, ह्मणून त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. कालादिक कालिकसंबंधानें ज्ञानाचें अधिकरण होत असल्यानें आत्मलक्षणाची कालादिकांत अतिव्याप्ति होते. तिचें निवारण करण्यासाठीं लक्षणांत 'समवायसंबंधानें' असें पद घालावें. ह्मणजे काल समवायसंबंधानें ज्ञानाचें अधिकरण नसल्यानें त्यावर आत्म-

लक्षणाची अतिव्याप्ति होणार नाहीं. ईश्वर समवायसंबंधानें नित्यज्ञानवान् आहे व जीव सुखादिकांचें समवायिकारण आहे असा भावार्थ.

सुखाद्युपलब्धिसाधनमिन्द्रियं मनः । तच्च प्रत्यात्मनियतत्वादनन्तं परमाणुरूपं नित्यं च ॥

( त० भा० ) सुखादिकांच्या ज्ञानाला कारण होणारें जें इंद्रिय तें मन होय. तें प्रत्येक आत्म्याला अवश्य असल्यानें अनंत, परमाणुरूप, व नित्य आहे.

( न्या० ) मनो निरूपयति–सुखादीति । उपलब्धिर्नाम साक्षात्कारः । तथाच सुखदुःखादिसाक्षात्कारकारणत्वे सति इन्द्रियत्वं मनसो लक्षणम् । इन्द्रियत्वमात्रोक्तौ चक्षुरादावतिव्याप्तिः । अतः सुखादिसाक्षात्कारकारणत्वविशेषणम् । विशेष्यानुपादाने आत्मन्यतिव्याप्तिः । आत्मनः सुखादिकं प्रति समवायिकारणत्वात् । अत इन्द्रियत्वरूपविशेष्योपादानम् ॥

( न्या० भा० )' सुखादि० ' या खंडानें मनाचें निरूपण करितात. उपलब्धि म्हणजे साक्षात्कार. अर्थात् ' सुखदुःखादिकांच्या साक्षात्काराचें कारण असून, जें इंद्रिय असतें तें मन ' असें मनाचें लक्षण आहे. ' जें इंद्रिय तें मन ' असेंच म्हटल्यास चक्षुरादिकही इंद्रियें असल्यानें त्यांवर लक्षणाची अतिव्याप्ति होते. ती न व्हावी म्हणून ' सुखादिसाक्षात्काराचें कारण ' असें इंद्रियाला विशेषण दिलें आहे. बरें ' इंद्रिय ' हें पद न घालतां ' जें सुखादिकांच्या साक्षात्काराचें कारण तें मन ' एवढेंच मनाचें लक्षण केल्यास आत्माही सुखादिकांच्या ज्ञानाचें कारण असल्यानें मनोलक्षणाची त्यावर अतिव्याप्ति होते. ती न व्हावी म्हणून ' इंद्रिय ' हें पद, हेंच विशेष्य लक्षणांत अवश्य पाहिजे त्यामुळें आत्मा इंद्रिय नसल्यानें त्यांत मनोलक्षणाची अतिव्याप्ति होत नाहीं.

( प० )–सुखेति । आत्ममनःसंयोगादिवारणायेन्द्रियमिति । चक्षुरादिवारणाय सुखेति ॥

( प० भा० ) आत्मा व मन यांचा संयोगही सुखादिकांच्या ज्ञानाचें कारण आहे. कारण कोणत्याही ज्ञानास आत्ममनःसंयोग अवश्य आहे, यास्तव त्या आत्ममनःसंयोगांत मनोलक्षणाची अतिव्याप्ति न व्हावी म्हणून ' इंद्रिय ' हें पद लक्षणांत घातलें आहे.

संयोग गुण आहे इंद्रिय नव्हे. ह्मणून त्यांत 'इंद्रिय' असें ह्मटल्यानें अतिव्याप्ति होत नाहीं. वरें 'जें उपलब्धीचें साधन इंद्रिय तें मन' असें मनाचें लक्षण केल्यास घटादिकांच्या उपलब्धीचें–ज्ञानाचें साधन चक्षुहि आहे व 'चक्षु' इंद्रियही आहे. त्यामुळें मनाचें लक्षण त्यांत अतिव्याप्त होतें. तें होऊं नये ह्मणून 'सुखादि' या विशेषणाची आवश्यकता आहे. चक्षुरादि इंद्रियें सुखादिकांच्या साक्षात्काराला कारण होत नाहींत. त्यामुळें त्यांवर अतिव्याप्ति जात नाहीं.

चक्षुर्मात्रग्राह्यो गुणो रूपम्। तच्च शुक्लनीलपीतरक्तहरितकपिशचित्रभेदात्सप्तविधम्। पृथिवीजलतेजोवृत्ति। तत्र पृथिव्यां सप्तविधम्। अभास्वरशुक्लं जले। भास्वरशुक्लं तेजसि॥

(त० भा०) फक्त डोळ्यानेंच ग्राह्य–जाणण्यास योग्य असलेल्या गुणास रूप असें ह्मणतात. तें रूप शुक्ल, नील, रक्त, हरित, पीत, कपिश, व चित्र असें सात प्रकारचें आहे. तें रूप पृथ्वी, जल व तेज या द्रव्यांवर राहतें. त्यापैकीं पृथ्वीवर सातही प्रकारचें राहतें. अभास्वर शुक्लरूप जलांत आणि भास्वर शुक्लरूप तेजांत असतें.

(न्या०) रूपं लक्षयति–चक्षुरिति। चक्षुर्मात्रग्राह्यत्वविशिष्टगुणत्वं रूपस्य लक्षणम्। विशेष्यमात्रोपादाने रसादावतिव्याप्तिः। अतश्चक्षुर्मात्रग्राह्यत्वविशेषणम्। तावन्मात्रोपादाने रूपत्वेऽतिव्याप्तिः। यो गुणो यदिन्द्रियग्राह्यस्तन्निष्ठा जातिस्तदिन्द्रियग्राह्येति नियमात्तद्वारणाय विशेष्योपादानम्। चक्षुर्मात्रग्राह्यत्वं नाम चक्षुर्भिन्नेन्द्रियाग्राह्यत्वे सति चक्षुर्ग्राह्यत्वम्। मात्रपदानुपादाने संख्यादिसामान्यगुणेऽतिव्याप्तिः। संख्यादावपि चक्षुर्ग्राह्यत्वविशिष्टगुणत्वस्य सत्त्वात्। अतस्तद्वारणाय मात्रपदम्। संख्यादेश्चक्षुर्भिन्नत्वगिन्द्रियग्राह्यत्वाच्चक्षुर्मात्रग्राह्यत्वं नास्ति। (अतीन्द्रियगुरुत्वादावतिव्याप्तिवारणाय चक्षुर्ग्राह्येति)। अत्र लक्षणे ग्राह्यत्वं नाम प्रत्यक्षविषयत्वम्। अग्राह्यत्वं नामतदविषयत्वम्। तथा च चक्षुर्भिन्नेन्द्रियजन्यप्रत्यक्षाविषयत्वे सति चक्षुर्जन्यप्रत्यक्षविषयत्वमिति फलितोऽर्थः। ननु प्रभाघटसंयोगे रूपलक्षणस्यातिव्याप्तिस्तस्य चक्षुर्मात्रग्राह्यगुणत्वादिति चेन्न। गुणपदस्य विशेषगुणपरत्वात्। न चैवं विशेषगुणत्वघटितलक्षणे संख्यादावतिव्याप्त्यभावान्मात्रपदवैयर्थ्यमिति वाच्यम्। जलमात्रवृत्तिसांसिद्धिकद्रवत्वादावतिव्याप्तिवारणाय तदुपादानात्। अथवा चक्षुर्मात्रग्राह्यजातिमद्गुणत्वस्य लक्षणत्वान्न प्रभाघटसंयोगादावति-

व्याप्तिः । संयोगत्वजातेश्चक्षुर्मात्रग्राह्यत्वाभावात् । घटपटसंयोगस्य त्वगिन्द्रियग्राह्यत्वात्तद्गतजातेरपि त्वगिन्द्रियग्राह्यत्वात् । यो गुणो यदिन्द्रियग्राह्यस्तन्निष्ठजातेरपि तदिन्द्रियग्राह्यत्वात् । अत्र जातिघटितलक्षणे गुणत्वानुपादाने चक्षुर्मात्रग्राह्यजातिमति सुवर्णादावतिव्याप्तिरतस्तद्वारणाय तदुपादानम् । एवं रसादिलक्षणे विशेषणानुपादाने लक्ष्यभिन्नगुणादावतिव्याप्ति । विशेष्यानुपादाने लक्ष्यमात्रवृत्तिरसत्वगन्धत्वादावतिव्याप्ति. । अतो विशेषणविशेष्ययोरुपादानम् ॥

(न्या० भा० )'चक्षु०' इत्यादि वाक्यानें रूपाचें लक्षण करितात. 'चक्षुमात्रग्राह्यत्व या विशेषणानें विशिष्ट असें गुणत्व,' हें रूपाचें लक्षण आहे. आतां फक्त 'गुण' हें विशेष्यच घेतल्यास रसादिकहि गुण असल्यानें त्यांच्यावर रूपलक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं 'चक्षुर्मात्रग्राह्य' असें विशेषण घातलें पाहिजे. तें घातलें ह्मणजे रसादि गुण चक्षुर्मात्रग्राह्य नसल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. बरें 'जें चक्षुर्मात्रग्राह्य असतें तें रूप' एवढेंच लक्षण केल्यास 'रूपत्व' या जातीवर त्याची अतिव्याप्ति जाते. कारण रूपत्व ही जाती देखील चक्षुर्मात्रग्राह्य आहे. कारण कीं जो गुण ज्या इंद्रियानें समजतो त्यावरील जाती व तिचा अभावही त्याच इंद्रियानें समजतो, असा नियम आहे. यास्तव त्या जातीवरील अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'गुण' या विशेष्याचा लक्षणांत निवेश केला पाहिजे.तो केला ह्मणजे रूपत्व ही जाति गुण नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. चक्षुर्मात्रग्राह्य म्हणजे चक्षूहून भिन्न इंद्रियानें अग्राह्य असून केवळ चक्षूनें ग्राह्य असणें. 'चक्षुर्मात्रग्राह्य' येथील 'मात्र' हें पद न घेतल्यास संख्यादि सामान्यगुणावर अतिव्याप्ति जाते. तिचें निवारण करण्यासाठीं 'मात्र' हें पद घातलें आहे. नाहींतर संख्यादि सामान्य गुण देखील चक्षूनीं ग्राह्य असून गुण आहेतच. म्हणून 'मात्र' पद अवश्य आहे. तें घातल्यानें संख्यादिक चक्षूहून निराळ्या त्वगिंद्रियानेंही ग्राह्य असल्यानें त्यावरील अतिव्याप्तीचें निवारण होतें. अतींद्रिय असलेले जे गुरुत्वादि गुण त्यांवर या रूपाच्या लक्षणाची अतिव्याप्ति न जावी ह्मणून नुसते 'जो ग्राह्य गुण तें रूप' असें लक्षण न करितां 'चक्षुर्ग्राह्य' असें ह्मटलें आहे. त्यामुळें 'चक्षुर्ग्राह्य' नसून नुसते 'ग्राह्य' असलेल्या गुरुत्वादिकाचें निवारण होतें. या लक्षणांतील 'ग्राह्य'

ह्मणजे प्रत्यक्ष प्रमाणाचा विषय होण्यास योग्य व अग्राह्य ह्मणजे त्याचा अविषय. 'अर्थात् चक्षूहून वेगळ्या इंद्रियांनी होणाऱ्या प्रत्यक्षाचा विषय नसून जो गुण चक्षूनें होणाऱ्या प्रत्यक्षाचा विषय असतो तें रूप' हा ' चक्षुर्मात्रग्राह्य ' याचा फलितार्थ झाला. ' अहोपण प्रभा व घट यांच्या संयोगावर तुमच्या या रूपलक्षणाची अतिव्याप्ति जाते. कारण तो संयोग सुद्धां फक्त चक्षूनेंच समजणारा असून गुणही आहे' असें म्हणाल तर तसें ह्मणतां येत नाहीं. कारण याठिकाणीं ' गुण हें पद ' विशेष गुण ' या अर्थी आहे. संयोग हा सामान्य गुण आहे. त्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. ' अहोपण विशेषगुणत्वानें घटित असें लक्षण केलेलें असल्यामुळें संख्यादि सामान्यगुणांवर अतिव्याप्ति जात नाहीं. त्यामुळें ' मात्र ' हें पद व्यर्थ होतें' असें जर म्हणाल तर तसेंही म्हणतां येत नाहीं. कारण फक्त जलामध्येंच असणारा जो सांसिद्धिक द्रवत्वरूप गुण त्याच्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' मात्र ' हें पद घातलें आहे. तें नसतें तर सांसिद्धिकद्रवत्व गुणही चक्षुर्ग्राह्य असून विशेषगुणही असल्यानें रूपलक्षणाची त्याचेवर अतिव्याप्ति गेली असती. कारण सांसिद्धिकद्रवत्व गुण चक्षुर्मात्रग्राह्य नाहीं तर चक्षूहून भिन्न अशा त्वगिंद्रियानेंही ग्राह्य आहे. ह्मणून त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. किंवा ' फक्त चक्षूंनींच ग्राह्य जी जाति ती जाति ज्या गुणावर राहते तें रूप ' असें लक्षण केल्यामुळें आतां प्रभा व घट यांच्या संयोगादिकांवर अतिव्याप्ति जात नाहीं. कारण संयोगत्व ही जाति फक्त चक्षूंनींच ग्राह्य नाहीं. तर घट व पट यांचा संयोग त्वगिंद्रियानेंही समजत असल्यामुळें त्या संयोगावर असणारी संयोगत्व जाति देखील त्वगिंद्रियानें समजते. कारण जो गुण ज्या इंद्रियानें समजतो त्यावर असणारी जातीसुद्धां त्याच इंद्रियानें समजते, असा नियम आहे. जातीनें घटित अशा या लक्षणामध्यें ' गुणत्व ' असें पद जर घातलें नाहीं तर चक्षुनेंच ग्राह्य अशी सुवर्णत्वादि जाति ज्यावर राहते त्या सुवर्णादिकांत रूपलक्षणाची अतिव्याप्ति होते. ती न व्हावी म्हणून ' गुण ' असें पद घातलें आहे. त्यामुळें सुवर्ण हा गुण नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं.

अशाच रीतीनें रसादि गुणांच्या लक्षणामध्यें विशेषणें न घातल्यास लक्ष्य गुणाहून भिन्न गुणावर अतिव्याप्ति जाऊं लागेल. ती न जावी म्हणून विशेषणें घातलीं पाहिजेत. तसेंच विशेष्यें न घातल्यास लक्ष्याकार असणाऱ्या रसत्व, गंधत्व इत्यादि जातींवर अतिव्याप्ति जाऊं लागेल. ती दूर करण्यासाठीं विशेष्यें ( गुण ) घातलीं पाहिजेत. येणेंप्रमाणें लक्षणांत विशेषण व विशेष्य या दोघांचेंहि ग्रहण केलें पाहिजे.

( प० )-चक्षुरिति । रूपत्वादिवारणाय गुणपदम् । रसादिवारणाय चक्षुर्ग्राह्य इति । संख्यादिवारणाय मात्रपदम् । यद्यपि प्रभाभित्तिसंयोगवारणाय गुणपदेन विशेषगुणस्य विवक्षणीयतया तत एव संख्यादिवारणं संभवतीति मात्रपदं व्यर्थं तथापि सांसिद्धिकद्रवत्ववारणाय तदावश्यकम् । वस्तुतस्तु परमाणुरूपेऽव्याप्तिवारणाय चक्षुर्मात्रग्राह्यजातिमत्त्वस्य विवक्षणीयतया विशेषणं न देयम् । त्र्यणुकादिवारणाय गुणपदं तु देयम् । रसेति । रूपमित्यनुषज्जते ॥

( प० भा० )-रूपत्वावर जाणाऱ्या रूपलक्षणाच्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' गुण ' हें पद घातलें आहे. रसादि विशेष गुणावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' चक्षुर्ग्राह्य ' असें म्हटलें आहे. संख्यादि सामान्य गुणावर अतिव्याप्ति जाऊं नये म्हणून ' मात्र ' हें पद घातलें आहे. आतां प्रभा व भिंत यांच्या संयोगावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं येथील गुणपदानें विशेष गुण विवक्षित आहेत. त्या योगानेंच संख्यादि सामान्य गुणांवरील अतिव्याप्तीचें निवारण होतें. अर्थात् त्यासाठीं 'मात्र' पद जरी नको असलें, तरी सांसिद्धिक द्रवत्व या गुणावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं रूपलक्षणांत ' मात्र ' हें पद आवश्यक आहे. पण वास्तविक पाहतां परमाणूंच्या रूपावर रूपलक्षणाची अव्याप्ति येते. कारण तें चक्षुर्मात्रग्राह्य नाहीं. तेव्हां, ह्या अव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'चक्षुर्मात्र ग्राह्य जाति ज्याला आहे तें रूप' 'असें चक्षुर्मात्रग्राह्य जातिमत्त्व' विवक्षणीय —विवक्षा करण्यास योग्य—असल्यामुळें गुणाला विशेष असें विशेषण देण्याचें कारण नाहीं. कारण रूपत्वजाति रूपावांचून दुसऱ्या कोठेंही नसते. पण त्र्यणुकावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण कर-

ण्यासाठी लक्षणांत ' गुण ' हें पद घातलें पाहिजे. तें न घातल्यास त्र्यणुकत्वरूपी जातीही चक्षुर्मात्रग्राह्य असल्यानें तिच्यावर लक्षणाची अतिव्याप्ति होईल. पण, गुण हें पद रूपलक्षणांत घातलें म्हणजे त्र्यणुक हें द्रव्य असल्यामुळें त्यामध्यें अतिव्याप्ति जात नाहीं. ' सप्तविधम् ' याचा ' रूपम् ' याच्याशीं अन्वय आहे.

रसनग्राह्यो गुणो रसः। स च मधुराम्ललवणकटुकषायतिक्तभेदात् षड्विधः। पृथिवीजलवृत्तिः। तत्र पृथिव्यां षड्विधः। जले मधुर एव॥

( उ० भा० )—रसनेन्द्रियानें ज्याचें ग्रहण करतां येतें तो गुण रस होय. तो मधुर, अम्ल, लवण, कटु, कषाय व तिक्त असा सहा प्रकारचा आहे. तो पृथ्वी व जल यांवर रहातो. त्यांतील पृथ्वीवर वरील सहाहि प्रकारचा रस रहातो, व जलावर फक्त मधुरच रहातो.

( प० )—रसनेति। रसत्वादिवारणाय गुण इति। रूपाद्यतिव्याप्तिवारणाय रसनेति। तत्रेति। पृथिवीजलयोरित्यर्थः। षड्विध इति। अत्र रस इत्यनुवर्तते॥

( प० भा० )—जो रसनेनें ग्राह्य असतो तो रस असें म्हटल्यास रसत्व ही जातीहि रसनग्राह्य असल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जाईल. तिचें निवारण करण्यासाठीं ' गुण ' असें म्हटलें आहे. त्यामुळें जाति गुण नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. ' जो गुण तोच रस ' एवढेंच रसाचें लक्षण केल्यास रूपादिकही गुण असल्यानें त्यांच्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' रसनग्राह्य ' असें म्हटलें आहे, रूपादिक रसनग्राह्य नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति होत नाहीं. ' तत्र ' म्हणजे पृथ्वी व जल यांतील. ' षड्विधः ' यापुढें ' रसः ' हें पद अनुवृत्त होतें.

घ्राणग्राह्यो गुणो गन्धः। स द्विविधः। सुरभिरसुरभिश्च। पृथिवीमात्रवृत्तिः॥

( उ० भा० )—ज्याचें घ्राणेन्द्रियानें ग्रहण होतें त्या गुणास गंध म्हणतात. तो सुरभि व असुरभि असा दोन प्रकारचा आहे. तो पृथ्वीवर मात्र रहातो.

( प० )—घ्राणग्राह्य इति। गन्धत्वादावतिव्याप्तिवारणाय गुण इति। रूपाद्यतिव्याप्तिवारणाय घ्राणग्राह्य इति। पृथिवीसंबन्धसत्त्वे गन्धप्रतीतिसत्त्वं पृथिवी-

संबन्धाभावे गन्धप्रतीत्यभाव इत्यन्वयव्यतिरेकाभ्यां पृथिवीगन्धस्यैव जले प्रतीतिर्बोध्या। एवं वायावपि। ननु देशान्तरस्थकस्तूरीकुसुमसंबद्धपवनस्येहदेशे तत्संबन्धाभावाद्गन्धप्रतीत्यनुपपत्तिः। न चायमानीतत्र्यणुकादिसंबन्धोऽस्त्येवेति वाच्य। कस्तूर्यां न्यूनतापत्तेः कुसुमस्य च सच्छिद्रत्वापत्तेरिति चेन्न। भोक्तृदृष्टविशेषेण पूर्ववत्त्र्यणुकान्तरोत्पत्तेः। कर्पूरादौ तु तदभावान्न तथात्वमिति ॥

( प० भा० )–' घ्राणग्राह्य ' एवढेंच म्हटल्यास गंधत्व ही जाती देखील घ्राणग्राह्य असल्यानें तिच्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठी 'गुण' हें पद घातलें आहे. म्हणजे गंधत्व ही जाति गुण नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. ' जो गुण असतो तो गंध ' असें म्हटल्यास रूपादिकही गुण असल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जाते. ती न जावी म्हणून घ्राणग्राह्य असें म्हटलें आहे. त्यामुळें रूपादि गुण घ्राणग्राह्य नसल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. 'पृथ्वीमात्रवृत्ति' या पदानें असें सांगितलें आहे– पृथ्वीचा जलाशीं संबंध असेल तरच जलाला गंध असतो, व पृथ्वीचा त्याच्याशीं संबंध नसल्यास त्याला गंधही नसतो. अशा अन्वय-व्यतिरेकव्याप्तीवरून पृथ्वीच्या गंधाचाच जलांत अनुभव येतो, असें समजावें. याच न्यायानें वायूंतहि पृथ्वीगंधाचाच अनुभव येतो. "अहोपण असें म्हटल्यास दुसऱ्या ठिकाणीं असलेल्या कस्तूरीशीं व पुष्पाशीं संबद्ध असलेल्या वायूचा गंध या प्रदेशीं प्रतीत होणें शक्य नाहीं. कारण या देशीं त्याचा कस्तुरिकादिकाशीं संबंध नसतो. बरें या प्रदेशीं वायूनें आणलेल्या कस्तुरिकादिकाच्या त्र्यणुकादिकांचा संबंध आहेच असें म्हणाल तर तसेंही म्हणतां येत नाहीं. कारण तसें झाल्यास कस्तुरी वजनांत कमी झाली पाहिजे. पण तसें तर होत नाहीं. तसेंच पुष्पालाही छिद्रें पडलीं पाहिजेत. पण तसेंही अनुभवास येत नाहीं. तेव्हां वायूवरच गंध राहतो असें म्हणण्यास काय हरकत आहे ?" असें जर म्हणाल तर तसें म्हणतां येत नाहीं. कारण वायूंत जरी कस्तुरी गेली तरी भोक्त्याच्या एक प्रकारच्या अदृष्टामुळें पूर्वींप्रमाणें तेथें त्र्यणुकादिकांची उत्पत्ति होत असते व कर्पूरादिकांचे ठायीं त्र्यणुकादिक उत्पन्न होण्यास अनुकूल असें भोक्त्याचें अदृष्ट नसल्यानें तेथें ते उत्पन्न होत नाहींत.

त्वगिन्द्रियमात्रग्राह्यो गुणः स्पर्शः। स च त्रिविधः। शीतो-

ष्णानुष्णाशीतभेदात्। पृथिव्यप्तेजोवायुवृत्तिः। तत्र शीतो जले। उष्णस्तेजसि। अनुष्णाशीतः पृथिवीवाय्वोः॥

( त० भा० )–त्वगिंद्रियमात्रग्राह्य जो गुण त्यास स्पर्श ह्मणतात. तो शीत, उष्ण व अनुष्णाशीत असा तीन प्रकारचा आहे. तो पृथ्वी, जळ, तेज व वायु यांवर राहतो. त्यांपैकीं शीतस्पर्श जळावर राहतो. उष्णस्पर्श तेजावर राहतो आणि उष्णही नाहीं व शीतही नाहीं असा मध्यम स्पर्श पृथ्वी व वायु यांवर राहतो.

( न्या० ) स्पर्शं लक्षयति–त्वगिन्द्रियमात्रग्राह्येति। अत्रापि मात्रपदं संख्यादिसामान्यगुणादावतिव्याप्तिवारणाय। अन्यविशेषणकृत्यं पूर्ववद्बोध्यम्। ग्राह्यत्वपदार्थोऽपि पूर्ववदेव प्रत्यक्षविषयत्वरूप एव बोध्यः॥

( न्या० भा० )–त्वगिंद्रियमात्रग्राह्य या वाक्यानें स्पर्शाचें लक्षण करितात. येथेंही ' मात्र ' पद संख्यादिसामान्यगुणांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं घातलें आहे. कारण हातानें चांचपून पाहिलें असतांही हे घट एकमेकांस लागलेले आहेत, ते दोन किंवा चार आहेत हें कळतें, ह्मणजे संयोग व संख्या इत्यादिकही त्वगिंद्रियग्राह्य असल्यानें त्यांच्यावर स्पर्शलक्षणाची अतिव्याप्ति जाऊं नये म्हणून ' मात्र ' हें पद घातलें आहे. संयोग व संख्या हे गुण त्वक् व चक्षु या दोन्ही इंद्रियांनीं ग्रहण करितां येत असल्यामुळें ते फक्त त्वगिंद्रियानेंच ग्रहण करितां येतात असें नाहीं ह्मणून त्यांवर अतिव्याप्ति जात नाही. बाकींच्या विशेषणांचें कार्य–उपयोग पूर्वीप्रमाणेंच समजावा. ' ग्राह्य ' या पदाचा अर्थही पूर्वीप्रमाणें ह्मणजे ' प्रत्यक्षाचा विषय होणें,' असाच समजावा.

( प० )-स्पर्शत्वादावतिव्याप्तिवारणाय गुण इति। रूपादावतिव्याप्तिवारणाय त्वगिन्द्रियेति। संख्यादिवारणाय मात्रपदम्। तत्रेति। पृथिव्यादिचतुष्टये। शीत इति शीतस्पर्शः। उष्ण इति उष्णस्पर्शः॥

( प० भा० )–स्पर्शत्वादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' गुण ' असें ह्मटलें आहे. जाति गुण नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. ' जो गुण तो स्पर्श,' असें म्हटल्यास रूपादिकही गुण असल्यानें त्यांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' त्वगिंद्रियानें ग्राह्य ' असें म्हटलें आहे, ह्मणजे रूपादिक गुण जरी असले तरी ते त्वगिंद्रियग्राह्य नाहींत. ह्मणून

अतिव्याप्ति जात नाहीं. संख्यादि गुणांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'मात्र-' पद घातलें आहे. ह्मणजे ते गुण बहिरिंद्रियमात्रग्राह्य नाहींत. 'तत्र' म्हणजे पृथ्वी इत्यादि चार द्रव्यांमध्यें. 'शीतः' ह्मणजे शीतस्पर्श व 'उष्णः' ह्मणजे उष्णस्पर्श.

रूपादिचतुष्टयं पृथिव्यां पाकजमनित्यं च। अन्यत्रापाकजं नित्यमनित्यं च। नित्यगतं नित्यम्। अनित्यगतमनित्यम्॥

( त० भा० )-रूपादि चार गुण पृथ्वीमध्यें पाकज ह्मणजे विजातीय तेजःसंयोगामुळें उत्पन्न होणारे व अनित्य असतात परंतु इतर द्रव्यांमध्यें ते पाकज नसतात व तेथें ते नित्य व अनित्यही असतात. ते नित्यद्रव्यांवर नित्य व अनित्यद्रव्यावर अनित्य असतात.

( न्या० )-रूपादिचतुष्टयमिति। एतत्तत्त्वनिर्णयश्चेत्थम्। पाको नाम विजातीयतेजःसंयोगः। स च नानाजातीयः। रूपजनको विजातीयतेजःसंयोगः। तदपेक्षया रसजनको विजातीयः। एवं गन्धजनकोऽपि तथैव। एवं प्रकारेण भिन्नभिन्नजातीयाः पाकाः कार्यवैलक्षण्येन कल्पनीयाः। यथा तृणपुञ्जनिक्षिप्त आम्रादौ कृष्मलक्षणविजातीयतेजःसंयोगात्पूर्वहरितरूपनाशेन रूपान्तरस्य पीतादेरुत्पत्तिर्न तु रसादेरुत्पत्तिः। पूर्वरसस्याम्लस्यैवानुभवात्। क्वचित्पूर्वहरितरूपसत्त्वेऽपि रसपरावृत्तिर्दृश्यते। विजातीयतेजःसंयोगरूपपाकवशात्पूर्वतनाम्लरसनाशेन मधुररसस्यानुभवात्। तस्माद्रूपजनकापेक्षया रसजनको विलक्षण एवाङ्गीकार्यः। एवं गन्धजनको विलक्षण एव। रूपरसयोरपरावृत्तावपि पूर्वगन्धनाशेऽपि विजातीयपाकवशात्सुरभिगन्धोपलब्धेः। एवं स्पर्शजनकोऽपि पाकवशात्कठिनस्पर्शनाशेन मृदुस्पर्शानुभवात्। तस्माद्रूपादिजनका विजातीया एव पाकाः। अत एव पार्थिवपरमाणूनामेकजातीयत्वेऽपि पाकमहिम्ना विजातीयद्व्यणुकान्तरानुभवः। यथा गोभुक्ततृणादीनामापरमाण्वन्तभङ्गे तृणारम्भकपरमाणुषु विजातीयतेजःसंयोगात्पूर्वरूपादिचतुष्टयनाशे तदनन्तरं दुग्धे यादृशं रूपादिकं वर्तते तादृशरूपरसगन्धस्पर्शजनकास्तेजःसंयोगा जायन्ते। तदुत्तरं तादृशरूपरसादय उत्पद्यन्ते। तादृशरूपरसादिविशिष्टपरमाणुभिर्दुग्धद्व्यणुकमारभ्यते। ततस्त्र्यणुकादिक्रमेण महादुग्धारम्भः। एवं दुग्धारम्भकैः परमाणुभिरेव दध्यारभ्यते पाकमहिम्ना। एवं दध्यारम्भकैरेव परमाणुभिर्नवनीतादिकमिति दिक्॥

( न्या० भा० )-' रूपादिचतुष्टयं०' इत्यादि—याच्या तत्त्वाचा निर्णय ह्मणजे वस्तुस्थिति अशी आहे.—पाक म्हणजे विजातीय तेजांचा संयोग. तो वेगवेगळ्या जातींचा असतो रूपाला उत्पन्न करणारा तेजाचा संयोग विजातीय म्हणजे निराळ्या जातीचा, त्याच्या अपे-

क्षेनें रसाला उत्पन्न करणारा तेजाचा संयोग निजातीय. अशाच री तीनें गंधाला उत्पन्न करणारा तेजःसंयोगही त्याहून विजातीय असतो. त्याच न्यायानें स्पर्शाला उत्पन्न करणारा तेजः संयोगही तसाच हा० विजातीय असतो. अशा प्रकारें रूपादकार्यांच्या वैलक्षण्यावरून भिन्न भिन्न जातींच्या पाकांची कल्पना करावी. जसें, गवताचे ढिगात टाकलेल्या आम्रादिफलांवर उष्णरूपी तेजःसंयोगामुळें पूर्वीच्या हिरव्या रूपाचा नाश होऊन दुसऱ्या पिवळ्या, लाल वगैरे रूपांची उत्पत्ति होते. परंतु त्यानेंच रसाची उत्पत्ति होत नाहीं. कारण, पूर्वीचा रंग जरी बदलला तरी आंबट रसाचाच अनुभव येत असतो. कित्येक फळांचें पूर्वीचें हिरवें रूप तसेंच असतें, तें बदलत नाहीं, पण रस बदललेला दिसतो. कारण, विजातीय तेजःसंयोगरूपी पाकामुळें पूर्वीच्या आंबट रसाचा नाश होऊन गोड रसाचा अनुभव येतो. यास्तव रूपाला उत्पन्न करणाऱ्या तेजःसंयोगापेक्षां रसाला उत्पन्न करणारा तेजःसंयोग वेगळाच मानिला पाहिजे. असाच गंधाला उत्पन्न करणारा पाकही विलक्षणच--त्याहून वेगळाच मानिला पाहिजे. कारण रूप व रस यांचा बदल झाला नसतांना देखील, पूर्वीच्या गंधाचा नाश होऊन विलक्षण पाकामुळें सुवासिक गंधही अनुभवाला येतो. तसेंच, स्पर्शाला उत्पन्न करणाराही तेजःसंयोग वेगळा मानावा. कारण, पाकामुळें कठिण स्पर्शाचा नाश होऊन मृदु स्पर्शाचा अनुभव येतो. म्हणून रूपादिकांना उत्पन्न करणारे तेजःसंयोग विजातीयच आहेत. म्हणूनच पृथ्वीचे परमाणु जरी एका जातीचे असले तरी विजातीय तेजःसंयोगाच्या प्रभावानें वेगवेगळ्या द्रव्यांचा अनुभव येत असतो. जसें गाईनें खाल्लेले जे गवत इत्यादि पदार्थ त्यांचा परमाणूंपर्यंत नाश होऊन त्या गवताला आरंभ करणाऱ्या परमाणूंतील विजातीय तेजःसंयोगामुळें पूर्वी जे रूपादिगुण असतात तसल्या रूप, रस, गंध व स्पर्श यांना उत्पन्न करणारे तेजःसंयोग उत्पन्न होतात. त्यानंतर तसले रूपरसादि गुण उत्पन्न होतात, व तसल्या प्रकारच्या रूपरसादिकांनी युक्त अशा परमाणूंनी दुधाचे द्व्यणुक उत्पन्न होतात नंतर त्र्यणुक होतात व अशा क्रमानें महादुधाचा म्हणजे आपण जसें दूध पाहतों तसल्या दुधाची

उत्पत्ति होते. अशा रीतीनेंच दुधाची उत्पत्ति करणाऱ्या परमाणूंनीच पाकाच्या प्रभावानें दह्याची उत्पत्ति केली जाते. अशाच रीतीनें दह्याचा आरंभ करणाऱ्या परमाणूंनीं लोणी इत्यादिकाची उत्पत्ति होते. असा या उत्पत्तीचा क्रम जाणावा.

एकत्वादिव्यवहारहेतुः सङ्ख्या। सा नवद्रव्यवृत्तिः। एकत्वादिपरार्धपर्यन्ता। एकत्वं नित्यमनित्यं च। नित्यगतं नित्यम्। अनित्यगतमनित्यम्। द्वित्वादिकं तु सर्वत्रानित्यमेव ॥

( त० भा० )—एकत्वादि व्यवहाराच्या हेतूला संख्या असें म्हणतात. संख्या हा गुण नऊही द्रव्यावर राहतो. संख्या एकत्वापासून परार्धापर्यंत आहे. त्यापैकीं एकत्व हें नित्य व अनित्य असें दोन प्रकारचें आहे. नित्यद्रव्यावरील एकत्व नित्य व अनित्यद्रव्यावरील अनित्य होय. परंतु द्वित्वादि सर्व संख्या सर्वस्थळीं अनित्यच असतात.

( प० ) एकत्वादीति। एकत्वमित्यादिर्यो व्यवहार. एको द्वावित्याद्यात्मक स्तस्य हेतुः सङ्ख्या इत्यर्थः। घटादिवारणाय एकत्वादीति। कालादिवारणायासाधारणेत्यपि देयम्। ननु सङ्ख्यायाः अवधिरस्ति न वेत्यत आह—एकत्वादीति। तथाच ' एकं दश शतं चैव सहस्रमयुतं तथा। लक्षं च नियुतं चैव कोटिरर्बुदमेव च। वृन्दं खर्वो निखर्वश्च शङ्खः पद्मश्च सागरः। अन्त्यं मध्यं परार्धं च दश-वृद्ध्या यथाक्रमम्। इति मदुक्तं परार्धपर्यन्तैव सङ्ख्या इति भाव ॥

( प० भा० )—' एकत्वादि०-' ' एकत्वं ' इत्यादि जो एक, दोन अशा प्रकारचा व्यवहार त्याचा हेतु-कारण संख्या आहे ' जो व्यवहाराचा हेतु ती संख्या ' असें म्हटल्यास ' घट ' अशा व्यवहाराचें घटही कारण असल्यामुळें त्यावर संख्यालक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठी ' एकत्वादि व्यवहाराचें कारण ' असें लक्षणात म्हटलें आहे. घट तशा व्यवहाराचें कारण होत नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. पण कालही एकत्वादि व्यवहाराचें कारण असल्यामुळें त्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' असाधारण ' असेंही विशेषण व्यवहाराला लावावें म्हणजे कालावर अतिव्याप्ति जाणार नाहीं. कारण काल कार्यमात्राचें साधारण कारण आहे.' अहोपण संख्येलाअवधि आहे किंवा नाही ? ' असें कोणी विचारील म्हणून ' एकत्वादि ' यानें त्याचें उत्तर

सांगतात. एक, दश, शंभर हजार, दहा हजार, लक्ष, नियुत, कोटि, अर्बुद, वृंद, खर्व, निखर्व, शंख, पद्म, सागर, अन्त्य, मध्य, परार्ध, अशी उत्तरोत्तर दसपट वृद्धीनें क्रमानें संख्या होते, अशी थोराची उक्ति असल्यामुळें संख्याही परार्धपर्यंतच आहे, असा भावार्थ.

मानव्यवहारासाधारणं कारणं परिमाणम् । नवद्रव्यवृत्ति । तच्चतुर्विधम् । अणु महद्दीर्घं ह्रस्वं चेति ॥

( त० भा० )–परिमाणाच्या व्यवहाराचें जें असाधारण कारण तें परिमाण होय. तें नऊही द्रव्यावर राहतें. तें अणु, महत्, दीर्घ, व ह्रस्व, असें चार प्रकारचें आहे.

( प० ) मानेति । मानं परिमितिस्तस्या यो व्यवहारः इदं महदिदमणु इत्याद्यात्मकः तस्य कारणं परिमाणमित्यर्थः । दण्डादिवारणाय मानेति । कालादिवारणायासाधारणेति । शब्दत्ववारणाय कारणमिति । नवद्रव्येति । चतुर्विधमपि परममध्यमभेदेन द्विविधम् । तत्र परमाणुत्वह्रस्वत्वे परमाणुमनसोः मध्यमाणुह्रस्वत्वे द्व्यणुके । परममहत्त्वदीर्घत्वे गगनादौ । मध्यममहत्त्वदीर्घत्वे घटादौ । एतन्मौक्तिकादिदं मौक्तिकमणीयमिति व्यवहारस्यापकृष्टमहत्त्वाश्रयत्वाद्गौणत्वं बोध्यम् । एवमेव केतनाद्द्व्यणुकं ह्रस्वमित्यत्रापि निकृष्टदीर्घत्वाद्गौणत्वम् ॥

( प० भा० )–मान म्हणजे परिमिति; तिचा जो व्यवहार म्हणजे हें मोठें, हें अणु–सूक्ष्म, अशाप्रकारचा व्यवहार त्याचें जें कारण तें परिमाण होय. 'जें व्यवहाराचें कारण तें परिमाण,' एवढेंच म्हटल्यास ' दंड ' अशा व्यवहाराचें दंडही कारण होत असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जाते. ती न जावी म्हणून ' मान ' असें म्हटलें आहे. ' दंड ' मानव्यवहाराचें कारण नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. तसेंच कालावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' असाधारण ' असें म्हटलें आहे. त्यामुळें काळ मानव्यवहाराचें साधारण कारण असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. शब्दत्वावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' कारण ' असें म्हटलें आहे. तें चार प्रकारचेंहि परिमाण परम व मध्यम या भेदानें दोन प्रकारचें आहे. त्यांपैकीं परमाणुत्व व ऱ्हस्वत्व हीं परमाणु व मन यांवर असतात. मध्यमाणु व ऱ्हस्वत्व हीं द्व्यणुकांवर असतात. परममहत्त्व व दीर्घत्व हीं आकाशादिकांवर असतात. मध्यम महत्त्व व दीर्घत्व हीं घटादिकांवर राहतात. या मोत्यापेक्षां हें

मोती लहान आहे असा व्यवहाराचा अपकृष्टमहत्त्व हा आश्रय असल्यामुळें तो व्यवहार गौण आहे. अशाच रीतीनें ध्वजापेक्षां पंखा ऱ्हस्व आहे. या ठिकाणीं देखील अतिशय कमी दीर्घत्व असल्यामुळें हा व्यवहारही गौण आहे.

पृथग्व्यवहारासाधारणकारणं पृथक्त्वम्। सर्वद्रव्यवृत्ति॥

( त० भा० ) जें ' पृथक् ' असा व्यवहाराचें असाधारण कारण असतें तें पृथक्त्व होय. तें सर्व द्रव्यांवर राहतें.

( प० ) पृथगिति । अयमस्मात्पृथगिति यो व्यवहारस्तस्य कारणं पृथक्त्वमित्यर्थः । दण्डादिवारणाय पृथगित्यादि । कालादिवारणायासाधारणेति । पृथग्व्यवहारत्ववारणाय कारणमिति ॥

( प० भा० )–'पृथक्०' हा याहून वेगळा असा जो व्यवहार त्याचें कारण पृथक्त्व आहे ' असा भावार्थ. दंडादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' पृथक् ' असें म्हटलें आहे. नाहींतर दंडादिकही ' व्यवहाराचें कारण ' होत असल्यानें त्यांवर अतिव्याप्ति गेली असती. कालावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' असाधारण ' हें पद घातलें आहे. त्यामुळें ' काल ' कार्यमात्राचें साधरण कारण असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. 'पृथक् व्यवहारत्वा-' वर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' कारण ' असें म्हटलें आहे. ' पृथक् व्यवहारत्व' हें पृथक् व्यवहाराचें कारण नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं.

संयुक्तव्यवहारहेतुः संयोगः । सर्वद्रव्यवृत्तिः ॥

( त० भा० )–संयुक्त व्यवहाराचें जें कारण त्यास संयोग असें म्हणतात. तो सर्व द्रव्यांवर राहतो.

( प० )–संयुक्तेति । इमौ संयुक्ताविति यो व्यवहारस्तस्य हेतुः संयोग इत्यर्थः । दण्डादिवारणाय संयुक्तव्यवहारेति । कालादिवारणायासाधारणेत्यपि देयम् । संयुक्तव्यवहारेऽतिप्रसक्तिवारणाय हेतुरिति । उपदर्शितलक्षणचतुष्टयेऽसाधारणपदं देयम् । क्वचित्पुस्तके परिमाणपृथक्त्वलक्षणे ईश्वरेच्छादिवारणायासाधारणेति दृश्यते तत्साधुनैकत्वेनेति बोध्यम् ॥

( प० भा० ) हे दोन पदार्थ संयुक्त आहेत असा जो व्यवहार त्याचा हेतु–कारण संयोग आहे. 'जो हेतु तोच संयोग ' असें म्हटल्यास घटरूपी कार्याचा ' दंड ' हाहि हेतु असल्यानें त्यावर

संयोग-लक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं ' संयुक्त-व्यवहाराचें कारण ' असें म्हटलें आहे. त्यामुळें दंड संयुक्त व्यवहाराचें कारण होत नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. कालादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' असाधारण ' हें पद आहे. ' संयुक्त-व्यवहारत्वा ' वर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' हेतु ' हें पद आहे. ' संयुक्तव्यवहारत्व ' हा हेतु नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. वरील चारी लक्षणांमध्यें ' असाधारण ' हें पद घालावें. तर्कसंग्रहाच्या कांहीं प्रतींत परिमाण व पृथक्त्व यांच्या लक्षणांत ईश्वराची इच्छा इत्यादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' असाधारण ' हें पद घातलेलें दिसतें; पण तें आधुनिक लोकांनीं घातलें आहे असें समजावें.

संयोगनाशको गुणो विभागः । सर्वद्रव्यवृत्तिः ॥

( त० भा० ) संयोगाचा नाश करणारा जो गुण तो विभाग—तो सर्व द्रव्यांवर राहतो.

( न्या० ) विभागं लक्षयति—संयोगेति । संयोगनाशकत्वविशिष्टगुणत्वं विभागस्य लक्षणम् । विशेषणमात्रोपादाने क्रियाया अपि संयोगनाशकत्वात्तत्रातिव्याप्तिवारणाय गुणत्वमिति विशेष्योपादानम् ॥

( न्या० भा० ) ' संयोग० ' इत्यादि वाक्यानें विभागाचें लक्षण सांगतात. ' संयोगनाशकत्व ' या विशेषणानें विशिष्ट जें गुणत्व तें विभागाचें लक्षण आहे. येथें केवळ ' संयोगनाशकत्व ' हें विशेषणच घेतल्यास क्रिया देखील संयोगाचा नाश करणारी असल्यामुळें तिच्यावर अतिव्याप्ति जाते. तिचें निवारण करण्यासाठीं ' गुण ' असें विशेष्य लक्षणांत घातलें आहे. त्यामुळें क्रिया हा गुण नसल्यानें तिच्यावर या विभागलक्षणाची अतिव्याप्ति जात नाहीं.

( प० ) संयोगेति । संयोगनाशजनक इत्यर्थः । कालेऽतिप्रसक्तिवारणाय गुणपदम् । ईश्वरेच्छादिवारणायासाधारणेत्यपि योध्यम् । ननु असाधारणशब्दोपादाने गुणपदस्य वैयर्थ्यं स्यादिति चेत् । न । क्रियायामतिप्रसक्तिवारणाय तस्याप्यावश्यकत्वात् ॥

( प० भा० ) ' संयोग नाशक ' म्हणजे संयोगनाशाला उत्पन्न करणारा असा अर्थ. कालावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण

करण्यासाठी लक्षणांत 'गुण' असें पद घातलें आहे. काल द्रव्य आहे, गुण नाहीं, म्हणून त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. ईश्वराची इच्छा इत्यादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'असाधारण' हें पदहि येथें आहे, असें समजावें. म्हणजे ईश्वरेच्छादि साधारण कारण असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. 'अहो पण, असाधारण असें पद लक्षणांत घातल्यास गुण हें पद व्यर्थ होऊं लागेल.' असें जर म्हणाल तर तसें नाहीं. कारण क्रियाही देखील संयोग नाशाचें असाधारण कारण असल्यानें गुण पद लक्षणांत न घातल्यास तिच्यावर विभागलक्षणाची अतिव्याप्ति जाऊं लागेल. ती न जावी म्हणून 'गुण' हें पदहि आवश्यकच आहे. क्रिया गुण नाहीं, म्हणून तें घातल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं.

परापरव्यवहारासाधारणकारणे परत्वापरत्वे। पृथिव्यादिचतुष्टयमनोवृत्तिनी। ते च द्विविधे। दिक्कृते कालकृते चेति। दूरस्थे दिक्कृतं परत्वम्। समीपस्थे दिक्कृतमपरत्वम्। ज्येष्ठे कालकृतं परत्वं कनिष्ठे कालकृतमपरत्वम्॥

(व० भा०) 'पर' व्यवहाराचें जें कारण तें परत्व होय. व 'अपर' व्यवहाराचें जें कारण तें अपरत्व होय. हे दोन गुण पृथ्वी जल, तेज, वायु व मन या द्रव्यांवर राहतात. परत्व व अपरत्व हीं दिक्कृत व कालकृत अशीं दोन प्रकारचीं आहेत. जो पदार्थ आपल्यापासून दूर असतो त्यावर दिक्कृत परत्व राहतें. (परत्व व अपरत्व हे गुण आकाश, काल, दिशा व आत्मा यांच्यावर राहात नाहींत. याचें कारण असें कीं, हीं चारी द्रव्यें विभु व नित्य आहेत. त्यामुळें देशकृत व कालकृत परत्व किंवा अपरत्व यांच्या ठिकाणीं संभवत नाहीं. म्हणजे आकाश जवळ आहे किंवा दूर आहे, हा आत्मा त्याहून ज्येष्ठ आहे किंवा कनिष्ठ आहे, इत्यादि प्रयोग आपल्याला कोठेंच येत नाहींत.)

(प०) परेति। परव्यवहारासाधारणं कारणं परत्वम्। अपरव्यवहारासाधारणं कारणमपरत्वमित्यर्थः। दण्डादिवारणाय परव्यवहारेति। कालादिवारणायासाधारणेति। परव्यवहारत्ववारणाय कारणेति। एवमेव द्वितीयेऽपि बोध्यम्॥

( प०भा० ) परव्यवहाराचें जें असाधारण कारण त्याला परत्व म्हणतात व अपरव्यवहाराच्या असाधारण कारणास अपरत्व म्हणतात. दंडादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'परव्यवहाराचें असाधारण कारण' असें म्हटलें आहे. दंड परव्यवहाराचें असाधारण कारण नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. कालावर अतिव्याप्ति न जावी म्हणून 'असाधारण' म्हटलें आहे. काल साधारण कारण असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. परव्यवहारावर अतिव्याप्ति जाऊं नये म्हणून 'कारण' असें लक्षणांत म्हटलें आहे. परव्यवहारत्व कारण नाहीं म्हणून अतिव्याप्ति नाहीं. अपरव्यवहारत्व इत्यादि लक्षणांतही असेंच पदकृत्य जाणावें.

आद्यपतनासमवायिकारणं गुरुत्वम्। पृथिवीजलवृत्ति॥

( व०भा० ) आद्यपतनाचें जें असमवायि कारण तें गुरुत्व होय तें पृथ्वी व जल यांवर राहातें.

( न्या० ) गुरुत्वं लक्षयति–आद्येति। द्वितीयपतनक्रियायां वेगस्यासमवायिकारणत्वात्तत्रातिव्याप्तिवारणायाद्येति। उत्तरत्र स्यन्दने आद्यविशेषणमपि पूर्ववदेव योजनीयम्॥

( न्या०भा० ) 'आद्येति०' या वाक्यानें गुरुत्वाचें लक्षण सांगतात. दुसऱ्या, तिसऱ्या इत्यादि पतनक्रियांचें वेग हें असमवायि कारण असल्यानें त्याचेवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'आद्य' असें म्हटलें आहे. आद्य क्रियेस गुरुत्वावांचून दुसरें असमवायि कारण नसल्यानें गुरुत्वाच्या लक्षणाची वेगावर अतिव्याप्ति जात नाहीं. पुढील द्रवत्वाच्या लक्षणांत देखील स्यंदनाला 'आद्य' हें विशेषण पूर्वीप्रमाणेंच योजावें.

( प० ) आद्येति। दण्डादिवारणायासमवायीति। रूपादिवारणाय पतनेति। वेगेऽतिव्याप्तिवारणायाद्येति॥

( प०भा० ) जें कारण तें गुरुत्व, असें म्हटल्यास दंडहि घटाचें कारण असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जाईल. ती न जावी म्हणून असमवायि कारण म्हटलें आहे. दंड घटाचें असमवायि कारण नाहीं ( निमित्त कारण आहे. ) त्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. तसेंच रूपहि पटाच्या रूपाचें असमवायि कारण असल्यानें 'जें

असमवायि कारण तें गुरुत्व ' एवढेंच लक्षण केल्यास तंतुरूपावर अतिव्याप्ति होते. ती दूर करण्यासाठीं ' पतनाचें असमवायि कारण ' असें म्हटलें आहे. रूप पतनाचें असमवायि कारण नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. वेगावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' आद्य ' हें पद घातलें आहे. वेग पहिल्या पतनाचें असमवायि कारण नसल्यानें त्यावरही अतिव्याप्ति जात नाहीं.

आद्यस्यन्दनासमवायिकारणं द्रवत्वम्। पृथिव्यप्तेजोवृत्ति। तद्द्विविधम्। सांसिद्धिकं नैमित्तिकं च। सांसिद्धिकं जले। नैमित्तिकं पृथिवीतेजसोः। पृथिव्यां घृतादावग्निसंयोगजं द्रवत्वम्। तेजसि सुवर्णादौ ॥

( त० भा० )–आद्य स्यंदनाचें जें असमवायि कारण तें द्रवत्व होय. हा गुण पृथ्वी, जल व तेज यांवर राहतो. तें सांसिद्धिक व नैमित्तिक असें दोन प्रकारचें आहे. सांसिद्धिक ' द्रवत्व ' जलावर राहतें व नैमित्तिक 'पृथ्वी' व ' तेज ' यांवर राहतें. अग्निसंयोगाच्या निमित्तानें घृतादिक पदार्थ पातळ होतात; हें पृथ्वीवरील नैमित्तिक द्रवत्वाचें उदाहरण आहे, व अग्निसंयोगानें सुवर्णादिक वितळतात हें तेजावरील नैमित्तिक द्रवत्वाचें उदाहरण आहे.

( प० ) आद्यस्यन्दनेति। दण्डादिवारणायासमवायीति। रसादिवारणाय स्यन्दनेति ॥

( प० भा० )–दंडादिकावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं पूर्वीप्रमाणेंच ' असमवायि ' असें म्हटलें आहे. दंडादिक असमवायि कारण नसल्यानें त्यांवर अतिव्याप्ति जात नाहीं. ' जें असमवायि कारण तें द्रवत्व ' असें म्हटल्यास अवयवांचा रस हा अवयवीच्या रसाचें असमवायि कारण होत असल्यानें द्रवत्वाचें लक्षण रसादि गुणांवर अतिव्याप्त होऊं लागेल. तसें न व्हावें म्हणून ' स्यंदनाचें जें असमवायि कारण तें द्रवत्व ' असें त्याचें लक्षण केलें आहे. त्यामुळें रसादिक स्यंदनाचें असमवायि कारण होत नसल्यानें त्यांवर अतिव्याप्ति जात नाहीं.

चूर्णादिपिण्डीभावहेतुर्गुणः स्नेहः। जलमात्रवृत्तिः ॥

( त० भा० )—चूर्णादिकांचा गोळा ज्याच्या योगानें होतो अशा गुणास स्नेह असें म्हणतात. हा गुण फक्त जळामध्येंच राहतो.

( न्या० ) स्नेहं लक्षयति—चूर्णादीति । चूर्णादिपिण्डीभावहेतुत्वे सति गुणत्वं स्नेहस्य लक्षणम् । पिण्डीभावो नाम चूर्णादेर्धारणाकर्षणहेतुभूतो विलक्षणः संयोगः। तादृशसंयोगे स्नेहस्यैवासाधारणकारणत्वं न तु जलादिगतद्रवत्वस्य । तथा सति द्रुतसुवर्णादिसंयोगेन चूर्णादेः पिण्डीभावापत्तेः । अतः स्नेह एवासाधारणं कारणम् । विशेषणमात्रोपादाने कालादावतिव्याप्तिरतस्तद्वारणाय विशेष्योपादानम् । वस्तुतस्तु द्रुतजलसंयोगस्यैव पिण्डीभावहेतुत्वं स्नेहस्य पिण्डीभावहेतुत्वे मानाभावात् । जले द्रुतत्वविशेषणात्करकादिव्यावृत्तिः ॥

(न्या० भा०)—' चूर्णादि ' या वाक्यानें स्नेहाचें लक्षण करितात. चूर्णादिकांचा गोळा होण्यास कारण असून जो गुण असतो तो स्नेह होय. हें स्नेहाचें लक्षण आहे. पिंडीभाव म्हणजे चूर्णादिकांना धारण करणें व आकर्षण करणें, ह्याला कारण होणारा असा विलक्षण संयोग. तशा संयोगाचें स्नेह हेंच असाधारण कारण आहे. जलादिकांत असणारें द्रवत्व त्याचें कारण नाहीं. कारण द्रवत्व हेंच जर चूर्णादिकांचा गोळा होण्याचें कारण असतें तर पातळ झालेल्या सुवर्णादिकांच्या संयोगानेंही चूर्णादिकांचा गोळा झाला असता. पण तो तर होत नाहीं. ह्मणून द्रवत्व त्याचें कारण नसून स्नेहच असाधारण कारण आहे. आतां ' चूर्णादिकांच्या पिंडीभावाला जो हेतु असतो तो स्नेह ' असें. फक्त विशेषणच घेतल्यास काळ हाही त्या संयोगाचें कारण असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जाते. तिचें निवारण करण्यासाठीं गुण हें विशेष्य घेतलें आहे. काळ द्रव्य आहे. गुण नाहीं. त्यामुळें काळावर अतिव्याप्ति होत नाहीं. वस्तुतः पातळ पाण्याचा संयोग हेंच पिंडीभावाचें कारण आहे. स्नेह हें पिंडीभावाला कारण आहे, याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. जळाला 'पातळ' असें विशेषण दिल्यानें गारा इत्यादि कठिण झालेल्या जल विकारांची व्यावृत्ति होते.

( प० ) चूर्णादीति । चूर्णं पिष्टं सक्त्वादिरूपस्य मृत्तिकादेः च चूर्णादित्वस्य पिण्डीभावः संयोगविशेषस्तस्य हेतुर्निमित्तकारणं स्नेह इत्यर्थः। कालादावतिव्याप्तिवारणाय गुणपदम् । रूपादावतिव्याप्तिवारणाय पिण्डीभावेति । चूर्णपदं स्पष्टार्थम् ॥

( प० भा० )—चूर्ण म्हणजे पिष्ट. तेंच ज्या मृत्तिकादि पदा-

र्थांच्या आदि म्हणजे आरंभीं आहे तेंच चूर्णादि. त्याचा पिंडीभाव म्हणजे संयोगविशेष. त्याचा हेतु म्हणजे निमित्तकारण स्नेह आहे, असा भावार्थ. कालावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'गुण' असें पद घातलें आहे. रूपादिकावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'पिंडीभाव' असें म्हटलें आहे. रूपादिक गुण पिंडीभावाला कारण होत नाहींत. त्यामुळें त्यांवर अतिव्याप्ति जात नाहीं. पिंडीभाव म्हटला म्हणजे तो चूर्णादिकांचाच व्हावयाचा असतो. 'चूर्ण' हें पद हाच अर्थ स्पष्ट होण्याकरितां घातलें आहे.

श्रोत्रग्राह्यो गुणः शब्दः। आकाशमात्रवृत्तिः। स द्विविधः। ध्वन्यात्मको वर्णात्मकश्च। तत्र ध्वन्यात्मको भेर्यादौ। वर्णात्मकः संस्कृतभाषादिरूपः॥

( त० भा० )—ज्याचें ग्रहण ( ज्ञान ) श्रोत्रानें करतां येतें तो गुण शब्द होय. शब्द फक्त आकाशावर राहतो. तो ध्वन्यात्मक व वर्णात्मक असा दोन प्रकारचा आहे. भेरी-दुंदुभी-नगारा इत्यादिकांपासून जो शब्द उत्पन्न होतो तो ध्वन्यात्मक व संस्कृतभाषा इत्यादिरूप जो शब्द तो वर्णात्मक होय.

( न्या० ) शब्दं लक्षयति—श्रोत्रेति। शब्दत्वेऽतिव्याप्तिवारणाय गुण इति। रूपादावतिव्याप्तिवारणाय श्रोत्रेति। स त्रिविधः संयोगजो विभागजः शब्दजश्चेति। यथा भेरीदण्डसंयोगजो भाङ्कारादिशब्दः। हस्ताभिघातसंयोगजन्यो मृदङ्गादिशब्दः। वंशे पाट्यमाने दलद्वयविभागजन्यश्चटचटाशब्दः। शब्दोत्पत्तिदेशमारभ्य श्रोत्रदेशपर्यन्तं वीचीतरङ्गन्यायेन कदम्बमुकुलन्यायेन वा निमित्तपवनेन शब्दधारा जायते। तत्र उत्तरोत्तरशब्दे पूर्वपूर्वशब्दः कारणम्॥

( न्या० भा० )—'श्रोत्र' इत्यादि वाक्यानें शब्दाचें लक्षण सांगतात. शब्दत्वही श्रोत्रग्राह्य असल्यानें त्याच्यावर शब्दलक्षणाची अतिव्याप्ति जाऊं नये म्हणून त्यांत गुण असें पद घालावें. म्हणजे शब्दत्व हा गुण नसल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. आतां जो गुण तो शब्द असें म्हटल्यास रूपादिकही गुण असल्यानें त्याच्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'श्रोत्रग्राह्य' असें म्हटलें आहे. रूपादिक गुण श्रोत्रग्राह्य नसल्यानें त्यांवर अतिव्याप्ति जात नाहीं. तो शब्द संयोगज, विभागज व शब्दज असा तीन प्रकारचा आहे. जसा भेरी व दंड यांच्या संयोगापसून होणारा भां-

निवारण करण्यासाठीं 'संस्कारमात्रजन्य' ह्या विशेषणाचा उपयोग केला आहे. त्यामुळें अनुभव संस्कारमात्रजन्य ज्ञान नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति होत नाहीं. आतां जें संस्कारमात्रजन्य असतें त्यास 'स्मृति' असें म्हटल्यास संस्काराचा ध्वंस ही फक्त संस्कारापासूनच होत असल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जाते. ती न जावी म्हणून लक्षणांत 'ज्ञान' हें विशेष्य घातलें आहे. त्यामुळें ध्वंस ज्ञान नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. कारण ध्वंसाला त्याचा प्रतियोगी कारण असतो. त्यामुळें संस्कारध्वंसामध्येंही संस्कारजन्यत्व आहेच. (संस्कार असल्यावाचून त्याचा नाश कसा होईल?) म्हणून तो कारण होय. प्रत्यभिज्ञेवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'मात्र' असें पद घातलें आहे. (प्रत्यभिज्ञा म्हणजे एकदा जाणलेल्यास पुन्हा ओळखणें. हें ज्ञान इंद्रिय व अर्थ यांचा संनिकर्ष व स्मरण यांपासून होत असतें. म्हणून तें फक्त संस्कारापासूनच होतें असें म्हणतां येत नाहीं.)

(प०) संस्कारेति । संस्कारध्वंसेऽतिव्याप्तिवारणाय ज्ञानमिति । अनुभवेऽतिव्याप्तिवारणाय संस्कारजन्यमिति । तथापि प्रत्यभिज्ञायामतिव्याप्तिवारणाय संस्कारमात्रजन्यत्वं विवक्षणीयम् । क्वचित्तथैव पाठः । न चैवं तस्यसंभवस्तस्य संस्कारजन्यत्वे सतीन्द्रियार्थसंनिकर्षाजन्यार्थकत्वात् ॥

(प० भा०) संस्कारध्वंसावर अतिव्याप्ति न जावी यास्तव 'ज्ञान' असें पद घातलें आहे. अनुभवावर अतिव्याप्ति न जावी म्हणून 'संस्कारजन्य' असें पद घातलें आहे. तथापि प्रत्यभिज्ञेवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'संस्कारमात्रजन्यत्व' येथें विवक्षित आहे. कित्येक ठिकाणीं तसाच पाठ आहे. अहोपण असें म्हटल्यास असंभव हा दोष येईल; असें म्हणतां येत नाहीं. कारण त्या म्हणण्याचा 'संस्कारजन्य असून इंद्रिय व अर्थ ह्यांच्या संनिकर्षापासून उत्पन्न न होणें' हा अर्थ आहे. (त्यामुळें आत्ममनःसंयोगादिकासारखीं निमित्त कारणें असल्यास हरकत नाहीं.)

तद्भिन्नं ज्ञानमनुभवः । स द्विविधः । यथार्थोऽयथार्थश्च ॥

(त० भा०) स्मृतीहून भिन्न ज्ञानास अनुभव असें म्हणतात. तो यथार्थ व अयथार्थ असा दोन प्रकारचा आहे.

( न्या० ) अनुभवं लक्षयति–तद्भिन्नमिति । तद्भिन्नत्वं नाम स्मृतिभिन्नत्व-विशिष्टज्ञानत्वमनुभवस्य लक्षणम् । तत्र विशेषणानुपादाने स्मृतावतिव्याप्तिः विशेष्यानुपादाने घटादावतिव्याप्तिस्तद्वारणाय विशेषणविशेष्ययोरुभयोरुपादानम् । अनुभवं विभजते–स द्विविध इति ॥

**( न्या० भा० )** ' तद्भिन्न० ' या वाक्यानें अनुभवाचें लक्षण करितात. तद्भिन्न म्हणजे स्मृतीहून वेगळें. स्मृतिभिन्नत्वानें विशिष्ट जें ज्ञानत्व तें अनुभवाचें लक्षण होय. त्यांपैकीं विशेषण न घेतां ' जें ज्ञान तो अनुभव ' म्हटल्यास स्मरण हेंही ज्ञान असल्यामुळें त्यावर अनुभवलक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं ' स्मृतिभिन्न ' हें विशेषण घेतलें पाहिजे. म्हणजे स्मृति ही स्मृतिभिन्न नसल्यामुळें आतां तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. ' ज्ञान ' हें विशेष्य न घेतल्यास घटादिक ही स्मृतीहून भिन्न असल्यामुळें त्यांवर अतिव्याप्ति जाईल. ती न जावी यासाठीं ' ज्ञान ' असें म्हटलें आहे. म्हणजे घटादि पदार्थ ज्ञान नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. म्हणून त्या दोन्ही अतिव्याप्तींचें निवारण करण्यासाठीं विशेषण व विशेष्य या दोघांचेंही ग्रहण केलें आहे. ' स द्विविधः ' यानें अनुभवाचा विभाग करितात.

( प० ) तादिति । स्मृतित्वावच्छिन्नभिन्नमित्यर्थः । तेन यत्किंचित्स्मृतिभिन्नत्वस्य स्मृतौ सत्त्वेऽपि न क्षतिः । घटादावतिव्याप्तिवारणाय ज्ञानमिति । स्मृतिवारणाय तद्भिन्नमिति ॥

**( प० भा० )** स्मृतित्वानें अवच्छिन्न जेवढ्या स्मृती आहेत, त्या सर्वांहून भिन्न असा अर्थ. त्यामुळें एखाद्या स्मृतीहून भिन्न असणें हा धर्म एखाद्या स्मृतीवर जरी असला तरी कांहीं दोष नाहीं, कारण ती स्मृतीही स्मृतित्वानें अवच्छिन्न आहेच. त्याहून भिन्न नाहीं. घटादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' ज्ञान ' असें पद घातलें आहे. स्मृतीवरील अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' तद्भिन्न ' असें म्हटलें आहे.

तद्वति तत्प्रकारकोऽनुभवो यथार्थः सैव प्रमेत्युच्यते ॥

( त० भा० ) तद्वानामध्यें जो तत्प्रकारचा अनुभव त्यास यथार्थ अनुभव म्हणतात. त्यासच ' प्रमा ' असें म्हणतात. ( जो

पदार्थ जशा प्रकारचा असतो तो तसाच भासणें. रजताचें हें रुपें असें ज्ञान झालें तर तो यथार्थ अनुभव होय. )

( न्या॰ ) यथार्थानुभवं लक्षयति–तद्वतीति । तद्वतीत्यत्र सप्तम्यर्थो विशेष्यत्वम् । तच्छब्देन प्रकारीभूतो धर्मो धर्तव्यः । तथाच तद्वद्विशेष्यकत्वे सति तत्प्रकारकानुभवत्वं यथार्थानुभवस्य लक्षणम्। उदाहरणम्–रजते 'इदं रजतम्' इति ज्ञानम् । तद्वन्निष्ठविशेष्यतानिरूपिततन्निष्ठप्रकारताशालित्वमिति निष्कर्षः । अन्यथा यथाश्रुते रङ्गरजतयोरिमे रजतरङ्गे इत्याकारकसमूहालम्बनभ्रमेऽतिव्याप्तिः। तत्रापि रजतत्ववद्विशेष्यकत्वरजतत्वप्रकारकत्वयो रङ्गत्ववद्विशेष्यकत्वरङ्गत्वप्रकारकत्वयोः सत्त्वात् । उक्तनिष्कर्षे तु नातिव्याप्तिः रजतत्वप्रकारताया रजतत्ववद्विशेष्यतानिरूपितत्वाभावात्। एवं रङ्गत्वप्रकारताया रङ्गत्ववद्विशेष्यतानिरूपितत्वाभावात् । किंतु समूहालम्बनभ्रमस्य रङ्गांशे रजतत्वावगाहित्वेन रजतत्वप्रकारताया रङ्गत्ववद्विशेष्यतानिरूपितत्वात् । एवं रजतांशे रङ्गत्वावगाहित्वेन रङ्गत्वप्रकारताया रजतत्ववद्विशेष्यतानिरूपितत्वाच्चेति । नानामुख्यविशेष्यताशालि ज्ञानं समूहालम्बनम् ॥

( न्या॰ भा॰ ) 'तद्वति॰' या वाक्यानें यथार्थ अनुभवाचें लक्षण करितात. 'तद्वति' या ठिकाणच्या सप्तमीचा अर्थ 'विशेष्यत्व' असा आहे. 'तद्वति' येथील तच्छब्दानें प्रकार झालेला ( विशेषणरूप ) धर्म घ्यावा. अर्थात् 'तद्वद्विशेष्यकत्व असून तत्प्रकारकानुभवत्व' हें यथार्थ अनुभवाचें लक्षण आहे. उदाहरणः— रुप्याचें हे रुपें आहे, असें ज्ञान. अशा ज्ञानास यथार्थ अनुभव म्हणतात. या ज्ञानांत रजतत्व या धर्मानें युक्त जें रजत तें विशेष्य असून रजतत्व हें विशेषण आहे. तद्वतावर ( रजतत्ववान् अशा रजतावर ) असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली जी त्यावर ( रजतत्वावर ) असणारी प्रकारता ( विशेषणता ) तिनें शोभणारें ज्ञान, असा याचा तात्पर्यार्थ आहे. असें न म्हटल्यास व वरच्या प्रमाणेंच म्हटल्यास ( निष्कर्ष न काढितांच यथार्थानुभवाचें लक्षण ठेविल्यास ) समूहालंबनावर त्याची अतिव्याप्ति जाते. रंग (जस्त) व रुपें यांचें ठिकाणीं अनुक्रमें रुपें व रंग असा भास होणें हा समूहालंबन भ्रमाचा आकार आहे. तेव्हां यांत सुद्धां रजतत्ववान् असें रजत हें विशेष्य असून रजतत्व हा प्रकार-( रंगावर कां होईना पण तो-) ही आहे व रंगत्ववान् जो रंग तें विशेष्य असून रंगत्व हा प्रकारही ( रजतावरच

कां होईना पण ) आहे. म्हणजे समूहालंबन भ्रमरूपी एका ज्ञानांतही ' तद्वति तत्प्रकारकत्व ' हें यथार्थानुभवाचें लक्षण आहे. म्हणून त्यावर अतिव्याप्ति जाते. परंतु या लक्षणाचा वरील प्रमाणें निष्कर्ष काढिला म्हणजे मात्र ती जात नाहीं. कारण मग रजतत्वावर असणारी जी रजताची प्रकारता ती रजतत्ववान् अशा रजतावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली नसते ( तर ती प्रकारता रंगावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली असते. ) व तशीच रंगत्वावर असणारी प्रकारता रंगत्ववान् अशा रंगावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली नसते. ( तर रजतनिष्ठ विशेष्यतेनें ती दाखविलेली असते. ) समूहालंबनभ्रमांत रंग या अंशावर रजत भासल्यामुळें रजतत्वावरील प्रकारता रंगत्ववान् रंगावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली असते. व रजत या अंशावर रंग भासल्यामुळें रंगत्वावरील प्रकारता रजतत्ववान् रजतावर असणाऱ्या विशेष्यतेकडून दाखविली जाते. म्हणून या समूहालंबन भ्रमांत तद्वन्निष्ठ ( रजतादिनिष्ठ ) विशेष्यतेनें दाखविलेलें जे तन्निष्ठ ( रजतत्वनिष्ठ ) प्रकारताशालि ( शोभणारें, युक्त, ) ज्ञानत्व हें यथार्थानुभवाचें लक्षण येत नसल्यामुळें अतिव्याप्ति जात नाहीं. ज्या ज्ञानांत वेगवेगळ्या मुख्य विशेष्यता असतात त्या ज्ञानास समूहालंबन ज्ञान म्हणतात.

( प० ) तद्वतीति । तद्वति तत्प्रकारो यस्य स तथेत्यर्थः । तद्वद्विशेष्यकत्वे तत्प्रकारक इति यावत् । स्मृतिवारणायानुभव इति । अयथार्थानुभववारणाय तद्वतीति । निर्विकल्पकेऽतिव्याप्तिवारणाय तत्प्रकारक इति ॥

( प० भा० ) ज्या ज्ञानांत तद्वतावर तो प्रकार असतो तो यथार्थानुभव, होय. ' ज्यात तद्वान् विशेष्य आहे व तें प्रकार आहे तो यथार्थानुभव' असा याचा निष्कर्ष आहे. तद्वानावर तत्प्रकारक स्मृतिही होत असल्यामुळें म्हणजे स्मृतींतही रजतावर रजतत्व असल्यानें तिच्यावरील अतिव्याप्ति दूर करण्यासाठीं ' अनुभव ' असें म्हटलें आहे. स्मृति अनुभव नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति होत नाहीं. 'तत्प्रकारक जो अनुभव तो यथार्थानुभव' असें म्हटल्यास अयथार्थानुभव सुद्धां तत्प्रकारक असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जाते. ती दूर करण्यासाठीं ' तद्वतावर ' असें पद घातलें आहे. अयथार्थानुभव ' तद्वतावर तत्प्रकारक ' नसल्यामुळें त्यावर

भातां अतिव्याप्ति जात नाहीं. निर्विकल्पक ज्ञानावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'तत्प्रकारक' असें म्हटलें आहे. म्हणजे तो निर्विकल्पक अनुभव निष्प्रकारकच असल्यानें तत्प्रकारक होत नाहीं. म्हणून त्यावर अतिव्याप्ति नाहीं.

तदभाववति तत्प्रकारकोऽनुभवोऽयथार्थः ॥

( त० भा० )–तदभाववानावर तत्प्रकारक अनुभवास अयथार्थ अनुभव म्हणतात. ( जो पदार्थ जशा प्रकारचा नसतो तशा प्रकारचा तो आहे असें जर एखाद्या पदार्थाविषयीं ज्ञान झालें तर तो अयथार्थ अनुभव होय. उदाहरणार्थ– आपल्यापुढें मोत्याची शिंप असली आणि तिचें आपल्याला हें रजत आहे असें ज्ञान झालें तर तो अयथार्थ अनुभव आहे व यालाच भ्रम असें म्हणतात )

( न्या० ) अयथार्थानुभवं लक्षयति–तदभाववतीति । अत्रापि पूर्ववत्तद-भाववन्निष्ठविशेष्यतानिरूपिततन्निष्ठप्रकारताशालिज्ञानत्वं विवक्षणीयम् । अन्यथा रङ्गरजतयोरिमे रङ्गरजते इत्याकारकसमूहालम्बनप्रमायामतिव्याप्तिः । एतस्य समूहालम्बनस्य रङ्गरजतोभयविशेष्यकत्वेन रजतत्वरङ्गत्वोभयप्रकारकत्वेन च रजतत्वाभाववद्रङ्गविशेष्यकत्वरजतत्वप्रकारकत्वयोः रङ्गत्वाभाववद्रजतविशेष्य-कत्वरङ्गत्वप्रकारकत्वयोश्च सत्त्वात् । निरुक्ते तु रजतांशे रजतत्वावगाहित्वेन रङ्गांशे रङ्गत्वावगाहित्वेन च रजतत्वप्रकारताया रजतत्वाभाववद्रङ्गविशेष्यता-निरूपितत्वाभावात् । एवं रङ्गत्वप्रकारताया रङ्गत्वाभाववद्रजतविशेष्यतानिरूपि-तत्वाभावान्नातिव्याप्तिः । उदाहरणम्–यथा शुक्तौ 'इदं रजतम्' इति ॥

( न्या० भा० ) 'तदभाववति०' असें अयथार्थानुभवाचें लक्षण करितात. याठिकाणीं सुद्धां पूर्वीप्रमाणें 'त्याच्या अभाववन्तावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली जी त्यावर असणारी प्रकारता, त्या प्रकारतेनें शोभणारें ज्ञानत्व हें अयथार्थानुभवाचें लक्षण, असें म्हणण्याची विवक्षा आहे. असें न केल्यास रंग म्हणजे कथील व रजत यांच्यावर अनुक्रमें रंग व रजत ( जीत भासले आहेत ) अशा प्रकारच्या समूहालंबनप्रमेवर अतिव्याप्ति जाते. कारण या समूहा-लंबनप्रमेमध्येंही रंग व रजत हीं दोन विशेष्यें असून रजतत्व व रंगत्व हीं दोन विशेषणें असल्यानें रजतत्वाचा अभाव ज्या रंगावर आहे असा रंग हा विशेष्य असून रजतत्व हें रजतावर विशेषणही आहे व रंगत्वाभाववान् जें रजत तें विशेष्य असून रंगत्व हा प्रकार

( विशेषणही ) रंगावर आहेच. तेव्हां 'तदभाववान् विशेष्य असून तत्प्रकारक अनुभवास अयथार्थ अनुभव', असें म्हटल्यास तशी स्थिति समूहालंबनप्रमेमध्येंही असल्यामुळें तिच्यावर अतिव्याप्ति जाते. त्यासाठीं वरील प्रमाणें येथेंही निष्कर्ष काढिला आहे. त्यामुळें रजत या अंशावर रजतत्वाचें ज्ञान झाल्यानें व रंग या अंशावर रंगत्वाचें ज्ञान झाल्यानें रजतत्वावर असणारी प्रकारता ही रजतत्वाच्या अभाववान् अशा रंगावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली नसते. तशीच रंगत्वावर असणारी प्रकारता ही रंगत्वाचा ज्या ठिकाणीं अभाव आहे अशा रजतावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली नाहीं. म्हणून समूहालंबनप्रमेवर अयथार्थ अनुभवाचें लक्षण येत नसल्यानें अतिव्याप्ति नाहीं. जसें शुक्तीवर हें रजत आहे असें वाटणें हे अयथार्थानुभवाचें उदाहरण आहे.

( प० ) तदभावेति । तदभाववद्विशेष्यकतत्प्रकारकोऽनुभवोऽयथार्थानुभव इत्यर्थः । यथा शुक्तौ 'इदं रजतम्' इति ज्ञानम् । स्मृतिवारणायानुभव इति । यथार्थानुभवेऽतिव्याप्तिनिरासाय तदभाववतीति । निर्विकल्पकवारणाय तत्प्रकारक इति ॥

( प० भा० )—तदभाववान् ज्यांत विशेष्य आहे व तो ज्यांत प्रकार आहे अशा अनुभवाला अयथार्थ अनुभव म्हणतात. जसें शिंपीवर हें रजत आहे असें ज्ञान. नुसतें जें तदभाववंतावर तत्प्रकारक ज्ञान असतें त्यास 'अयथार्थ अनुभव' असें म्हटल्यास खोट्या स्मृतींत सुद्धां तदभाववंतावर तो प्रकार असल्यामुळें अयथार्थ अनुभवाच्या लक्षणाची अतिव्याप्ति खोट्या स्मृतीवर जाते. ती न जावी यासाठीं 'अनुभव' असें पद घालावें. म्हणजे स्मृति अनुभव नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. आतां 'जो तत्प्रकारक असतो तो अयथार्थ अनुभव' असें म्हटल्यास यथार्थ अनुभवातही तो प्रकार असल्यामुळें त्याचेवर अतिव्याप्ति जाते. ती न जावी याकरितां 'त्याच्या अभाववतावर' असें म्हणावें म्हणजे यथार्थ अनुभवांत त्याच्या अभाववंतावर तो प्रकार नसल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. तदभाववंतावर जो अनुभव त्यास अयथार्थ अनुभव असें म्हटल्यास निर्विकल्पक ज्ञान सुद्धां तसेंच असल्यानें

त्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'तत्प्रकारक' असें म्हणावें. म्हणजे निर्विकल्पक ज्ञानांत कोणताच प्रकार नसल्यामुळें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं.

यथार्थानुभवश्चतुर्विधः। प्रत्यक्षानुमित्युपमितिशाब्दभेदात्॥

( त० भा० )—यथार्थ अनुभव प्रत्यक्ष, अनुमिति, उपमिति व शाब्द असा चार प्रकारचा आहे.

( न्या० ) यथार्थानुभवं विभजते–चतुर्विध इति॥

( न्या० भा० )—'चतुर्विधः,' यानें यथार्थ अनुभवाचा विभाग करितात.

( प० ) यथार्थेति। यथार्थानुभवः प्रत्यक्षमेवेति चार्वाकाः। अनुमितिरपीति काणादबौद्धाः। उपमितिरपीति नैयायिकैकदेशिनः। शाब्दमपीति नैयायिकाः। अर्थापत्तिरपीति प्राभाकराः। अनुपलब्धिरपीति भाट्टवेदान्तिनौ। साम्भविकैतिह्यकावपीति पौराणिकाः। चैष्टिकोऽपीति तान्त्रिकाः। एतेषां मतेऽस्वरसं संभाव्य तस्य चातुर्विध्यं स्वयं दर्शितम्॥

( प० भा० )—यथार्थ अनुभव प्रत्यक्ष या एकाच प्रकारचा आहे असें चार्वाक मानितात. अनुमितिही यथार्थ अनुभवाचाच भेद आहे असें काणाद व बौद्ध मानितात. तशीच उपमिति ही यथार्थ अनुभवच आहे असें नैयायिकांपैकीं कांहीं लोक मानतात. शाब्दही यथार्थ अनुभवच आहे असें नैयायिक मानतात. अर्थापत्तिही यथार्थ अनुभव आहे असें प्राभाकर मानितात व अनुपलब्धिही त्यापैकींच आहे असें भाट्ट व वेदांती मानितात. सांभविक व ऐतिह्यक अशीं दोन प्रमाणें पौराणिक अधिक मानितात. चैष्टिक हेंही त्यापैकींच आहे, असें तांत्रिक मानितात. या सर्वांच्या मताविषयीं आपली अरुचि आहे ( संमती नाहीं ) असें दाखवून तो यथार्थ अनुभव चार प्रकारचा आहे असें स्वतः दाखविलें आहे.

तत्करणमपि चतुर्विधं प्रत्यक्षानुमानोपमानशब्दभेदात्॥

( त० भा० )—त्याचें करण देखील प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, व शब्द अशा भेदानें चार प्रकारचें आहे.

( न्या० ) तत्करणमिति। फलीभूतप्रत्यक्षादिकरणं चतुर्विधमित्यर्थः। प्रत्यक्षादिचतुर्विधप्रमाणानां प्रमाकरणत्वं सामान्यलक्षणम्। एकैकप्रमाणलक्षणं तु वक्ष्यते प्रत्यक्षज्ञानेत्यादिना॥

( न्या० भा० )-तत्करण म्हणजे फलरूप प्रत्यक्षादि अनुभवाचें करण, चार प्रकारचें आहे असा इत्यर्थ. प्रत्यक्षादि चार प्रकारच्या प्रमाणाचें 'प्रमाकरणत्व' हें सामान्य लक्षण आहे. एकेका प्रमाणाचें लक्षण 'प्रत्यक्षज्ञानकरणम् प्रत्यक्षम्' असें पुढें सांगितलें जाईल.

( प० ) तदिति । यथार्थानुभवात्मकप्रमायाः करणमित्यर्थः ।

( प० भा० ) यथार्थ अनुभवात्मक जी प्रमा त्या प्रमेचें करण असा तत्करणं याचा इत्यर्थ आहे.

असाधारण कारणं करणम् ॥

( त० भा० )- जें असाधारण कारण तें करण होय.

( न्या० ) करणलक्षणमाह-असाधारणमिति । व्यापारवदसाधारणं कारणं करणमित्यर्थः । असाधारणत्वं च कार्यत्वातिरिक्तधर्मावच्छिन्नकार्यतानिरूपितकारणताशालित्वम् । यथा दण्डादेर्घटादिकं प्रत्यसाधारणकारणत्वम् । कार्यत्वातिरिक्तो घटत्वादिरूपो धर्मः तदवच्छिन्नकार्यता घटे तन्निरूपितकारणता दण्डे । अतो घटं प्रति दण्डः असाधारणकारणम् । भ्रम्यादिरूपव्यापारवत्त्वाच्च करणम् । साधारणत्वं च कार्यत्वावच्छिन्नकार्यतानिरूपितकारणताशालित्वम् । ईश्वरादृष्टादेः कार्यत्वावच्छिन्नं प्रत्येव कारणत्वात्साधारणकारणत्वम् ॥

( न्या० भा० )-'असाधारण०' खंडानें करणाचें लक्षण सांगतात. व्यापारवान् व असाधारण असें जें कारण तें करण होय असा इत्यर्थ. असाधारण म्हणजे कार्यत्वाहून वेगळ्या धर्मानें अवच्छिन्न जी कार्यता त्या कार्यतेनें दाखविलेली जी कारणता त्या कारणतेनें शोभणारें जें, तें असाधारण. ( ती कारणता ज्यावर असते तें असाधारण कारण होय.) जसें दंडादिक हें घटादि कार्याचें असाधारण कारण होय. येथें कार्यत्वाहून वेगळा जो घटत्वादि रूप धर्म त्यानें अवच्छिन्न जी कार्यता ती घटावर आहे व त्या कार्यतेनें दाखविलेली कारणता दंडावर आहे. म्हणून दंड हें घटाचें असाधारण कारण आहे व भ्रम्यादिरूप व्यापार त्याच्यावर रहात असल्यानें तो करण होऊं शकतो. कार्यत्वानें अवच्छिन्न अशा कार्यतेनें दाखविलेली जी कारणता ती ज्याच्यावर असते त्यास असाधारण कारण म्हणावें. ईश्वर, अदृष्ट इत्यादिक, कार्यत्वानें अवच्छिन्न जीं कार्यें त्या सर्वांना कारण असल्यानें ते असाधारण कारण होत.

५

आकाशें पुष्कळ आहेत असें मानण्यास कांहीं प्रमाण नाहीं. म्हणून तें एक आहे असें जें म्हटलें तें योग्यच आहे. ज्याचा सर्व मूर्तद्रव्यांशी संयोग झालेला असतो त्यास विभु म्हणतात व क्रियावान् पदार्थाला मूर्त म्हणतात. पृथ्वी, जल, तेज, वायु आणि मन हीं मूर्त द्रव्यें आहेत. पृथ्वी, जल, तेज, वायु, व आकाश या पांचांना 'भूतें' असें म्हणतात. ('भूत' हें पद वाचक व पांचभूतें हें त्याचें वाच्य आहे.) ज्यांचा विशेषगुण बाह्य इंद्रियांनी ग्राह्य असतो त्यांना 'भूत' असें म्हणतात.

(प०) शब्देति। शब्दो गुणो यस्य तत्तथा। असंभववारणाय शब्दगुणोभयम्। विभ्विति। सर्वमूर्तद्रव्यसंयोगित्वम्।

(प०भा०)–ज्याचा शब्द हा गुण आहे तें शब्दगुणक होय. असंभवदोषाचें निवारण करण्यासाठीं लक्षणांत 'शब्द व गुण' अशीं दोन्ही पदें घेतलीं आहेत. कारण नुस्ता शब्द हें आकाशाचें लक्षण संभवत नाहीं व नुस्ता 'गुण' हेंही आकाशाचें लक्षण संभवत नाहीं. ज्याचा सर्वमूर्तद्रव्याशीं संयोग झालेला असतो त्यास विभु असें म्हणतात.

अतीतादिव्यवहारहेतुः कालः स चैको विभुर्नित्यश्च ॥

(स० भा०)–भूत, वर्तमान, इत्यादि प्रकारच्या व्यवहाराला जो कारण होतो तो काल होय. तो एक, विभु व नित्य आहे.

(न्या०) कालं लक्षयति–अतीतेति। व्यवहारहेतुत्वस्य लक्षणत्वे घट इति व्यवहारहेतुभूतघटादावतिव्याप्तिः। तद्वारणाय अतीतादीति विशेषणोपादानम्॥

(न्या०भा०)–'अतीत०' इत्यादि ग्रंथानें कालाचें लक्षण करितात. व्यवहाराला कारण होणें एवढेंच जर कालाचें लक्षण केलें तर 'घट' अशा व्यवहाराला कारण होणारा जो घट त्यावर या कालाच्या लक्षणाची अतिव्याप्ति जाते. तिचें निवारण करण्याकरितां 'अतीतादि' या विशेषणाचें ग्रहण केलें आहे.

(प०)–अतीतेति। अतीत इत्यादिर्यो व्यवहारोऽतीतो भविष्यन्वर्तमान इत्यात्मकस्तस्यासाधारणहेतुः काल इत्यर्थः। नन्विदं लक्षणमाकाशेऽतिव्याप्तं व्यवहारस्य शब्दात्मकत्वादिति चेत्। न। अत्र हेतुपदेन निमित्तहेतोर्विवक्षितत्वात्। न चैवं कण्ठताल्वाद्यभिघातेऽतिव्याप्तिरिति वाच्यं, विभुत्वस्यापि निवेशात्।

( प० भा० )–भूत, भविष्यत्, वर्तमान, अशाप्रकारच्या व्यवहाराचें असाधारण कारण काळ आहे, असा याचा इत्यर्थ-'अहोपण हें काळाचें लक्षण आकाशावर अतिव्याप्त होतें. कारण व्यवहार शब्दात्मक असतो व शब्द हा आकाशाचा गुण आहे.' म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण या ठिकाणीं 'हेतु' या पदाचा अर्थ 'निमित्त कारण' असा विवक्षित आहे. शब्द व्यवहाराचें निमित्त कारण नाहीं. काळ आहे. त्यामुळें आकाशांत लक्षण अतिव्याप्त होत नाहीं. पण 'येथें हेतु म्हणजे निमित्त कारण असें म्हटल्यास कंठ व तालु इत्यादि स्थानीं वायूचा अभिघात होऊन शब्दाचा व्यवहार होत असल्यामुळें अभिघातामध्यें काळाच्या लक्षणाची अतिव्याप्ति होते' म्हणून म्हणाल तर तसेंही म्हणूं नये. कारण काळाच्या लक्षणांत विभुत्वाचाही संनिवेश करावा. म्हणजे कंठ व तालु इत्यादिस्थानीं होणारा अभिघात विभु नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जाणार नाहीं.

प्राच्यादिव्यवहारहेतुर्दिक् । सा चैका नित्या विभ्वी च ॥

( त० भा० )–पूर्व, पश्चिम, इत्यादि व्यवहाराला जी कारण होते ती दिशा होय. ती एक, नित्य, व विभु आहे.

( न्या० ) दिशो लक्षणमाह–प्राच्येति । उदयाचलसंनिहिता या दिक् सा प्राची । अस्ताचलसंनिहिता या दिक्सा प्रतीची । मेरोः संनिहिता या दिक् सोदीची । मेरोर्व्यवहिता या दिक् सावाची ॥

( न्या० भा० ) 'प्राच्यादि०' इत्यादि वाक्यानें दिशेचें लक्षण करितात. उदयपर्वताच्या जवळ असणाऱ्या दिशेला पूर्व म्हणतात. अस्ताचलाच्या जवळ असणाऱ्या दिशेला पश्चिम म्हणतात. मेरुपर्वताच्या जवळच्या दिशेला उत्तर म्हणतात. मेरूच्या पलीकडे असलेल्या दूरच्या दिशेला दक्षिण म्हणतात.

( प० )–प्राचीति । इयं प्राचीयमवाचीयं प्रतीचीयमुदीचीत्यादिव्यवहारासाधारणं कारणं दिगित्यर्थः । हेतुर्दिगित्युच्यमाने परमाण्वादावतिव्याप्तिः स्यात्तद्वारणाय प्राच्यादिव्यवहारहेतुरिति । आकाशादिवारणायासाधारणेत्यपि बोध्यम् ॥

( प० भा० ) 'ही पूर्व, ही पश्चिम, ही उत्तर, ही दक्षिण' अशा व्यवहाराचें असाधारण कारण दिशा आहे, असा भावार्थ. 'जें कारण असतें ती दिशा' असें दिशेचें लक्षण केल्यास परमाणु सर्व

लक्षणाची अतिव्याप्ति होणार नाहीं. ईश्वर समवायसंबंधानें नित्यज्ञानवान् आहे व जीव सुखादिकांचें समवायिकारण आहे असा भावार्थ.

सुखाद्युपलब्धिसाधनमिन्द्रियं मनः। तच्च प्रत्यात्मनियतत्वादनन्तं परमाणुरूपं नित्यं च ॥

( त० भा० ) सुखादिकांच्या ज्ञानाला कारण होणारें जें इंद्रिय तें मन होय. तें प्रत्येक आत्म्याला अवश्य असल्यानें अनंत, परमाणुरूप, व नित्य आहे.

( न्या० ) मनो निरूपयति–सुखादीति। उपलब्धिर्नाम साक्षात्कारः। तथाच सुखदुःखादिसाक्षात्कारकारणत्वे सति इन्द्रियत्वं मनसो लक्षणम्। इन्द्रियत्वमात्रोक्तौ चक्षुरादावतिव्याप्तिः। अतः सुखादिसाक्षात्कारकारणत्वविशेषणम्। विशेष्यानुपादाने आत्मन्यतिव्याप्तिः। आत्मनः सुखादिकं प्रति समवायिकारणत्वात्। अत इन्द्रियत्वरूपविशेष्योपादानम् ॥

( न्या० भा० )' सुखादि०' या खंडानें मनाचें निरूपण करितात. उपलब्धि म्हणजे साक्षात्कार. अर्थात् ' सुखदुःखादिकांच्या साक्षात्काराचें कारण असून, जें इंद्रिय असतें तें मन ' असें मनाचें लक्षण आहे. ' जें इंद्रिय तें मन ' असेंच म्हटल्यास चक्षुरादिकही इंद्रियें असल्यानें त्यावर लक्षणाची अतिव्याप्ति होते. ती न व्हावी म्हणून ' सुखादिसाक्षात्काराचें कारण ' असें इंद्रियाला विशेषण दिलें आहे. वरें ' इंद्रिय ' हें पद न घालतां ' जें सुखादिकांच्या साक्षात्काराचें कारण तें मन ' एवढेंच मनाचें लक्षण केल्यास आत्माही सुखादिकांच्या ज्ञानाचें कारण असल्यानें मनोलक्षणाची त्यावर अतिव्याप्ति होते. ती न व्हावी म्हणून ' इंद्रिय ' हें पद, हेंच विशेष्य लक्षणांत अवश्य पाहिजे त्यामुळें आत्मा इंद्रिय नसल्यानें त्यांत मनोलक्षणाची अतिव्याप्ति होत नाहीं.

( प० )–सुखेति । आत्ममनःसंयोगादिवारणायेन्द्रियमिति । चक्षुरादिवारणाय सुखेति ॥

( प० भा० ) आत्मा व मन यांचा संयोगही सुखादिकांच्या ज्ञानाचें कारण आहे. कारण कोणत्याही ज्ञानास आत्ममनःसंयोग अवश्य आहे. यास्तव त्या आत्ममनःसंयोगांत मनोलक्षणाची अतिव्याप्ति न व्हावी म्हणून ' इंद्रिय ' हें पद लक्षणांत घातलें आहे.

संयोग गुण आहे इंद्रिय नव्हे. ह्मणून त्यांत 'इंद्रिय' असें घातल्यानें अतिव्याप्ति होत नाहीं. बरें 'जें उपलब्धीचें साधन इंद्रिय तें मन' असें मनाचें लक्षण केल्यास घटादिकांच्या उपलब्धीचें—ज्ञानाचें साधन चक्षुहि आहे व 'चक्षु' इंद्रियही आहे. त्यामुळें मनाचें लक्षण त्यांत अतिव्याप्त होतें. तें होऊं नये ह्मणून 'सुखादि' या विशेषणाची आवश्यकता आहे. चक्षुरादि इंद्रियें सुखादिकांच्या साक्षात्काराला कारण होत नाहींत. त्यामुळें त्यांवर अतिव्याप्ति जात नाहीं.

> चक्षुर्मात्रग्राह्यो गुणो रूपम्। तच्च शुक्लनीलपीतरक्तहरितकपिशचित्रभेदात्सप्तविधम्। पृथिवीजलतेजोवृत्ति। तत्र पृथिव्यां सप्तविधम्। अभास्वरशुक्लं जले। भास्वरशुक्लं तेजसि॥

(स० भा०) फक्त डोळ्यानेंच ग्राह्य—जाणण्यास योग्य असलेल्या गुणास रूप असें ह्मणतात. तें रूप शुक्ल, नील, रक्त, हरित, पीत, कपिश, व चित्र असें सात प्रकारचें आहे. तें रूप पृथ्वी, जल व तेज या द्रव्यांवर राहतें. त्यापैकीं पृथ्वीवर सातही प्रकारचें राहतें. अभास्वर शुक्लरूप जलांत आणि भास्वर शुक्लरूप तेजांत असतें.

(न्या०) रूपं लक्षयति—चक्षुरिति। चक्षुर्मात्रग्राह्यत्वविशिष्टगुणत्वं रूपस्य लक्षणम्। विशेष्यमात्रोपादाने रसादावतिव्याप्तिः। अनश्चक्षुर्मात्रग्राह्यत्वविशेषणम्। तावन्मात्रोपादाने रूपत्वेऽतिव्याप्तिः। यो गुणो यदिन्द्रियग्राह्यस्तन्निष्ठा जातिस्तदिन्द्रियग्राह्येति नियमात्तद्वारणाय विशेष्योपादानम्। चक्षुर्मात्रग्राह्यत्वं नाम चक्षुर्भिन्नेन्द्रियाग्राह्यत्वे सति चक्षुर्ग्राह्यत्वम्। मात्रपदानुपादाने संख्यादिसामान्यगुणेऽतिव्याप्तिः। संख्यादावपि चक्षुर्ग्राह्यत्वविशिष्टगुणत्वस्य सत्त्वात्। अतस्तद्वारणाय मात्रपदम्। संख्यादेश्चक्षुर्भिन्नत्वगिन्द्रियग्राह्यत्वाच्चक्षुर्मात्रग्राह्यत्वं नास्ति। (अतीन्द्रियगुरुत्वादावतिव्याप्तिवारणाय चक्षुर्ग्राह्येति)। अत्र लक्षणे ग्राह्यत्वं नाम प्रत्यक्षविषयत्वम्। अग्राह्यत्वं नामतदविषयत्वम्। तथा च चक्षुर्भिन्नेन्द्रियजन्यप्रत्यक्षाविषयत्वे सति चक्षुर्जन्यप्रत्यक्षविषयत्वमिति फलितोऽर्थः। ननु प्रभाघटसंयोगे रूपलक्षणस्यातिव्याप्तिस्तस्य चक्षुर्मात्रग्राह्यगुणत्वादिति चेन्न। गुणपदस्य विशेषगुणपरत्वात्। न चैवं विशेषगुणत्वघटितलक्षणे संख्यादावतिव्याप्त्यभावान्मात्रपदवैयर्थ्यमिति वाच्यम्। जलमात्रवृत्तिसांसिद्धिकद्रवत्वादावतिव्याप्तिवारणाय तदुपादानात्। अथवा चक्षुर्मात्रग्राह्यजातिमद्गुणत्वस्य लक्षणत्वान्न प्रभाघटसंयोगादावति-

व्याप्तिः। संयोगत्वजातेश्चक्षुर्मात्रग्राह्यत्वाभावात्। घटपटसंयोगस्य त्वगिन्द्रियग्राह्यत्वात्तद्गतजातेरपि त्वगिन्द्रियग्राह्यत्वात्। यो गुणो यदिन्द्रियग्राह्यस्तन्निष्ठजातेरपि तदिन्द्रियग्राह्यत्वात्। अत्र जातिघटितलक्षणे गुणत्वानुपादाने चक्षुर्मात्रग्राह्यजातिमति सुवर्णादावतिव्याप्तिरतस्तद्वारणाय तदुपादानम्। एवं रसादिलक्षणे विशेषणानुपादाने लक्ष्यभिन्नगुणादावतिव्याप्तिः। विशेष्यानुपादाने लक्ष्यमात्रवृत्तिरसत्वगन्धत्वादावतिव्याप्तिः। अतो विशेषणविशेष्ययोरुपादानम्॥

(न्या० भा०)'चक्षु०' इत्यादि वाक्यानें रूपाचें लक्षण करितात. 'चक्षुर्मात्रग्राह्यत्व या विशेषणानें विशिष्ट असें गुणत्व,' हें रूपाचें लक्षण आहे. आता फक्त 'गुण' हें विशेष्यच घेतल्यास रसादिकहि गुण असल्यानें त्यांच्यावर रूपलक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं 'चक्षुर्मात्रग्राह्य' असें विशेषण घातलें पाहिजे. तें घातलें म्हणजे रसादि गुण चक्षुर्मात्रग्राह्य नसल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. बरें 'जें चक्षुर्मात्रग्राह्य असतें तें रूप' एवढेंच लक्षण केल्यास 'रूपत्व' या जातीवर त्याची अतिव्याप्ति जाते. कारण रूपत्व ही जाती देखील चक्षुर्मात्रग्राह्य आहे. कारण कीं जो गुण ज्या इंद्रियानें समजतो त्यावरील जाती व तिचा अभावही त्याच इंद्रियानें समजतो, असा नियम आहे. यास्तव त्या जातीवरील अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'गुण' या विशेष्याचा लक्षणांत निवेश केला पाहिजे.तो केला म्हणजे रूपत्व ही जाति गुण नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. चक्षुर्मात्रग्राह्य म्हणजे चक्षूहून भिन्न इंद्रियानें अग्राह्य असून केवळ चक्षूनें ग्राह्य असणें. 'चक्षुर्मात्रग्राह्य' येथील 'मात्र' हें पद न घेतल्यास संख्यादि सामान्यगुणावर अतिव्याप्ति जाते. तिचें निवारण करण्यासाठीं 'मात्र' हें पद घातलें आहे. नाहींतर संख्यादि सामान्य गुण देखील चक्षूनीं ग्राह्य असून गुण आहेतच. म्हणून 'मात्र' पद अवश्य आहे. तें घातल्यानें संख्यादिक चक्षूहून निराळ्या त्वगिंद्रियानेंही ग्राह्य असल्यानें त्यावरील अतिव्याप्तीचें निवारण होतें. अतींद्रिय असलेले जे गुरुत्वादि गुण त्यांवर या रूपाच्या लक्षणाची अतिव्याप्ति न जावी म्हणून नुस्तें 'जो ग्राह्य गुण तें रूप' असें लक्षण न करिता 'चक्षुर्ग्राह्य' असें म्हटलें आहे. त्यामुळें 'चक्षुर्ग्राह्य' नसून नुस्ते 'ग्राह्य' असलेल्या गुरुत्वादिकाचें निवारण होतें. या लक्षणांतील 'ग्राह्य'

ह्मणजे प्रत्यक्ष प्रमाणाचा विषय होण्यास योग्य व अग्राह्य ह्मणजे त्याचा अविषय. 'अर्थात् चक्षूहून वेगळ्या इंद्रियांनीं होणाऱ्या प्रत्यक्षाचा विषय नसून जो गुण चक्षूनें होणाऱ्या प्रत्यक्षाचा विषय असतो तें रूप' हा 'चक्षुर्मात्रग्राह्य' याचा फलितार्थ झाला. 'अहो-पण प्रभा व घट यांच्या संयोगावर तुमच्या या रूपलक्षणाची अतिव्याप्ति जाते. कारण तो संयोग सुद्धां फक्त चक्षूनेंच समजणारा असून गुणही आहे' असें म्हणाल तर तसें ह्मणतां येत नाहीं. कारण याठिकाणीं 'गुण हें पद 'विशेष गुण' या अर्थी आहे. संयोग हा सामान्य गुण आहे. त्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. 'अहोपण विशेषगुणत्वानें घटित असें लक्षण केलेलें असल्यामुळें संख्यादि सामान्यगुणांवर अतिव्याप्ति जात नाहीं. त्यामुळें 'मात्र' हें पद व्यर्थ होतें' असें जर म्हणाल तर तसेंही म्हणतां येत नाहीं. कारण फक्त जलामध्येंच असणारा जो सांसिद्धिक द्रवत्वरूप गुण त्याच्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'मात्र' हें पद घातलें आहे. तें नसतें तर सांसिद्धिकद्रवत्व गुणही चक्षुर्ग्राह्य असून विशेषगुणही असल्यानें रूपलक्षणाची त्याचेवर अतिव्याप्ति गेली असती. कारण सांसिद्धिकद्रवत्व गुण चक्षुर्मात्रग्राह्य नाहीं तर चक्षूहून भिन्न अशा त्वगिंद्रियानेंही ग्राह्य आहे. ह्मणून त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. किंवा 'फक्त चक्षूनींच ग्राह्य जी जाति ती जाति ज्या गुणावर राहते तें रूप' असें लक्षण केल्यामुळें आतां प्रभा व घट यांच्या संयोगादिकांवर अतिव्याप्ति जात नाहीं. कारण संयोगत्व ही जाति फक्त चक्षूनींच ग्राह्य नाहीं. तर घट व पट यांचा संयोग त्वगिंद्रियानेंही समजत असल्यामुळें त्या संयोगावर असणारी संयोगत्व जाति देखील त्वगिंद्रियानें समजते. कारण जो गुण ज्या इंद्रियानें समजतो त्यावर असणारी जातीसुद्धां त्याच इंद्रियानें समजते, असा नियम आहे. जातीनें घटित अशा या लक्षणामध्यें 'गुणत्व' असें पद जर घातलें नाहीं तर चक्षुनेंच ग्राह्य अशी सुवर्णत्वादि जाति ज्यावर राहते त्या सुवर्णादिकांत रूपलक्षणाची अतिव्याप्ति होते. ती न व्हावी म्हणून 'गुण' असें पद घातलें आहे. त्यामुळें सुवर्ण हा गुण नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं.

अशाच रीतीनें रसादि गुणांच्या लक्षणामध्यें विशेषणें न घातल्यास लक्ष्य गुणाहून भिन्न गुणावर अतिव्याप्ति जाऊं लागेल. ती न जावी म्हणून विशेषणें घातलीं पाहिजेत. तसेंच विशेष्यें न घातल्यास लक्ष्यावर असणाऱ्या रसत्व, गंधत्व इत्यादि जातींवर अतिव्याप्ति जाऊं लागेल. ती दूर करण्यासाठीं विशेष्यें ( गुण ) घातलीं पाहिजेत. येणेंप्रमाणें लक्षणांत विशेषण व विशेष्य या दोघांचेंहि ग्रहण केलें पाहिजे.

( प० )-चक्षुरिति । रूपत्वादिवारणाय गुणपदम् । रसादिवारणाय चक्षुर्ग्राह्य इति । संख्यादिवारणाय मात्रपदम् । यद्यपि प्रभाभित्तिसंयोगवारणाय गुणपदेन विशेषगुणस्य विवक्षणीयतया तत एव संख्यादिवारणं संभवतीति मात्रपदं व्यर्थं तथापि सांसिद्धिकद्रवत्ववारणाय तदावश्यकम् । वस्तुतस्तु परमाणुरूपेऽव्याप्तिवारणाय चक्षुर्मात्रग्राह्यजातिमत्त्वस्य विवक्षणीयतया विशेषणं न देयम् । त्र्यणुकादिवारणाय गुणपदं तु देयम् । रसेति । रूपमित्यनुषज्जते ॥

( प० भा० )-रूपत्वावर जाणाऱ्या रूपलक्षणाच्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' गुण ' हें पद घातलें आहे. रसादि विशेष गुणावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' चक्षुर्ग्राह्य ' असें म्हटलें आहे. संख्यादि सामान्य गुणांवर अतिव्याप्ति जाऊं नये म्हणून ' मात्र ' हें पद घातलें आहे. आतां प्रभा व भिंत यांच्या संयोगावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं येथील *गुणपदानें विशेष गुण विवक्षित आहेत. त्या* योगानेंच संख्यादि सामान्य गुणावरील अतिव्याप्तीचें निवारण होतें. *अर्थात् त्यासाठीं 'मात्र' पद जरी नको असलें, तरी* सांसिद्धिकद्रवत्व या गुणावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं रूपलक्षणांत ' मात्र ' हें पद आवश्यक आहे. *पण वास्तविक पाहतां* परमाणूंच्या रूपावर रूपलक्षणाची अव्याप्ति येते. कारण तें चक्षुर्मात्रग्राह्य नाहीं. *तेव्हां, ह्या अव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं* 'चक्षुर्मात्र ग्राह्य जाति ज्याला आहे तें रूप' 'असें चक्षुर्मात्रग्राह्य जातिमत्त्व' विवक्षणीय —विवक्षा करण्यास योग्य—असल्यामुळें गुणाला विशेष असें विशेषण देण्याचें कारण नाहीं. कारण रूपत्वजाति रूपावाचून दुसऱ्या कोठेंही नसते. पण त्र्यणुकावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण कर-

ण्यासाठी लक्षणांत ' गुण ' हें पद घातलें पाहिजे. तें न घातल्यास त्र्यणुकत्वरूपी जातीही चक्षुर्मात्रग्राह्य असल्यानें तिच्यावर लक्षणाची अतिव्याप्ति होईल. पण, गुण हें पद रूपलक्षणांत घातलें म्हणजे त्र्यणुक हें द्रव्य असल्यामुळें त्यामध्यें अतिव्याप्ति जात नाहीं. ' सप्तविधम् ' याचा ' रूपम् ' याच्याशीं अन्वय आहे.

रसनग्राह्यो गुणो रसः। स च मधुराम्ललवणकटुकषायतिक्तभेदात् षड्विधः। पृथिवीजलवृत्तिः। तत्र पृथिव्यां षड्विधः। जले मधुर एव॥

( त० भा० )—रसनेन्द्रियानें ज्याचें ग्रहण करतां येतें तो गुण रस होय. तो मधुर, अम्ल, लवण, कटु, कषाय व तिक्त असा सहा प्रकारचा आहे. तो पृथ्वी व जल यांवर रहातो. त्यांतील पृथ्वीवर वरील सहाहि प्रकारचा रस रहातो, व जलावर फक्त मधुरच रहातो.

( प० )—रसनेति। रसत्वादिवारणाय गुण इति। रूपादावतिव्याप्तिवारणाय रसनेति। तत्रेति। पृथिवीजलयोरित्यर्थः। षड्विध इति। अत्र रस इत्यनुवर्तते॥

( प० भा० )—जो रसनेनें ग्राह्य असतो तो रस असें म्हटल्यास रसत्व ही जातीहि रसनग्राह्य असल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जाईल. तिचें निवारण करण्यासाठीं ' गुण ' असें म्हटलें आहे. त्यामुळें जाति गुण नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाही. ' जो गुण तोच रस ' एवढेंच रसाचें लक्षण केल्यास रूपादिकही गुण असल्यानें त्यांच्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' रसनग्राह्य ' असें म्हटलें आहे, रूपादिक रसनग्राह्य नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति होत नाहीं. ' तत्र-' म्हणजे पृथ्वी व जल यातील. ' षड्विधः ' यापुढें ' रसः ' हें पद अनुवृत्त होतें.

घ्राणग्राह्यो गुणो गन्धः। स द्विविधः। सुरभिरसुरभिश्च। पृथिवीमात्रवृत्तिः॥

( त० भा० )—ज्याचें घ्राणेन्द्रियानें ग्रहण होतें त्या गुणास गंध म्हणतात. तो सुरभि व असुरभि असा दोन प्रकारचा आहे. तो पृथ्वीवर मात्र रहातो.

( प० )—घ्राणग्राह्य इति। गन्धत्वादावतिव्याप्तिवारणाय गुण इति। रूपादावतिव्याप्तिवारणाय घ्राणग्राह्य इति। पृथिवीसंबन्धसत्वे, गन्धप्रतीतिसत्त्वं पृथिवी-

संबन्धाभावे गन्धप्रतीत्यभाव इत्यन्वयव्यतिरेकाभ्यां पृथिवीगन्धस्यैव जले प्रतीतिर्बोध्या । एवं वायावपि । ननु देशान्तरस्थकस्तूरिकुसुमसंबद्धपवनस्यैतद्देशे तत्संबन्धाभावाद्गन्धप्रतीत्यनुपपत्तिः । न च वाय्वानीतत्र्यणुकादिसंबन्धोऽस्त्येवेति वाच्य । कस्तूर्यां न्यूनतापत्तेः कुसुमस्य च सच्छिद्रत्वापत्तेरिति चेन्न । भोक्तृदृष्टविशेषेण पूर्ववत्त्र्यणुकान्तरासुत्पत्तेः । कर्पूरादौ तु तदभावान्न तथात्वमिति ॥

( प० भा० )–' घ्राणग्राह्य ' एवढेंच म्हटल्यास गंधत्व ही जाती देखील घ्राणग्राह्य असल्यानें तिच्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठी 'गुण' हें पद घातलें आहे. म्हणजे गंधत्व ही जाति गुण नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. ' जो गुण असतो तो गंध ' असें म्हटल्यास रूपादिकही गुण असल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जाते. ती न जावी म्हणून घ्राणग्राह्य असें म्हटलें आहे. त्यामुळें रूपादि गुण घ्राणग्राह्य नसल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. 'पृथ्वीमात्रवृत्ति' या पदानें असें सांगितलें आहे-- पृथ्वीचा जलाशीं संबंध असेल तरच जलाला गंध असतो, व पृथ्वीचा त्याच्याशी संबंध नसल्यास त्याला गंधही नसतो. अशा अन्वय-व्यतिरेकव्याप्तीवरून पृथ्वीच्या गंधाचाच जलांत अनुभव येतो, असें समजावें. याच न्यायानें वायूंतहि पृथ्वीगंधाचाच अनुभव येतो. "अहोपण असें म्हटल्यास दुसऱ्या ठिकाणीं असलेल्या कस्तूरीशीं व पुष्पाशीं संबद्ध असलेल्या वायूचा गंध या प्रदेशीं प्रतीत होणें शक्य नाहीं. कारण या देशीं त्याचा कस्तूरिकादिकाशीं संबंध नसतो. बरें या प्रदेशीं वायूनें आणलेल्या कस्तूरिकादिकाच्या त्र्यणुकादिकांचा संबंध आहेच असें म्हणाल तर तसेंही म्हणतां येत नाहीं. कारण तसें झाल्यास कस्तूरी वजनांत कमी झाली पाहिजे. पण तसें तर होत नाहीं. तसेंच पुष्पालाही छिद्रें पडलीं पाहिजेत. पण तसेंही अनुभवास येत नाहीं. तेव्हां वायूवरच गंध राहतो असें म्हणण्यास काय हरकत आहे !" असें जर म्हणाल तर तसें म्हणतां येत नाहीं. कारण वायूंत जरी कस्तूरी गेली तरी भोक्त्याच्या एक प्रकारच्या अदृष्टामुळें पूर्वीप्रमाणें तेथें त्र्यणुकादिकांची उत्पत्ति होत असते व कर्पूरादिकांचे ठायीं त्र्यणुकादिक उत्पन्न होण्यास अनुकूल असें भोक्त्याचें अदृष्ट नसल्यानें तेथें ते उत्पन्न होत नाहींत.

त्वगिन्द्रियमात्रग्राह्यो गुणः स्पर्शः । स च त्रिविधः । शीतो-

शीतोष्णानुष्णाशीतभेदात्। पृथिव्यप्तेजोवायुवृत्तिः। तत्र शीतो जले। उष्णस्तेजसि। अनुष्णाशीतः पृथिवीवाय्वोः॥

(त० भा०)–त्वगिंद्रियमात्रग्राह्य जो गुण त्यास स्पर्श ह्मणतात. तो शीत, उष्ण व अनुष्णाशीत असा तीन प्रकारचा आहे. तो पृथ्वी, जळ, तेज व वायु यांवर राहतो. त्यांपैकीं शीतस्पर्श जळावर राहतो. उष्णस्पर्श तेजावर राहतो आणि उष्णही नाहीं व शीतही नाहीं असा मध्यम स्पर्श पृथ्वी व वायु यांवर राहतो.

(न्या०) स्पर्शं लक्षयति–त्वगिन्द्रियमात्रग्राह्येति। अत्रापि मात्रपदं संख्यादिसामान्यगुणादावतिव्याप्तिवारणाय। अन्यविशेषणकृत्यं पूर्ववद्बोध्यम्। ग्राह्यत्वपदार्थोऽपि पूर्ववदेव प्रत्यक्षविषयत्वरूप एव बोध्यः॥

(न्या० भा०)–त्वगिंद्रियमात्रग्राह्य या वाक्यानें स्पर्शाचें लक्षण करितात. येथेंही 'मात्र' पद संख्यादिसामान्यगुणांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं घातलें आहे. कारण हातानें चांचपून पाहिलें असतांही हे घट एकमेकांस लागलेले आहेत, ते दोन किंवा चार आहेत हें कळतें, ह्मणजे संयोग व संख्या इत्यादिकही त्वगिंद्रियग्राह्य असल्यानें त्यांच्यावर स्पर्शलक्षणाची अतिव्याप्ति जाऊं नये म्हणून 'मात्र' हें पद घातलें आहे. संयोग व संख्या हे गुण त्वक् व चक्षु या दोन्ही इंद्रियांनीं ग्रहण करितां येत असल्यामुळें ते फक्त त्वगिंद्रियानेंच ग्रहण करितां येतात असें नाहीं ह्मणून त्यांवर अतिव्याप्ति जात नाहीं. बाकीच्या विशेषणांचें कार्य–उपयोग पूर्वीप्रमाणेंच समजावा. 'ग्राह्य' या पदाचा अर्थही पूर्वीप्रमाणें ह्मणजे 'प्रत्यक्षाचा विषय होणें,' असाच समजावा.

(प०)-स्पर्शत्वादावतिव्याप्तिवारणाय गुण इति। रूपादावतिव्याप्तिवारणाय त्वगिन्द्रियेति। संख्यादिवारणाय मात्रपदम्। तत्रेति। पृथिव्यादिचतुष्टये। शीत इति शीतस्पर्शः। उष्ण इति उष्णस्पर्शः॥

(प० भा०)–स्पर्शत्वादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'गुण' असें ह्मटलें आहे. जाति गुण नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. 'जो गुण तो स्पर्श,' असें म्हटल्यास रूपादिकही गुण असल्यानें त्यांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'त्वगिंद्रियानें ग्राह्य' असें म्हटलें आहे, ह्मणजे रूपादिक गुण जरी असले तरी ते त्वगिंद्रियग्राह्य नाहींत. ह्मणून

अतिव्याप्ति जात नाहीं. सख्यादि गुणांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' मात्र ' पद घातलें आहे. ह्मणजे ते गुण त्वगिंद्रियमात्रग्राह्य नाहींत. ' तत्र ' म्हणजे पृथ्वी इत्यादि चार द्रव्यामध्यें. ' शीत ' ह्मणजे शीतस्पर्श व ' उष्ण ' ह्मणजे उष्णस्पर्श.

रूपादिचतुष्टय पृथिव्यां पाकजमनित्य च। अन्यत्रापाकज नित्यमनित्य च। नित्यगत नित्यम्। अनित्यगतमनित्यम्॥

( त० भा० )—रूपादि चार गुण पृथ्वीमध्यें पाकज ह्मणजे विजातीय तेज सयोगामुळें उत्पन्न होणारे व अनित्य असतात परतु इतर द्रव्यांमध्यें ते पाकज नसतात व तेथें ते नित्य व अनित्यही असतात ते नित्यद्रव्यांवर नित्य व अनित्यद्रव्यावर अनित्य असतात.

( न्या० )—रूपादिचतुष्टयमिति। एतत्तत्त्वनिर्णयश्चेत्थम्। पाको नाम विजातीयतेज सयोग। स च नानाजातीय। रूपजनको विजातीयस्तेज सयोग। तदपेक्षया रसजनको विजातीय। एव गन्धजनकोऽपि तथैव। एव प्रकारेण भिन्नभिन्नजातीया पाका कार्यवैलक्षण्येन कल्पनीया। यथा तृणपु ञ्जनिक्षिप्त आम्रादौ कृष्णलक्षणविजातीयतेज सयोगात्पूर्वहरितरूपनाशेन रूपा न्तरस्य पीतादेरुत्पत्तिर्न तु रसादेरुत्पत्ति। पूर्वरसस्याम्लस्यैवानुभवात्। क्वचि त्पूर्वहरितरूपसत्त्वेऽपि रसपरावृत्तिर्दृश्यते। विजातीयतेज सयोगरूपपाकवशात्पूर्व तनाम्लरसनाशेन मधुररसस्यानुभवात्। तस्माद्रूपजनकापेक्षया रसजनको विल क्षण एवाङ्गीकार्य। एव गन्धजनको विलक्षण एव। रूपरसयोरपरावृत्तावपि पूर्वगन्धनाशेऽपि विजातीयपाकवशात्सुरभिगन्धोपलब्ध। एव स्पर्शजनकोऽपि पाकवशात्कठिनस्पर्शनाशेन मृदुस्पर्शानुभवात्। तस्माद्रूपादिजनका विजातीया एव पाका। अत एव पार्थिवपरमाणूनामेकजातीयत्वेऽपि पाकमहिम्ना विजाती यद्रव्यान्तरानुभव। यथा गोभुक्ततृणादीनामापरमाण्वन्तभङ्गे तृणारम्भकपरमा णुषु विजातीयतेज सयोगात्पूर्वरूपादिचतुष्टयनाशे तदनन्तर दुग्धे यादृश रूपा दिक वर्तते तादृशरूपरसगन्धस्पर्शजनकास्तेज सयोगा जायन्ते। तदुत्तर तादृश रूपरसादय उत्पद्यन्ते। तादृशरूपरसादिविशिष्टपरमाणुभिर्दुग्धद्व्यणुकमारभ्यते। ततस्त्र्यणुकादिक्रमेण महादुग्धारम्भ। एव दुग्धारम्भकै परमाणुभिरेव दध्या रभ्यते पाकमहिम्ना। एव दध्यारम्भकैरेव परमाणुभिर्नवनीतादिकमिति दिक्॥

( न्या० भा० )—' रूपादिचतुष्टय० ' इत्यादि—याच्या तत्त्वाचा निर्णय ह्मणजे वस्तुस्थिति अशी आहे —पाक म्हणजे विजातीय तेजांचा सयोग. तो वेगवेगळ्या जातींचा असतो रूपाला उत्पन्न करणारा तेजाचा सयोग विजातीय म्हणजे निराळ्या जातीचा, त्याच्या अपे-

क्षेनें रसाला उत्पन्न करणारा तेजाचा संयोग निजातीय. अशाच रीतीनें गंधाला उत्पन्न करणारा तेजःसंयोगही त्याहून विजातीय असतो. त्याच न्यायानें स्पर्शाला उत्पन्न करणारा तेजः संयोगही तसाच ह० विजातीय असतो. अशा प्रकारें रूपादकार्यांच्या वैलक्षण्यावरून भिन्न भिन्न जातीच्या पाकांची कल्पना करावी. जसें, गवताचे ढिगात टाकलेल्या आम्रादिफलांवर उष्णरूपी तेजःसंयोगामुळें पूर्वीच्या हिरव्या रूपाचा नाश होऊन दुसऱ्या पिवळ्या, लाल वगैरे रूपांची उत्पत्ति होते. परंतु त्यानेंच रसाची उत्पत्ति होत नाहीं. कारण, पूर्वीचा रंग जरी बदलला तरी आंबट रसाचाच अनुभव येत असतो. कित्येक फळांचें पूर्वीचें हिरवें रूप तसेंच असतें, तें बदलत नाहीं, पण रस बदललेला दिसतो. कारण, विजातीय तेजःसंयोगरूपी पाकामुळें पूर्वीच्या आंबट रसाचा नाश होऊन गोड रसाचा अनुभव येतो. यास्तव रूपाला उत्पन्न करणाऱ्या तेजःसंयोगापेक्षां रसाला उत्पन्न करणारा तेजःसंयोग वेगळाच मानिला पाहिजे. असाच गंधाला उत्पन्न करणारा पाकही विलक्षणच--त्याहून वेगळाच मानिला पाहिजे. कारण रूप व रस यांचा बदल झाला नसतांना देखील, पूर्वीच्या गंधाचा नाश होऊन विलक्षण पाकामुळें सुवासिक गंधही अनुभवाला येतो. तसेंच, स्पर्शाला उत्पन्न करणाराही तेजःसंयोग वेगळा मानावा. कारण, पाकामुळें कठिण स्पर्शाचा नाश होऊन मृदु स्पर्शाचा अनुभव येतो. ह्मणून रूपादिकांना उत्पन्न करणारे तेजःसंयोग विजातीयच आहेत. ह्मणूनच पृथ्वीचे परमाणु जरी एका जातीचे असले तरी विजातीय तेजःसंयोगाच्या प्रभावानें वेगवेगळ्या द्रव्यांचा अनुभव येत असतो. जसें गाईनें खाल्लेले जे गवत इत्यादि पदार्थ त्यांचा परमाणूंपर्यंत नाश होऊन या गवताला आरंभ करणाऱ्या परमाणूंतील विजातीय तेजःसंयोगामुळें पूर्वी जे रूपादिगुण असतात तसल्या रूप, रस, गंध व स्पर्श यांना उत्पन्न करणारे तेजःसंयोग उत्पन्न होतात. त्यानंतर तसले रूपरसादि गुण उत्पन्न होतात, व तसल्या प्रकारच्या रूपरसादिकांनीं युक्त अशा परमाणूंनीं दुधाचे द्व्यणुक उत्पन्न होतात नंतर त्र्यणुक होतात व अशा क्रमानें महादुधाचा ह्मणजे आपण जसें दूध पाहतों तसल्या दुधाचीं

उत्पत्ति होते. अशा रीतीनेंच दुधाची उत्पत्ति करणाऱ्या परमाणूंनींच पाकाच्या प्रभावानें दह्याची उत्पत्ति केली जाते. अशाच रीतीनें दह्याचा आरंभ करणाऱ्या परमाणूंनीं लोणी इत्यादिकाची उत्पत्ति होते. असा या उत्पत्तीचा क्रम जाणावा.

एकत्वादिव्यवहारहेतुः संख्या। सा नवद्रव्यवृत्तिः। एकत्वादिपरार्धपर्यन्ता। एकत्वं नित्यमनित्यं च। नित्यगतं नित्यम्। अनित्यगतमनित्यम्। द्वित्वादिकं तु सर्वत्रानित्यमेव॥

( त० भा० )—एकत्वादि व्यवहाराच्या हेतूला संख्या असें म्हणतात. संख्या हा गुण नऊही द्रव्यांवर राहतो. संख्या एकत्वापासून परार्धापर्यंत आहे. त्यापैकीं एकत्व हें नित्य व अनित्य असें दोन प्रकारचें आहे. नित्यद्रव्यावरील एकत्व नित्य व अनित्यद्रव्यावरील अनित्य होय. परंतु द्वित्वादि सर्व संख्या सर्वस्थळीं अनित्यच असतात.

( प० ) एकत्वादीति। एकत्वमित्यादिर्यो व्यवहार एको द्वावित्याद्यात्मकस्तस्य हेतुः संख्या इत्यर्थः। घटादिवारणाय एकत्वादीति। कालादिवारणायासाधारणेत्यपि देयम्। ननु संख्याया अवधिरस्ति न वेत्यत आह—एकत्वादीति। तथा च ' एकं दश शतं चैव सहस्रमयुतं तथा। लक्षं च नियुतं चैव कोटिरर्बुदमेव च। वृन्दं खर्वो निखर्वश्च शङ्खः पद्मश्च सागरः। अन्त्यं मध्यं परार्धं च दशवृद्ध्या यथाक्रमम्। इति' महदुक्त परार्धपर्यन्तैव संख्या इति भाव॥

( प० भा० )—' एकत्वादि०-' ' एकत्वं ' इत्यादि जो एक, दोन अशा प्रकारचा व्यवहार त्याचा हेतु-कारण संख्या आहे ' जो व्यवहाराचा हेतु ती संख्या ' असें म्हटल्यास ' घट ' अशा व्यवहाराचें घटही कारण असल्यामुळें त्यावर संख्यालक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं ' एकत्वादि व्यवहाराचें कारण ' असें लक्षणात म्हटलें आहे. घट तशा व्यवहाराचें कारण होत नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. पण कालही एकत्वादि व्यवहाराचें कारण असल्यामुळें त्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' असाधारण ' असेंही विशेषण व्यवहाराला लावावें म्हणजे कालावर अतिव्याप्ति जाणार नाहीं. कारण काल कार्यमात्राचें साधारण कारण आहे.' अहोपण संख्येलाअवधि आहे किंवा नाहीं ? ' असें कोणी विचारील म्हणून' एकत्वादि ' यानें त्याचें उत्तर

सांगतात. एक, दश, शंभर हजार, दहा हजार, लक्ष, नियुत, कोटि, अर्बुद, वृंद, खर्व, निखर्व, शंख, पद्म, सागर, अन्त्य, मध्य, परार्ध, अशी उत्तरोत्तर दसपट वृद्धीनें क्रमानें संख्या होते, अशी थोरांची उक्ति असल्यामुळें संख्याही परार्धपर्यंतच आहे, असा भावार्थ.

मानव्यवहारासाधारणं कारणं परिमाणम्। नवद्रव्यवृत्ति। तच्चतुर्विधम्। अणु महद्दीर्घं ह्रस्वं चेति॥

( त० भा० )-परिमाणाच्या व्यवहाराचें जें असाधारण कारण तें परिमाण होय. तें नऊही द्रव्यांवर राहतें. तें अणु, महत्, दीर्घ, व ह्रस्व, असें चार प्रकारचें आहे.

( प० ) मानेति। मानं परिमितिस्तया यो व्यवहारः इदं महदिदमणु इत्याद्यात्मकः तस्य कारणं परिमाणमित्यर्थः। दण्डादिवारणाय मानेति। कालादिवारणायासाधारणेति। शब्दत्ववारणाय कारणमिति। नवद्रव्येति। चतुर्विधमपि परममध्यमभेदेन द्विविधम्। तत्र परमाणुत्वह्रस्वत्वे परमाणुमनसोः। मध्यमाणुह्रस्वत्वे द्व्यणुके। परममहत्त्वदीर्घत्वे गगनादौ। मध्यममहत्त्वदीर्घत्वे घटादौ। एतन्मौक्तिकादिदं मौक्तिकमीषदित्यव्यवहारस्यापकृष्टमहत्त्वाश्रयत्वाद्गौणत्वं बोध्यम्। एवमेव केतनाद्व्यजनं ह्रस्वमित्यत्रापि निकृष्टदीर्घत्वाद्गौणत्वम्॥

( प० भा० )-मान म्हणजे परिमिति; तिचा जो व्यवहार म्हणजे हें मोठें, हें अणु-सूक्ष्म, अशाप्रकारचा व्यवहार त्याचें जें कारण तें परिमाण होय. 'जें व्यवहाराचें कारण तें परिमाण,' एवढेंच म्हटल्यास ' दंड ' अशा व्यवहाराचें दंडही कारण होत असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जाते. ती न जावी म्हणून ' मान ' असें म्हटलें आहे. ' दंड ' मानव्यवहाराचें कारण नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. तसेंच कालावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' असाधारण ' असें म्हटलें आहे. त्यामुळें काल मानव्यवहाराचें साधारण कारण असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. शब्दत्वावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' कारण ' असें म्हटलें आहे. तें चार प्रकारचेंहि परिमाण परम व मध्यम 'या भेदानें दोन प्रकारचें आहे. त्यापैकीं परमाणुत्व व ह्रस्वत्व हीं परमाणु व मन यांवर असतात. मध्यमाणु व ह्रस्वत्व हीं द्व्यणुकांवर असतात. परममहत्त्व व दीर्घत्व हीं आकाशादिकांवर असतात. मध्यम महत्त्व व दीर्घत्व हीं घटादिकांवर राहतात. या मोत्यापेक्षां हें

उत्पत्ति होते. अशा रीतीनेंच दुधाची उत्पत्ति करणाऱ्या परमाणूंनींच पाकाच्या प्रभावानें दह्याची उत्पत्ति केली जाते. अशाच रीतीनें दह्याचा आरंभ करणाऱ्या परमाणूंनीं लोणी इत्यादिकांची उत्पत्ति होते. असा या उत्पत्तीचा क्रम जाणावा.

एकत्वादिव्यवहारहेतुः संख्या। सा नवद्रव्यवृत्तिः। एकत्वादिपरार्धपर्यन्ता। एकत्वं नित्यमनित्यं च। नित्यगतं नित्यम्। अनित्यगतमनित्यम्। द्वित्वादिकं तु सर्वत्रानित्यमेव॥

( त० भा० )–एकत्वादि व्यवहाराच्या हेतूला संख्या असें म्हणतात. संख्या हा गुण नऊही द्रव्यावर राहतो. संख्या एकत्वापासून परार्धापर्यंत आहे. त्यापैकीं एकत्व हें नित्य व अनित्य असें दोन प्रकारचें आहे. नित्यद्रव्यावरील एकत्व नित्य व अनित्यद्रव्यावरील अनित्य होय. परंतु द्वित्वादि सर्व संख्या सर्वस्थळीं अनित्यच असतात.

( प० ) एकत्वादीति। एकत्वमित्यादिर्यो व्यवहारः एको द्वावित्याद्यात्मकस्तस्य हेतुः संख्या इत्यर्थः। घटादिवारणाय एकत्वादीति। कालादिवारणायासाधारणेत्यपि देयम्। ननु संख्याया अवधिरस्ति न वेत्यत आह–एकत्वादीति। प्रभाव 'एकं दश शतं चैव सहस्रमयुतं तथा। लक्षं च नियुतं चैव कोटिरर्बुदमेव च। वृन्दं खर्वो निखर्वश्च शंखः पद्मश्च सागरः। अन्त्यं मध्यं परार्धं च दश वृद्ध्या यथाक्रमम्। इति महदुक्तेः परार्धपर्यन्तैव संख्या इति भावः॥

( प० भा० )–'एकत्वादि०-' 'एकत्वं' इत्यादि जो एक, दोन अशा प्रकारचा व्यवहार त्याचा हेतु-कारण संख्या आहे. 'जो व्यवहाराचा हेतु ती संख्या' असें म्हटल्यास 'घट' अशा व्यवहाराचें घटही कारण असल्यामुळें त्यावर संख्यालक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं 'एकत्वादि व्यवहाराचें कारण' असें लक्षणांत म्हटलें आहे. घट तशा व्यवहाराचें कारण होत नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. पण कालही एकत्वादि व्यवहाराचें कारण असल्यामुळें त्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'असाधारण' असेंही विशेषण व्यवहाराला द्यावें म्हणजे कालावर अतिव्याप्ति जाणार नाहीं. कारण काल कार्यमात्राचें साधारण कारण आहे.' अहोपण संख्येला अवधि आहे किंवा नाहीं?' असें कोणी विचारील म्हणून 'एकत्वादि' यानें त्याचें उत्तर

संयोग-लक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं 'संयुक्त-व्यवहाराचें कारण' असें म्हटलें आहे. त्यामुळें दंड संयुक्त व्यवहाराचें कारण होत नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. कालादिकावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'असाधारण' हें पद आहे. 'संयुक्त-व्यवहारत्वा-' वर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'हेतु' हें पद आहे. 'संयुक्तव्यवहारत्व' हा हेतु नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. वरील चारी लक्षणांमध्यें 'असाधारण' हें पद घालावें. तर्कसंग्रहाच्या कांहीं प्रतींत परिमाण व पृथक्त्व यांच्या लक्षणांत ईश्वराची इच्छा इत्यादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'असाधारण' हें पद घातलेलें दिसतें; पण तें आधुनिक लोकांनीं घातलें आहे असें समजावें.

संयोगनाशको गुणो विभागः । सर्वद्रव्यवृत्तिः ॥

( त० भा० ) संयोगाचा नाश करणारा जो गुण तो विभाग—तो सर्व द्रव्यांवर राहतो.

( न्या० ) विभागं लक्षयति—संयोगेति । संयोगनाशकत्वविशिष्टगुणत्वं विभागस्य लक्षणम् । विशेषणमात्रोपादाने क्रियाया अपि संयोगनाशकत्वात्तत्रातिव्याप्तिवारणाय गुणत्वमिति विशेष्योपादानम् ॥

( न्या० भा० ) 'संयोग०' इत्यादि वाक्यानें विभागाचें लक्षण सांगतात. 'संयोगनाशकत्व' या विशेषणानें विशिष्ट जें गुणत्व तें विभागाचें लक्षण आहे. येथें केवळ 'संयोगनाशकत्व' हें विशेषणच घेतल्यास क्रिया देखील संयोगाचा नाश करणारी असल्यामुळें तिच्यावर अतिव्याप्ति जाते. तिचें निवारण करण्यासाठीं 'गुण' असें विशेष्य लक्षणांत घातलें आहे. त्यामुळें क्रिया हा गुण नसल्यानें तिच्यावर या विभागलक्षणाची अतिव्याप्ति जात नाहीं.

( प० ) संयोगेति । संयोगनाशजनक इत्यर्थः । कालेऽतिप्रसक्तिवारणाय गुणपदम् । ईश्वरेच्छादिवारणायासाधारणेत्यपि बोध्यम् । ननु असाधारणपदोपादाने गुणपदस्य वैयर्थ्यं स्यादिति चेत् । न । क्रियायामतिप्रसक्तिवारणाय तस्याप्यावश्यकत्वात् ॥

( प० भा० ) 'संयोग नाशक' म्हणजे संयोगनाशाला उत्पन्न करणारा असा अर्थ. कालावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण

करण्यासाठीं लक्षणांत ' गुण ' असें पद घातलें आहे. काळ द्रव्य आहे, गुण नाहीं, ह्मणून त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. ईश्वराची इच्छा इत्यादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' असाधारण ' हें पदहि येथें आहे, असें समजावें. म्हणजे ईश्वरेच्छादि साधारण कारण असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. ' अहो पण, असाधारण असें पद लक्षणांत घातल्यास गुण हें पद व्यर्थ होऊं लागेल. ' असें जर म्हणाल तर तसें नाहीं. कारण क्रियाही देखील संयोग नाशाचें असाधारण कारण असल्यानें गुण पद लक्षणात न घातल्यास तिच्यावर विभागलक्षणाची अतिव्याप्ति जाऊं लागेल. ती न जावी म्हणून ' गुण ' हें पदहि आवश्यकच आहे. क्रिया गुण नाहीं, म्हणून तें घातल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं.

परापरव्यवहारासाधारणकारणे परत्वापरत्वे। पृथिव्यादिचतुष्टयमनोवृत्तिनी। ते च द्विविधे। दिक्कृते कालकृते चेति। दूरस्थे दिक्कृतं परत्वम्। समीपस्थे दिक्कृतमपरत्वम्। ज्येष्ठे कालकृतं परत्वं कनिष्ठे कालकृतमपरत्वम्॥

( भ० भा० ) 'पर' व्यवहाराचें जें कारण तें परत्व होय. व 'अपर' व्यवहाराचें जें कारण तें अपरत्व होय. हे दोन गुण पृथ्वी जल, तेज, वायु व मन या द्रव्यांवर राहतात. परत्व व अपरत्व हीं दिक्कृत व कालकृत अशीं दोन प्रकारचीं आहेत. जो पदार्थ आपल्यापासून दूर असतो त्यावर दिक्कृत परत्व राहतें. (परत्व व अपरत्व हे गुण आकाश, काल, दिशा व आत्मा यांच्यावर राहात नाहींत. याचें कारण असें कीं, हीं चारी द्रव्यें विभु व नित्य आहेत. त्यामुळें देशकृत व कालकृत परत्व किंवा अपरत्व यांच्या ठिकाणीं संभवत नाहीं. म्हणजे आकाश जवळ आहे किंवा दूर आहे, हा आत्मा त्याहून ज्येष्ठ आहे किंवा कनिष्ठ आहे, इत्यादि प्रयोग आपल्याला कांहींच येत नाहींत. )

( प० ) परेति। परव्यवहारासाधारणं कारणं परत्वम्। अपरव्यवहारासाधारणं कारणमपरत्वमित्यर्थः। दण्डादिवारणाय परव्यवहारेति। कालादिवारणायासाधारणेति। परव्यवहारत्ववारणाय कारणेति। एवमेव द्वितीयेऽपि बोध्यम्॥

( प०भा० ) परत्वव्यवहाराचें जें असाधारण कारण त्याला परत्व म्हणतात व अपरत्वव्यवहाराच्या असाधारण कारणास अपरत्व म्हणतात. दंडादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' परत्वव्यवहाराचें असाधारण कारण ' असें म्हटलें आहे. दंड परत्वव्यवहाराचें असाधारण कारण नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. कालावर अतिव्याप्ति न जावी म्हणून ' असाधारण ' म्हटलें आहे. काल साधारण कारण असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. परत्वव्यवहारावर अतिव्याप्ति जाऊं नये म्हणून ' कारण ' असें लक्षणांत म्हटलें आहे. परत्वव्यवहारत्व कारण नाहीं म्हणून अतिव्याप्ति नाहीं. अपरत्वव्यवहारत्व इत्यादि लक्षणांतही असेंच पदकृत्य जाणावें.

आद्यपतनासमवायिकारणं गुरुत्वम् । पृथिवीजलवृत्ति ॥

( व०भा० ) आद्यपतनाचें जें असमवायि कारण तें गुरुत्व होय तें पृथ्वी व जल यांवर राहातें.

( न्या० ) गुरुत्वं लक्षयति—आद्येति । द्वितीयपतनक्रियायां वेगस्यासमवायिकारणत्वात्तत्रातिव्याप्तिवारणायाद्येति । उत्तरत्र स्पन्दने आद्यविशेषणमपि पूर्ववदेव योजनीयम् ॥

( न्या०भा० ) ' आद्येति० ' या वाक्यानें गुरुत्वाचें लक्षण सांगतात. दुसऱ्या, तिसऱ्या इत्यादि पतनक्रियांचे वेग हे असमवायि कारण असल्यानें त्याचेवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' आद्य ' असें म्हटलें आहे. आद्य क्रियेस गुरुत्वावाचून दुसरें असमवायि कारण नसल्यानें गुरुत्वाच्या लक्षणाची वेगावर अतिव्याप्ति जात नाहीं. पुढील द्रवत्वाच्या लक्षणांत देखील स्पंदनाला ' आद्य ' हें विशेषण पूर्वीप्रमाणेंच योजावें.

( प० ) आद्येति । दण्डादिवारणायासमवायीति । रूपादिवारणाय पतनेति । वेगेऽतिव्याप्तिवारणायाद्येति ॥

( प०भा० ) जें कारण तें गुरुत्व, असें म्हटल्यास दंडहि घटाचें कारण असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जाईल. ती न जावी म्हणून असमवायि कारण म्हटलें आहे. दंड घटाचें असमवायि कारण नाहीं ( निमित्त कारण आहे. ) त्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. तंतूचें रूपहि पटाच्या रूपाचें असमवायि कारण असल्यानें ' जें

असमवायि कारण तें गुरुत्व ' एवढेंच लक्षण केल्यास तंतुरूपावर अतिव्याप्ति होते. ती दूर करण्यासाठीं ' पतनाचें असमवायि कारण ' असें म्हटलें आहे. रूप पतनाचें असमवायि कारण नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. वेगावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' आद्य ' हें पद घातलें आहे. वेग पहिल्या पतनाचें असमवायि कारण नसल्यानें त्यावरही अतिव्याप्ति जात नाहीं.

आद्यस्यन्दनासमवायिकारणं द्रवत्वम्। पृथिव्यप्तेजोवृत्ति। तद्द्विविधम्। सांसिद्धिकं नैमित्तिकं च। सांसिद्धिकं जले। नैमित्तिकं पृथिवीतेजसोः। पृथिव्यां घृतादावग्निसंयोगजं द्रवत्वम्। तेजसि सुवर्णादौ ॥

( स० भा० )—आद्य स्यंदनाचें जें असमवायि कारण तें द्रवत्व होय. हा गुण पृथ्वी, जल व तेज यांवर राहतो. तें सांसिद्धिक व नैमित्तिक असें दोन प्रकारचें आहे. सांसिद्धिक ' द्रवत्व ' जलावर राहतें व नैमित्तिक 'पृथ्वी' व ' तेज ' यांवर राहतें. अग्निसंयोगाच्या निमित्तानें घृतादिक पदार्थ पातळ होतात; हें पृथ्वीवरील नैमित्तिक द्रवत्वाचें उदाहरण आहे, व अग्निसंयोगानें सुवर्णादिक वितळतात हें तेजावरील नैमित्तिक द्रवत्वाचें उदाहरण आहे.

( प० ) आद्यस्यन्दनेति । दण्डादिवारणायासमवायीति । रसादिवारणाय स्यन्दनेति ॥

( प० भा० )—दंडादिकावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं पूर्वीप्रमाणेंच ' असमवायि ' असें म्हटलें आहे. दंडादिक असमवायि कारण नसल्यानें त्यांवर अतिव्याप्ति जात नाहीं. ' जें असमवायि कारण तें द्रवत्व ' असें म्हटल्यास अवयवांचा रस हा अवयवीच्या रसाचें असमवायि कारण होत असल्यानें द्रवत्वाचें लक्षण रसादि गुणांवर अतिव्याप्त होऊं लागेल. तसें न व्हावें म्हणून ' स्यंदनाचें जें असमवायि कारण तें द्रवत्व ' असें त्याचें लक्षण केलें आहे. त्यामुळें रसादिक स्यंदनाचें असमवायि कारण होत नसल्यानें त्यांवर अतिव्याप्ति जात नाहीं.

चूर्णादिपिण्डीभावहेतुर्गुणः स्नेहः। जलमात्रवृत्तिः ॥

( त० भा० )–चूर्णादिकांचा गोळा ज्याच्या योगानें होतो अशा गुणास स्नेह असें म्हणतात. हा गुण फक्त जलामध्येंच राहतो.

( न्या० ) स्नेहं लक्षयति–चूर्णादीति । चूर्णादिपिण्डीभावहेतुत्वे सति गुणत्वं स्नेहस्य लक्षणम् । पिण्डीभावो नाम चूर्णादेर्धारणाकर्षणहेतुभूतो विलक्षणः संयोगः। तादृशसंयोगे स्नेहस्यैवासाधारणकारणत्वं न तु जलादिगतद्रवत्वस्य । तथा सति द्रुतसुवर्णादिसंयोगेन चूर्णादेः पिण्डीभावापत्तेः। अतः स्नेह एवासाधारणं कारणम् । विशेषणमात्रोपादाने कालादावतिव्याप्तिरतस्तद्वारणाय विशेष्योपादानम् । वस्तुतस्तु द्रुतजलसंयोगस्यैव पिण्डीभावहेतुत्वं स्नेहस्य पिण्डीभावहेतुत्वे मानाभावात् । जले द्रुतत्वविशेषणात्करकादिव्यावृत्तिः ॥

(न्या० भा०)–' चूर्णादि ' या वाक्यानें स्नेहाचें लक्षण करितात. चूर्णादिकांचा गोळा होण्यास कारण असून जो गुण असतो तो स्नेह होय. हें स्नेहाचें लक्षण आहे. पिंडीभाव म्हणजे चूर्णादिकांना धारण करणें व आकर्षण करणें, ह्याला कारण होणारा असा विलक्षण संयोग. तशा संयोगाचें स्नेह हेंच असाधारण कारण आहे. जलादिकांत असणारें द्रवत्व त्याचें कारण नाहीं. कारण द्रवत्व हेंच जर चूर्णादिकांचा गोळा होण्याचें कारण असतें तर पातळ झालेल्या सुवर्णादिकांच्या संयोगानेंही चूर्णादिकांचा गोळा झाला असता. पण तो तर होत नाहीं. ह्यणून द्रवत्व त्याचें कारण नसून स्नेहच असाधारण कारण आहे. आतां ' चूर्णादिकांच्या पिंडीभावाला जो हेतु असतो तो स्नेह ' असें फक्त विशेषणच घेतल्यास काल हाही त्या संयोगाचें कारण असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जाते. तिचें निवारण करण्यासाठीं गुण हें विशेष्य घेतलें आहे. काल द्रव्य आहे. गुण नाहीं. त्यामुळें कालावर अतिव्याप्ति होत नाहीं. वस्तुतः पातळ पाण्याचा संयोग हेंच पिंडीभावाचें कारण आहे. स्नेह हें पिंडीभावाला कारण आहे, याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. जलाला 'पातळ' असें विशेषण दिल्यानें गारा इत्यादि कठिण झालेल्या जल विकारांची व्यावृत्ति होते.

( प० ) चूर्णादीति । चूर्णं पिष्टं तदेवादिर्यस्य मृत्तिकादेः स चूर्णादिस्तस्य पिण्डीभावः संयोगविशेषस्तस्य हेतुर्निमित्तकारणं स्नेह इत्यर्थः। कालादावतिव्याप्तिवारणाय गुणपदम् । रूपादावतिव्याप्तिवारणाय पिण्डीभावेति । चूर्णादं स्पष्टार्थम् ॥

( प० भा० )–चूर्ण म्हणजे पिष्ट. तेंच ज्या मृत्तिकादि पदा-

र्यांच्या आदि म्हणजे आरंभीं आहे तेंच चूर्गादि. त्याचा पिंडीभाव म्हणजे संयोगविशेष. त्याचा हेतु म्हणजे निमित्तकारण स्नेह आहे, असा भावार्थ. कालावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'गुण' असें पद घातलें आहे. रूपादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'पिंडीभाव' असें म्हटलें आहे. रूपादिक गुण पिंडीभावाला कारण होत नाहींत. त्यामुळें त्यांवर अतिव्याप्ति जात नाहीं. पिंडीभाव म्हटला म्हणजे तो चूर्गादिकांचाच व्हावयाचा असतो. 'चूर्ग' हें पद हाच अर्थ स्पष्ट होण्याकरितां घातलें आहे.

श्रोत्रग्राह्यो गुणः शब्दः। आकाशमात्रवृत्तिः। स द्विविधः। ध्वन्यात्मको वर्णात्मकश्च। तत्र ध्वन्यात्मको भेर्यादौ। वर्णात्मकः संस्कृतभाषादिरूपः ॥

(त० भा०)—ज्याचें ग्रहण (ज्ञान) श्रोत्रानें करतां येतें तो गुण शब्द होय. शब्द फक्त आकाशावर राहतो. तो ध्वन्यात्मक व वर्णात्मक असा दोन प्रकारचा आहे. भेरी-दुंदुभी-नगारा इत्यादिकांपासून जो शब्द उत्पन्न होतो तो ध्वन्यात्मक व संस्कृतभाषा इत्यादिरूप जो शब्द तो वर्णात्मक होय.

(न्या०) शब्दं लक्षयति—श्रोत्रेति। शब्दत्वेऽतिव्याप्तिवारणाय गुण इति। रूपादावतिव्याप्तिवारणाय श्रोत्रेति। स त्रिविधः संयोगजो विभागजः शब्दजश्चेति। यथा भेरीदण्डसंयोगजो भाकारादिशब्दः। हस्ताभिघातसंयोगजन्यो मृदङ्गादिशब्दः। वंशे पाट्यमाने दलद्वयविभागजश्चटचटाशब्दः। शब्दोत्पत्तिदेशमारभ्य श्रोत्रदेशपर्यन्तं वीचीतरङ्गन्यायेन कदम्बमुकुलन्यायेन वा निमित्तपवनेन शब्दधारा जायन्ते। तत्र उत्तरोत्तरशब्दे पूर्वपूर्वशब्दः कारणम् ॥

(न्या० भा०)—'श्रोत्र' इत्यादि वाक्यानें शब्दाचें लक्षण सांगतात. शब्दत्वही श्रोत्रग्राह्य असल्यानें त्याच्यावर शब्दलक्षणाची अतिव्याप्ति जाऊं नये म्हणून त्यांत गुण असें पद घालावें. म्हणजे शब्दत्व हा गुण नसल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. आतां जो गुण तो शब्द असें म्हटल्यास रूपादिकही गुण असल्यानें त्यांच्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'श्रोत्रग्राह्य' असें म्हटलें आहे. रूपादिक गुण श्रोत्रग्राह्य नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. तो शब्द संयोगज, विभागज व शब्दज असा तीन प्रकारचा आहे. जसा भेरी व दंड यांच्या संयोगापासून होणारा भां-

निवारण करण्यासाठीं ' संस्कारमात्रजन्य ' ह्या विशेषणाचा उपयोग केला आहे. त्यामुळें अनुभव संस्कारमात्रजन्य ज्ञान नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति होत नाहीं. आतां जें संस्कारमात्रजन्य असतें त्यास ' स्मृति ' असें म्हटल्यास संस्काराचा ध्वंस ही फक्त संस्कारापासूनच होत असल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जाते. ती न जावी म्हणून लक्षणांत ' ज्ञान ' हें विशेष्य घातलें आहे. त्यामुळें ध्वंस ज्ञान नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. कारण ध्वंसाला त्याचा प्रतियोगी कारण असतो. त्यामुळें संस्कारध्वंसामध्येंही संस्कारजन्यत्व आहेच. (संस्कार असल्यावाचून त्याचा नाश कसा होईल !) म्हणून तो कारण होय. प्रत्यभिज्ञेवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' मात्र ' असें पद घातलें आहे. ( प्रत्यभिज्ञा म्हणजे एकदा जाणलेल्यास पुन्हां ओळखणें. हें ज्ञान इंद्रिय व अर्थ यांचा संनिकर्ष व स्मरण यांपासून होत असतें. म्हणून तें फक्त संस्कारापासूनच होतें असें म्हणतां येत नाहीं.)

( प० ) संस्कारेति । संस्कारध्वंसेऽतिव्याप्तिवारणाय ज्ञानमिति । अनुभवेऽतिव्याप्तिवारणाय संस्कारजन्यमिति । तथापि प्रत्यभिज्ञायामतिव्याप्तिवारणाय संस्कारमात्रजन्यत्वं विवक्षणीयम् । क्वचित्तथैव पाठः । न चैवं सत्यसंभवस्तस्य संस्कारजन्यत्वे सतीन्द्रियार्थसंनिकर्षाजन्यार्थकत्वात् ॥

( प० भा० ) संस्कारध्वंसावर अतिव्याप्ति न जावी यास्तव ' ज्ञान ' असें पद घातलें आहे. अनुभवावर अतिव्याप्ति न जावी म्हणून ' संस्कारजन्य ' असें पद घातलें आहे. तथापि प्रत्यभिज्ञेवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' संस्कारमात्रजन्यत्व ' येथें विवक्षित आहे. कित्येक ठिकाणीं तसाच पाठ आहे. अहोपण असें म्हटल्यास असंभव हा दोष येईल; असें म्हणतां येत नाहीं. कारण त्या म्हणण्याचा 'संस्कारजन्य असून इंद्रिय व अर्थ ह्यांच्या संनिकर्षापासून उत्पन्न न होणें' हा अर्थ आहे. ( त्यामुळें आत्ममनःसंयोगादिकासारखीं निमित्त कारणें असल्यास हरकत नाहीं.)

तद्भिन्नं ज्ञानमनुभवः । स द्विविधः । यथार्थोऽयथार्थश्च ॥

( त० भा० ) स्मृतीहून भिन्न ज्ञानास अनुभव असें म्हणतात. तो यथार्थ व अयथार्थ असा दोन प्रकारचा आहे.

( न्या० ) अनुभवं लक्षयति–तद्भिन्नमिति । तद्भिन्नत्वं नाम स्मृतिभिन्नत्वविशिष्टज्ञानत्वमनुभवस्य लक्षणम् । तत्र विशेषणानुपादाने स्मृतावतिव्याप्तिः विशेष्यानुपादाने घटादावतिव्याप्तिस्तद्वारणाय विशेषणविशेष्ययोरुभयोरुपादानम् । अनुभवं विभजते–स द्विविध इति ॥

( न्या० भा० ) 'तद्भिन्न०' या वाक्यानें अनुभवाचें लक्षण करितात. तद्भिन्न म्हणजे स्मृतीहून वेगळें. स्मृतिभिन्नत्वानें विशिष्ट जें ज्ञानत्व तें अनुभवाचें लक्षण होय. त्यांपैकीं विशेषण न घेतां 'जें ज्ञान तो अनुभव' म्हटल्यास स्मरण हेंही ज्ञान असल्यामुळें त्यावर अनुभवलक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं 'स्मृतिभिन्न' हें विशेषण घेतलें पाहिजे. म्हणजे स्मृति ही स्मृतिभिन्न नसल्यामुळें आतां तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. 'ज्ञान' हें विशेष्य न घेतल्यास घटादिक ही स्मृतीहून भिन्न असल्यामुळें त्यांवर अतिव्याप्ति जाईल. ती न जावी यासाठीं 'ज्ञान' असें म्हटलें आहे. म्हणजे घटादि पदार्थ ज्ञान नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. म्हणून त्या दोन्ही अतिव्याप्तींचें निवारण करण्यासाठीं विशेषण व विशेष्य या दोघांचेंही ग्रहण केलें आहे. 'स द्विविधः' यानें अनुभवाचा विभाग करितात.

( प० ) तद्भिन्नेति । स्मृतित्वावच्छिन्नभिन्नमित्यर्थः । तेन यत्किंचित्स्मृतिभिन्नत्वस्य स्मृतौ सत्त्वेऽपि न क्षतिः । घटादावतिव्याप्तिवारणाय ज्ञानमिति । स्मृतिवारणाय तद्भिन्नमिति ॥

( प० भा० ) स्मृतित्वानें अवच्छिन्न जेवढ्या स्मृती आहेत, त्या सर्वांहून भिन्न असा अर्थ. त्यामुळें एखाद्या स्मृतीहून भिन्न असणें हा धर्म एखाद्या स्मृतीवर जरी असला तरी कांहीं दोष नाहीं, कारण ती स्मृतीही स्मृतित्वानें अवच्छिन्न आहेच. त्याहून भिन्न नाहीं. घटादिकावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'ज्ञान' असें पद घातलें आहे. स्मृतीवरील अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'तद्भिन्न' असें म्हटलें आहे.

तद्वति तत्प्रकारकोऽनुभवो यथार्थः सैव प्रमेत्युच्यते ॥

( व० भा० ) तद्वानामध्यें जो तत्प्रकारचा अनुभव त्यास यथार्थ अनुभव म्हणतात. त्यासच 'प्रमा' असें म्हणतात. ( जो

पदार्थ जशा प्रकारचा असतो तो तसाच भासणें. रजताचें हें रुपें असें ज्ञान झालें तर तो यथार्थ अनुभव होय. )

( न्या० ) यथार्थानुभवं लक्षयति—तद्वतीति । तद्वतीत्यत्र सप्तम्यर्थो विशेष्यत्वम् । तच्छब्देन प्रकारीभूतो धर्मो धर्तव्यः । तथाच तद्विशेष्यकत्वे सति तत्प्रकारकानुभवत्वं यथार्थानुभवस्य लक्षणम् । उदाहरणम्—रजत 'इदं रजतम्' इति ज्ञानम् । तद्वन्निष्ठविशेष्यतानिरूपिततन्निष्ठप्रकारताशालित्वमिति निष्कर्षः । अन्यथा यथाश्रुते रङ्गरजतयोरिमे रजतरङ्गे इत्याकारकसमूहालम्बनभ्रमेऽतिव्याप्तिः । तत्रापि रजतत्ववद्विशेष्यकत्वरजतत्वप्रकारकत्वयो रङ्गत्ववद्विशेष्यकत्वरङ्गत्वप्रकारकत्वयोः सत्त्वात् । उक्तनिष्कर्षे तु नातिव्याप्तिः रजतत्वप्रकारताया रजतत्ववद्विशेष्यतानिरूपितत्वाभावात् । एवं रङ्गत्वप्रकारताया रङ्गत्ववद्विशेष्यतानिरूपितत्वाभावात् । किंतु समूहालम्बनभ्रमस्य रङ्गांशे रजतत्वावगाहित्वेन रजतत्वप्रकारताया रङ्गत्ववद्विशेष्यतानिरूपितत्वात् । एवं रजतांशे रङ्गत्वावगाहित्वेन रङ्गत्वप्रकारताया रजतत्ववद्विशेष्यतानिरूपितत्वाच्चेति । नानामुख्यविशेष्यताशालि ज्ञानं समूहालम्बनम् ॥

( न्या० भा० ) 'तद्वति०' या वाक्यानें यथार्थ अनुभवाचें लक्षण करितात. 'तद्वति' या ठिकाणच्या सप्तमीचा अर्थ 'विशेष्यत्व' असा आहे. 'तद्वति' येथील तच्छब्दानें प्रकार झालेला ( विशेषणरूप ) धर्म घ्यावा. अर्थात् 'तद्विशेष्यकत्व असून तत्प्रकारकानुभवत्व' हें यथार्थ अनुभवाचें लक्षण आहे. उदाहरणः— रुप्याचें हें रुपें आहे, असें ज्ञान. अशा ज्ञानास यथार्थ अनुभव म्हणतात. या ज्ञानांत रजतत्व या धर्मानें युक्त जें रजत तें विशेष्य असून रजतत्व हें विशेषण आहे. तद्वतावर ( रजतत्ववान् अशा रजतावर ) असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली जी त्यावर ( रजतत्वावर ) असणारी प्रकारता ( विशेषणता ) तिनें शोभणारें ज्ञान, असा याचा तात्पर्यार्थ आहे. असें न म्हटल्यास व वरच्या प्रमाणेंच म्हटल्यास ( निष्कर्ष न काढितांच यथार्थानुभवाचें लक्षण ठेविल्यास ) समूहालंबनावर त्याची अतिव्याप्ति जाते. रंग (जस्त) व रुपें यांचें ठिकाणीं अनुक्रमें रुपें व रंग असा भास होणें हा समूहालंबन भ्रमाचा आकार आहे. तेव्हां यांत सुद्धां रजतत्ववान् असें रजत हें विशेष्य असून रजतत्व हा प्रकार-( रंगावर कां होईना पण तो-) ही आहे व रंगत्ववान् जो रंग तें विशेष्य असून रंगत्व हा प्रकारही ( रजतावरच

कां होईना पण ) आहे. म्हणजे समूहालंबन भ्रमरूपी एका ज्ञानांतही ' तद्वति तत्प्रकारकत्व ' हें यथार्थानुभवाचें लक्षण आहे. म्हणून त्यावर अतिव्याप्ति जाते. परंतु या लक्षणाचा वरील प्रमाणें निष्कर्ष काढिला म्हणजे मात्र ती जात नाहीं. कारण मग रजतत्वावर असणारी जी रजताची प्रकारता ती रजतत्ववान् अशा रजतावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली नसते ( तर ती प्रकारता रंगावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली असते. ) व तशीच रंगत्वावर असणारी प्रकारता रंगत्ववान् अशा रंगावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली नसते. ( तर रजतनिष्ठ विशेष्यतेनें ती दाखविलेली असते. ) समूहालंबनभ्रमांत रंग या अंशावर रजत भासल्यामुळें रजतत्वावरील प्रकारता रंगत्ववान् रंगावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली असते. व रजत या अंशावर रंग भासल्यामुळें रंगत्वावरील प्रकारता रजतत्ववान् रजतावर असणाऱ्या विशेष्यतेकडून दाखविली जाते. म्हणून या समूहालंबन भ्रमांत तद्वन्निष्ठ ( रजतादिनिष्ठ ) विशेष्यतेनें दाखविलेलें जें तन्निष्ठ ( रजतत्वनिष्ठ ) प्रकारताशालि ( शोभणारें, युक्त, ) ज्ञानत्व हें यथार्थानुभवाचें लक्षण येत नसल्यामुळें अतिव्याप्ति जात नाहीं. ज्या ज्ञानांत वेगवेगळ्या मुख्य विशेष्यता असतात त्या ज्ञानास समूहालंबन ज्ञान म्हणतात.

( प० ) तद्वतीति । तद्वति तत्प्रकारो यस्य स तथेत्यर्थः । तद्वद्विशेष्यकतत्प्रकारक इति यावत् । स्मृतिवारणायानुभव इति । अयथार्थानुभववारणाय तद्वतीति । निर्विकल्पकेऽतिव्याप्तिवारणाय तत्प्रकारक इति ॥

( प० भा० ) ज्या ज्ञानांत तद्वतावर तो प्रकार असतो तो यथार्थानुभव, होय. ' ज्यांत तद्वान् विशेष्य आहे व तें प्रकार आहे तो यथार्थानुभव' असा याचा निष्कर्ष आहे. तद्वानावर तत्प्रकारक स्मृतिही होत असल्यामुळें म्हणजे स्मृतींतही रजतावर रजतत्व असल्यानें तिच्यावरील अतिव्याप्ति दूर करण्यासाठीं ' अनुभव ' असें म्हटलें आहे. स्मृति अनुभव नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति होत नाहीं. 'तत्प्रकारक जो अनुभव तो यथार्थानुभव' असें म्हटल्यास अयथार्थानुभव सुद्धां तत्प्रकारक असल्यानें त्यावर अतिव्याप्ति जाते. ती दूर करण्यासाठीं ' तद्वतावर ' असें पद घातलें आहे. अयथार्थानुभव ' तद्वतावर तत्प्रकारक ' नसल्यामुळें त्यावर

आतां अतिव्याप्ति जात नाहीं. निर्विकल्पक ज्ञानावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'तत्प्रकारक' असें म्हटलें आहे. म्हणजे तो निर्विकल्पक अनुभव निष्प्रकारकच असल्यानें तत्प्रकारक होत नाहीं. म्हणून त्यावर अतिव्याप्ति नाहीं.

तदभाववति तत्प्रकारकोऽनुभवोऽयथार्थः ॥

( त० भा० )–तदभाववानावर तत्प्रकारक अनुभवास अयथार्थ अनुभव म्हणतात. ( जो पदार्थ ज्या प्रकारचा नसतो त्या प्रकारचा तो आहे असें जर एखाद्या पदार्थाविषयीं ज्ञान झालें तर तो अयथार्थ अनुभव होय. उदाहरणार्थ– आपल्यापुढें मोत्याची शिंप असली आणि तिचें आपल्याला हें रजत आहे असें ज्ञान झालें तर तो अयथार्थ अनुभव आहे व यालाच अप्रमा असें म्हणतात )

( न्या० ) अयथार्थानुभवं लक्षयति–तदभाववतीति । अत्रापि पूर्ववत्तदभाववन्निष्ठविशेष्यतानिरूपिततन्निष्ठप्रकारताशालिज्ञानत्वं विवक्षणीयम् । अन्यथा रङ्गरजतयोरिमे रङ्गरजते इत्याकारकसमूहालम्बनप्रमायामतिव्याप्तिः । एतत्समूहालम्बनस्य रङ्गरजतोभयविशेष्यकत्वेन रजतत्वरङ्गत्वोभयप्रकारकत्वेन च रजतत्वाभाववद्रङ्गविशेष्यकत्वरजतत्वप्रकारकत्वयो रङ्गत्वाभाववद्रजतविशेष्यकत्वरङ्गत्वप्रकारकत्वयोश्च सत्त्वात् । निष्कर्षे तु रजतांशे रजतत्वावगाहित्वेन रङ्गांशे रङ्गत्वावगाहित्वेन च रजतत्वप्रकारताया रजतत्वाभाववद्रङ्गविशेष्यतानिरूपितत्वाभावात् । एवं रङ्गत्वप्रकारताया रङ्गत्वाभाववद्रजतविशेष्यतानिरूपितत्वाभावान्नातिव्याप्तिः । उदाहरणम्–यथा शुक्तौ 'इदं रजतम्' इति ॥

( न्या० भा० ) 'तदभाववति०' असें अयथार्थानुभवाचें लक्षण करितात. याठिकाणीं सुद्धां पूर्वीप्रमाणें 'त्याच्या अभाववन्तावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली जी त्यावर असणारी प्रकारता, त्या प्रकारतेनें शोभणारें ज्ञानत्व हें अयथार्थानुभवाचें लक्षण, असें म्हणण्याची विवक्षा आहे. असें न केल्यास रंग म्हणजे कथील व रजत यांच्यावर अनुक्रमें रंग व रजत ( हीं भासलें आहेत ) अशा प्रकारच्या समूहालंबनप्रमेवर अतिव्याप्ति जाते. कारण या समूहालंबनप्रमेमध्येंही रंग व रजत हीं दोन विशेष्यें असून रजतत्व व रंगत्व हीं दोन विशेषणें असल्यानें रजतत्वाचा अभाव ज्या रंगावर आहे असा रंग हा विशेष्य असून रजतत्व हें रजतावर विशेषणहि आहे व रंगत्वाभाववान् जें रजत तें विशेष्य असून रंगत्व हा प्रकार

( विशेषणही ) रंगावर आहेच. तेव्हां 'तदभाववान् विशेष्य असून तत्प्रकारक अनुभवास अयथार्थ अनुभव', असें म्हटल्यास तशी स्थिति समूहालंबनप्रमेमध्येंही असल्यामुळें तिच्यावर अतिव्याप्ति जाते. त्यासाठीं वरील प्रमाणें येथेंही निष्कर्ष काढिला आहे. त्यामुळें रजत या अंशावर रजतत्वाचें ज्ञान झाल्यानें व रंग या अंशावर रंगत्वाचें ज्ञान झाल्यानें रजतत्वावर असणारी प्रकारता ही रजतत्वाच्या अभाववान् अशा रंगत्वर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली नसते. तशीच रंगत्वावर असणारी प्रकारता ही रंगत्वाचा ज्या ठिकाणीं अभाव आहे अशा रजतावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली नाहीं. म्हणून समूहालंबनप्रमेवर अयथार्थ अनुभवाचें लक्षण येत नसल्यानें अतिव्याप्ति नाहीं. जसें शुक्तीवर हें रजत आहे असें वाटणें हे अयथार्थानुभवाचें उदाहरण आहे.

( प० ) तदभावेति । तदभाववद्विशेष्यकतत्प्रकारकोऽनुभवोऽयथार्थानुभव इत्यर्थः । यथा शुक्तौ 'इद रजतम्' इति ज्ञानम् । स्मृतिवारणायानुभव इति । यथार्थानुभवेऽतिव्याप्तिनिरसनाय तदभाववतीति । निर्विकल्पकवारणाय तत्प्रकारक इति ॥

( प० भा० )—तदभाववान् ज्यात विशेष्य आहे व तो ज्यात प्रकार आहे अशा अनुभवास अयथार्थ अनुभव म्हणतात. जसें शिंपीवर हें रजत आहे असें ज्ञान. नुसतें जें तदभाववंतावर तत्प्रकारक ज्ञान असतें त्यास 'अयथार्थ अनुभव' असें म्हटल्यास खोट्या स्मृतींत सुद्धां तदभाववंतावर तो प्रकार असल्यामुळें अयथार्थ अनुभवाच्या लक्षणाची अतिव्याप्ति खोट्या स्मृतीवर जाते. ती न जावी यासाठीं 'अनुभव' असें पद घालावें. म्हणजे स्मृति अनुभव नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. आतां 'जो तत्प्रकारक असतो तो अयथार्थ अनुभव' असें म्हटल्यास यथार्थ अनुभवांतही तो प्रकार असल्यामुळें त्याचेवर अतिव्याप्ति जाते. ती न जावी याकारितां 'त्याच्या अभाववंतावर' असें म्हणावें म्हणजे यथार्थ अनुभवांत त्याच्या अभाववंतावर तो प्रकार नसल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. तदभाववंतावर जो अनुभव त्यास अयथार्थ अनुभव असें म्हटल्यास निर्विकल्पक ज्ञान सुद्धां तसेंच असल्यानें

त्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'तत्प्रकारक' असें म्हणावें. म्हणजे निर्विकल्पक ज्ञानांत कोणताच प्रकार नसल्यामुळें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं.

यथार्थोनुभवश्चतुर्विधः।प्रत्यक्षानुमित्युपमितिशाब्दभेदात्॥

( त० भा० )–यथार्थ अनुभव प्रत्यक्ष, अनुमिति, उपमिति व शाब्द असा चार प्रकारचा आहे.

( न्या० ) यथार्थानुभवं विभजते–चतुर्विध इति ॥

( न्या० भा० )–' चतुर्विधः,' यानें यथार्थ अनुभवाचा विभाग करितात.

( प० ) यथार्थेति । यथार्थानुभवः प्रत्यक्षमेवेति चार्वाकाः । अनुमितिरपीति काणादबौद्धाः । उपमितिरपीति नैयायिकैकदेशिनः । शाब्दमपीति नैयायिकाः । अर्थापत्तिरपीति प्राभाकराः । अनुपलब्धिरपीति भाट्टवेदान्तिनौ । सांभविकैतिह्यकावपीति पौराणिकाः । चैष्टिकोऽपीति तान्त्रिकाः । एतेषां मतेऽस्वरसं संभाव्य तस्य चातुर्विध्यं स्वयं दर्शितम् ॥

( प० भा० )–यथार्थ अनुभव प्रत्यक्ष या एकाच प्रकारचा आहे असें चार्वाक मानितात. अनुमितिही यथार्थ अनुभवाचाच भेद आहे असें काणाद व बौद्ध मानितात. तशीच उपमिति ही यथार्थ अनुभवच आहे असें नैयायिकापैकीं कांहीं लोक मानतात. शाब्द-ही यथार्थ अनुभवच आहे असें नैयायिक मानतात. अर्थापत्तिही यथार्थ अनुभव आहे असें प्राभाकर मानितात व अनुपलब्धिही त्यापैकींच आहे असें भाट्ट व वेदांती मानितात. सांभविक व ऐतिह्यक अशीं दोन प्रमाणें पौराणिक अधिक मानितात. चैष्टिक हेंही त्यापैकींच आहे, असें तांत्रिक मानितात. या सर्वांच्या मताविषयीं आपली अरुचि आहे ( संमती नाहीं ) असें दाखवून तो यथार्थ अनुभव चार प्रकारचा आहे असें स्वतः दाखविलें आहे.

तत्करणमपि चतुर्विधं प्रत्यक्षानुमानोपमानशब्दभेदात् ॥

( त० भा० )–त्याचें करण देखील प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, व शब्द अशा भेदानें चार प्रकारचें आहे.

( न्या० ) तत्करणमिति । फलीभूतप्रत्यक्षादिकरणं चतुर्विधमित्यर्थः । प्रत्यक्षादिचतुर्विधप्रमाणानां प्रमाकरणत्वं सामान्यलक्षणम् । एकैकप्रमाणलक्षणं तु वक्ष्यते प्रत्यक्षज्ञानेत्यादिना ॥

( न्या० भा० )–तत्करण म्हणजे फलरूप प्रत्यक्षादि अनुभवाचें करण, चार प्रकारचें आहे असा इत्यर्थ. प्रत्यक्षादि चार प्रकारच्या प्रमाणाचें 'प्रमाकरणत्व' हें सामान्य लक्षण आहे. एकेका प्रमाणाचें लक्षण 'प्रत्यक्षज्ञानकरणम् प्रत्यक्षम्' असें पुढें सांगितलें जाईल.

( प० ) तदिति । यथार्थानुभवात्मकप्रमायाः करणमित्यर्थः ।

*( प० भा० ) यथार्थ अनुभवात्मक जी प्रमा त्या प्रमेचें करण* असा तत्करणं याचा इत्यर्थ आहे.

**असाधारण कारण करणम् ॥**

( त० भा० )– जें असाधारण कारण तें करण होय.

( न्या० ) करणलक्षणमाह–असाधारणेमिति । व्यापारवदसाधारणं कारणं करणमित्यर्थः । असाधारणत्वं च कार्यत्वातिरिक्तधर्मावच्छिन्नकार्यतानिरूपितकारणताशालित्वम् । यथा दण्डादेर्घटादिकं प्रत्यसाधारणकारणत्वम् । कार्यत्वातिरिक्तो घटत्वादिरूपो धर्मः तदवच्छिन्नकार्यता घटे तन्निरूपितकारणता दण्डे । अतो घटं प्रति दण्डः असाधारणकारणम् । भ्रम्यादिरूपव्यापारवत्त्वाच्च करणम् । साधारणत्वं च कार्यत्वावच्छिन्नकार्यतानिरूपितकारणताशालित्वम् । ईश्वरादृष्टादेः कार्यत्वावच्छिन्नं प्रत्येव कारणत्वात्साधारणकारणत्वम् ॥

*( न्या० भा० )–'असाधारण०'* खंडानें करणाचें लक्षण सांगतात. व्यापारवान् व असाधारण असें जें कारण तें करण होय असा इत्यर्थ. असाधारण म्हणजे कार्यत्वाहून वेगळ्या धर्मानें *अवच्छिन्न जी कार्यता त्या कार्यतेनें दाखविलेली जी कारणता त्या* कारणतेनें शोभणारें जें, तें असाधारण. ( ती कारणता ज्यावर असते तें असाधारण कारण होय.) जसें दंडादिक हें घटादि कार्याचें *असाधारण कारण होय.* येथें कार्यत्वाहून वेगळा जो घटत्वादि रूप धर्म त्यानें अवच्छिन्न जी कार्यता ती घटावर आहे व त्या कार्यतेनें दाखविलेली कारणता दंडावर आहे. म्हणून दंड हें घटाचें असाधारण कारण आहे व भ्रम्यादिरूप व्यापार त्याच्यावर रहात असल्यानें तो करण होऊं शकतो. कार्यत्वानें अवच्छिन्न अशा कार्यतेनें दाखविलेली जी कारणता ती ज्याच्यावर असते त्यास असाधारण कारण म्हणावें. ईश्वर, अदृष्ट इत्यादिक, कार्यत्वानें अवच्छिन्न जीं कार्यें त्या सर्वांना कारण असल्यानें ते असाधारण कारण होत.

( प० ) असाधारणमिति । कालादिवारणायासाधारणमिति । व्यापारेऽतिव्याप्तिवारणाय व्यापारवदित्यपि देयम् । व्यापारश्च द्रव्यान्यत्वे सति तज्जन्यत्वे सति तज्जन्यजनकः । ईश्वरेच्छादिवारणाय तज्जन्यत्वे सतीति । कुलालजन्यत्वे सति कुलालजन्यघटजनकत्वं कुलालपुत्रस्याप्यस्यतस्तत्रातिव्याप्तिवारणाय प्रथमं सत्यन्तम् । दण्डरूपादिवारणाय तज्जन्यजनक इति ॥

( प० भा० )—कालादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' व्यापारवान् ' असेंही पद लक्षणांत घालावें. म्हणजे तो व्यापार जरी असाधारण कारण असला तरी स्वतः व्यापारवान् नसल्यानें ( त्यावर पुन्हा दुसरा व्यापार रहात नसल्यानें ) त्यावर अतिव्याप्ति नाहीं. व्यापार म्हणजे ' जो द्रव्याहून वेगळा असून व त्याच्यापासून जन्य असून त्याच्यापासून जन्य जी वस्तु त्या वस्तूला उत्पन्न करणारा ( जनक ) असतो तो व्यापार ' होय. म्हणजे दंडाचें फिरणें हें ' दंड ' द्रव्याहून वेगळें आहे. तें ' दंड ' द्रव्यापासून उत्पन्न झालें आहे व दंडद्रव्यापासून उत्पन्न होणारा जो घट त्याला तें उत्पन्न करणारें आहे. म्हणून त्या दंडाच्या फिरण्याला व्यापार म्हणतात. ईश्वराची इच्छा द्रव्याहून वेगळी ( म्ह. गुण, ) असून तज्जन्याची जनकही असल्यानें तिच्यावर व्यापाराच्या लक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती दूर करण्यासाठीं ' त्यापासून जन्य असून ' असें म्हटलें आहे. ईश्वरेच्छा तज्जन्य नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. आतां तज्जन्य ( कुंभारापासून जन्य ) असून तज्जन्यजनक ( कुंभारापासून होणाऱ्या घटाला उत्पन्न करणारा ), असा कुंभाराचा मुलगाही असल्यामुळें व्यापाराच्या लक्षणाची अतिव्याप्ति कुंभाराच्या मुलावर जाते. ती न जावी यासाठीं ' द्रव्याहून वेगळें असून ' असें पहिलें सप्तम्यंत पद घातलें आहे. कुलालसुत द्रव्याहून वेगळा नाहीं तर द्रव्यच आहे. त्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. दंडाच्या रूपावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' तज्जन्यजनक ' असें म्हटलें आहे. आतां दंडावरील रूप हें द्रव्याहून अन्य व दंडापासून झालेलें जरी असलें तरी दंडापासून होणाऱ्या घटाला दंडाचें रूप हें कारण होत नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति नाहीं.

कार्यनियतपूर्ववृत्ति कारणम् ॥

(त० भा०)–जें कार्याच्या पूर्वी नियमानें असतें. तें कारण होय.

( न्या० ) कारणं लक्षयति–कार्यनियतेति । कार्यं प्रति नियतत्वे सति पूर्ववृत्तित्वम् । नियतत्वविशेषणानुपादाने पूर्ववर्तिनो रासभादेरपि घटादिकारणत्वं स्यादतो नियतत्वे सतीति विशेषणम् । नियतपूर्ववर्तिनो दण्डरूपादेरपि घटकारणत्वं स्यादतोऽनन्यथासिद्धपदमपि कारणलक्षणे निवेशनीयम् । दण्डरूपादीनां त्वन्यथासिद्धत्वात् ॥

(न्या० भा० )–'कार्यनियत०' यानें कार्याचें लक्षण करितात. कार्याप्रत जें नियत असून पूर्ववृत्ति असतें तें कारण होय. याठिकाणीं नियमानें–नियत असणें हें कारणाचें विशेषण जर लक्षणांत घातलें नाहीं तर रासभ देखील घटरूपी कार्याचें कारण होऊं लागेल. कारण तो देखील कार्याच्या ( घटादि रूप कार्याच्या ) पूर्वींच आहे. म्हणुन ' नियमानें असणें ' हें विशेषण घातलें आहे. तो रासभ कार्याच्यापूर्वी नियत नसल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. तसेंच नियमानें पूर्वी असणारें जें दंडरूपी कारणाचें रूप तें सुद्धां घटाचें कारण होऊं लागेल. याकरितां कारणाच्या लक्षणांत ' अनन्यथासिद्ध ' हें पद घातलें पाहिजे. म्हणजे दंडावरील रूपादि अन्यथासिद्ध असल्यानें अनन्यथासिद्ध होत नाहीं. म्हणुन त्याच्यावर कारणलक्षणाची अतिव्याप्ति जात नाहीं.

( प० ) कार्येति । कार्यान्नियतावश्यंभाविनी पूर्ववृत्तिः पूर्वक्षणवृत्तिर्यस्य तत्तथेत्यर्थः । अनियतरासभादिवारणाय नियतेति । कार्यवारणाय पूर्वेति । दण्डरूपादिवारणायानन्यथासिद्धत्वविशेषणस्यावश्यकत्वेन तत एव रासभादिवारणसंभवे नियतपदमनर्थकमेव । एवंचानन्यथासिद्धकार्यपूर्ववृत्ति कारणमिति फलितम् । अनन्यथासिद्धत्वमन्यथासिद्धिशून्यत्वम् । अन्यथासिद्धिश्चावश्यक्लृप्तनियतपूर्ववर्तिनैव कार्यसंभवे तत्सहभूतत्वं । यथावश्यकक्लृप्तनियतपूर्ववर्तिभिर्दण्डादिभिरेव घटरूपकार्यसंभवे तत्सहभूतत्वं दण्डत्वादौ तदन्यथासिद्धम्॥

( प० भा० )–कार्याच्या अपेक्षेनें नियत–अवश्य भाविनी जी पूर्वक्षणवृत्ति ती ज्याला आहे ( ज्याचें पूर्व क्षणाचें ठिकाणीं असणें अवश्य आहे ) तें ' कार्यनियतपूर्ववृत्ति ' होय असा इत्यर्थ. अनियत रासभादिकांचें निवारण करण्यासाठीं 'नियत' हें पद घातलें आहे. रासभादि नियत नसल्यानें त्यांवर अतिव्याप्ति जात नाहीं. 'कार्याशीं जें नियतवृत्ति तें कारण' असें म्हटल्यास कार्य हें सुद्धां

( प० ) असाधारणमिति । कालादिवारणायासाधारणमिति । व्यापारेऽतिव्याप्तिवारणाय व्यापारवदित्यपि देयम् । व्यापारश्च द्रव्यान्यत्वे सति तज्जन्यत्वे सति तज्जन्यजनकः । ईश्वरेच्छादिवारणाय तज्जन्यत्वे सतीति । कुलालजन्यत्वे सति कुलालजन्यघटजनकत्वं कुलालपुत्रस्याप्यस्त्यतस्तत्रातिव्याप्तिवारणाय प्रथमं सत्यन्तम् । दण्डरूपादिवारणाय तज्जन्यजनक इति ॥

( प० भा० )–कालादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' व्यापारवान् ' असेंही पद लक्षणांत घालावें. म्हणजे तो व्यापार जरी असाधारण कारण असला तरी स्वतः व्यापारवान् नसल्यानें ( त्यावर पुन्हां दुसरा व्यापार रहात नसल्यानें ) त्यावर अतिव्याप्ति नाहीं. व्यापार म्हणजे ' जो द्रव्याहून वेगळा असून व त्याच्यापासून जन्य असून त्याच्यापासून जन्य जी वस्तु त्या वस्तूला उत्पन्न करणारा ( जनक ) असतो तो व्यापार ' होय. म्हणजे दंडाचें फिरणें हें ' दंड-' द्रव्याहून वेगळें आहे. तें ' दंड-' द्रव्यापासून उत्पन्न झालें आहे व दंडद्रव्यापासून उत्पन्न होणारा जो घट त्याला तें उत्पन्न करणारें आहे. म्हणून त्या दंडाच्या फिरण्याला व्यापार म्हणतात. ईश्वराची इच्छा द्रव्याहून वेगळी ( म्ह. गुण, ) असून तज्जन्याची जनकही असल्यानें तिच्यावर व्यापाराच्या लक्षणाची अतिव्याप्ति जावे. ती दूर करण्यासाठीं ' त्यापासून जन्य असून ' असें म्हटलें आहे. ईश्वरेच्छा तज्जन्य नसल्यानें तिच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. आतां तज्जन्य ( कुंभारापासून जन्य ) असून तज्जन्यजनक ( कुंभारापासून होणाऱ्या घटाला उत्पन्न करणारा ), असा कुंभाराचा मुलगाही असल्यामुळें व्यापाराच्या लक्षणाची अतिव्याप्ति कुंभाराच्या मुलावर जाते. ती न जावी यासाठीं ' द्रव्याहून वेगळें असून ' असें पहिलें सत्यंत पद घातलें आहे. कुलालसुत द्रव्याहून वेगळा नाहीं तर द्रव्यच आहे. त्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. दंडाच्या रूपावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' तज्जन्यजनक ' असें म्हटलें आहे. आतां दंडावरील रूप हें द्रव्याहून अन्य व दंडापासून झालेलें जरी असलें तरी दंडापासून होणाऱ्या घटाला दंडाचें रूप हें कारण होत नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति नाहीं.

कार्यनियतपूर्ववृत्ति कारणम् ॥

(त० भा०)–जें कार्याच्या पूर्वी नियमानें असतें. तें कारण होय.

( न्या० ) कारणं लक्षयति–कार्यनियतेति । कार्यं प्रति नियतत्वे सति पूर्ववृत्तित्वम् । नियतत्वविशेषणानुपादाने पूर्ववर्तिनो रासभादेरपि घटादिकारणत्वं स्यादतो नियतत्वे सतीति विशेषणम् । नियतपूर्ववर्तिनो दण्डरूपादेरपि घटकारणत्वं स्यादतोऽनन्यथासिद्धपदमपि कारणलक्षणे निवेशनीयम् । दण्डरूपादीनां त्वन्यथासिद्धत्वात् ॥

(न्या० भा० )–'कार्यनियत०' यानें कार्याचें लक्षण करितात. कार्याप्रत जें नियत असून पूर्ववृत्ति असतें तें कारण होय. याठिकाणीं नियमानें–नियत असणें हें कारणाचें विशेषण जर लक्षणांत घातलें नाहीं तर रासभ देखील घटरूपी कार्याचें कारण होऊं लागेल. कारण तो देखील कार्याच्या ( घटादि रूप कार्याच्या ) पूर्वीच आहे. म्हणून ' नियमानें असणें ' हें विशेषण घातलें आहे. तो रासभ कार्याच्यापूर्वी नियत नसल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. तसेंच नियमानें पूर्वी असणारें जें दंडरूपी कारणाचें रूप तें सुद्धां घटाचें कारण होऊं लागेल. याकरितां कारणाच्या लक्षणांत ' अनन्यथासिद्ध ' हें पद घातलें पाहिजे. म्हणजे दंडावरील रूपादि अन्यथासिद्ध असल्यानें अनन्यथासिद्ध होत नाहीं. म्हणून त्याच्यावर कारणलक्षणाची अतिव्याप्ति जात नाहीं.

( प० ) कार्येति । कार्यान्नियतावश्यंभाविनी पूर्ववृत्ति पूर्वक्षणवृत्तिर्यस्य तत्तथेत्यर्थः । अनियतरासभादिवारणाय नियतेति । कार्यवारणाय पूर्वेति । दण्डरूपादिवारणायानन्यथासिद्धत्वविशेषणस्यावश्यकत्वेन तत एव रासभादिवारणसम्भवे नियतपदमनर्थकमेव । एवञ्चानन्यथासिद्धकार्यपूर्ववृत्ति कारणमिति फलितम् । अनन्यथासिद्धत्वमन्यथासिद्धिशून्यत्वम् । अन्यथासिद्धिश्चावश्यक्लृप्तनियतपूर्ववर्तिनैव कार्यसम्भवे तत्सहभूतत्वम् । यथावश्यक्लृप्तनियतपूर्ववर्तिभिर्दण्डादिभिरेव घटरूपकार्यसम्भवे तत्सहभूतत्वं दण्डत्वादौ तदन्यथासिद्धम् ॥

( प० भा० )–कार्याच्या अपेक्षेनें नियत–अवश्य भाविनी जी पूर्वक्षणवृत्ति ती ज्याला आहे ( ज्याचें पूर्व क्षणाचें ठिकाणीं असणें अवश्य आहे ) तें ' कार्यनियतपूर्ववृत्ति ' होय असा इत्यर्थ. अनियत रासभादिकांचें निवारण करण्यासाठीं 'नियत' हें पद घातलें आहे. रासभादि नियत नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. 'कार्याशीं जें नियतवृत्ति तें कारण' असें म्हटल्यास कार्य हें सुद्धां

कार्याशीं ( स्वतःशीं ) नियतवृत्ति असल्यानें त्यावर कारणाचें लक्षण जाऊं लागेल. यासाठीं 'पूर्ववृत्ति' म्हटलें आहे. कार्यच कार्याच्या पूर्ववृत्ति होत नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. कार्याच्या पूर्वी नियमानें असणारें जें दंडत्व याच्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'अनन्यथासिद्ध' हें विशेषण अवश्य द्यावें लागत असल्यामुळें व या विशेषणानेंच रासभादिकांवरील अतिव्याप्ति दूर होत असल्यानें लक्षणांतील 'नियत' पद व्यर्थ आहे. कारण रासभ अन्यथा सिद्ध आहे. अर्थात् जें अनन्यथा सिद्ध व कार्याच्या पूर्वी असणारें तें कारण असे कारणाचें लक्षण सिद्ध झालें. अनन्यथा सिद्ध म्हणजे अन्यथासिद्धिशून्य, अन्यथासिद्धि म्हणजे अवश्य कल्पिलेल्या व नियमानें पूर्वी असणाऱ्या कारणानें कार्याची उत्पत्ति होत असतां त्या कारणाबरोबर जें असतें तें अन्यथासिद्ध होय. असें अवश्य मानिलेल्या व नियमानें पूर्वी असणाऱ्या दंडादिक कारणानींच घटरूपी कार्याची उत्पत्ति होत असतां त्या कारणाबरोबर असणारें जें दंडत्व व त्याचें रूप इत्यादि अन्यथासिद्ध होय.

कार्यं प्रागभावप्रतियोगि ॥

( त० भा० )–जें प्रागभावाचें प्रतियोगी असतें तें कार्य.

( न्या० ) कार्यं लक्षयति–कार्यमिति। प्रागभावप्रतियोगित्वं कार्यस्य लक्षणम्। कार्योत्पत्तेः पूर्वं 'इह घटो भविष्यति' इति प्रतीतिर्जायते एतत्प्रतीतिविषयीभूतो योऽभावः प्रागभावः तत्प्रतियोगि घटादिरूपं कार्यम् ॥

( न्या० भा० )–'कार्यं०' या वाक्यानें कार्याचें लक्षण सांगतात प्रागभावाचें प्रतियोगित्व हें कार्याचें लक्षण आहे. कार्य उत्पन्न होण्यापूर्वी या ठिकाणीं घट होईल अशी प्रतीति येते. त्या प्रतीतीचा विषय होणारा जो अभाव तो प्रागभाव होय व घटादिरूप कार्यें त्याचीं प्रतियोगी आहेत.

( प० ) प्रागभावेति। कालादिवारणाय प्रागिति। असंभववारणाय प्रतियोगीति ॥

( प० भा० )–कालादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'प्राक्' असें म्हटलें आहे. पुढें येणाऱ्या भविष्यत्कालाचा अभाव आतां आहे. म्हणुन या अभावाचा प्रतियोगी भविष्यत्काल होईल. पण काल हा प्रागभावाचा प्रतियोगी होत

नाहीं. कारण त्याचा प्रागभावच नाहीं. म्हणून त्यावर अतिव्याप्ति नाहीं. ' जो प्रागभाव तें कार्य ' असें म्हटल्यास असंभव दोष येतो. तें लक्षण कोठेंच संभवत नाहीं. म्हणून ' प्रतियोगी ' असें म्हटलें आहे कार्य प्रागभाव जरी नसलें तरी त्याचें प्रतियोगि आहे. म्हणून त्या लक्षणाचा असंभव होत नाहीं.

कारणं त्रिविधं समवाय्यसमवायिनिमित्तभेदात् ॥

( त० भा० )–समवायि कारण, असमवायि कारण व निमित्त कारण या भेदानें कारण तीन प्रकारचें आहे.

( न्या० ) कारणं विभजते–कारणमिति । समवायिकारणमसमवायिकारणं निमित्तकारणं चेति ॥

( न्या० भा० )–' कारण० ' इत्यादि वाक्यानें समवायि कारण, असमवायि कारण व निमित्त कारण असा कारणांचा विभाग करितात.

यत्समवेतं कार्यमुत्पद्यते तत्समवायिकारणम्। यथा तन्तव पटस्य । पटश्च स्वगतरूपादेः

( त० भा० )–कार्य ज्याच्यामध्यें समवाय संबंधानें संबद्ध होऊन उत्पन्न होतें तें समवायि कारण होय. उदाहरणार्थ–तंतु हें पटाचें व पट हें आपल्या वरील रूपाचें समवायि कारण आहे.

( न्या० ) समवायिकारणं लक्षयति–यत्समवेतमिति । यस्मिन्समवेत तत्सम-वायेन संबद्ध सत्कार्यमुत्पद्यते तत्समवायिकारणमित्यर्थः । उदाहरणम्–यथा तन्तव इति । तन्तुषु समवायेन संबद्ध सत्पटात्मकं कार्यमुत्पद्यते ततन्तवः सम-यिकारणमित्यर्थः । सामान्यलक्षणं तु–समवायसंबन्धावच्छिन्नकार्यतानिरूपितता-दात्म्यसंबन्धावच्छिन्नकारणत्वं समवायिकारणत्वमिति । समवायसंबन्धेन घटा-धिकरणे कपालादौ कपालादेः तादात्म्यसंबन्धेनैव सत्त्वात्, समवायसंबन्धाव-च्छिन्नघटत्वावच्छिन्नकार्यतानिरूपिततादात्म्यसंबन्धावच्छिन्नकारणतायाः कपा-लादौ सत्त्वाल्लक्षणसमन्वयः । जन्यभावत्वावच्छिन्नं प्रति तादात्म्यसंबन्धेन द्रव्य-स्यैव कारणत्वाज्जन्यभावेषु द्रव्यगुणकर्मसु त्रिषु द्रव्यमेव समवायिकारणम् । द्रव्ये तु द्रव्यावयवाः समवायिकारणम् । अतो गुणादावपि द्रव्यमेव समवायिकारण-मित्याशयेनाह– पटश्च स्वगतरूपादेरिति । समवायिकारणमित्यनुषज्यते ॥

( न्या० भा० )–' यत्समवेतं० ' या वाक्यानें समवायि कार-णाचें लक्षण करितात. ज्याचे ठिकाणीं समवायसंबंधानें संबद्ध असें होत्सातें कार्य उत्पन्न होतें तें समवायि कारण होय. याचें ' यथा

तंतवः ' हें उदाहरण आहे. तंतूंचें ठिकाणीं समवायसंबंधानें संबद्ध असें होत्सातें पटरूपी कार्य उत्पन्न होतें म्हणून 'तंतु' हें त्याचें समवायि कारण होय. सामान्य लक्षण असें आहे कीं, समवायसंबंधानें अवच्छिन्न जी कार्यता त्या कार्यतेनें निरूपित-दाखविलेलें जें तादात्म्य-संबंधानें अवच्छिन्न कारणत्व त्याला जें आश्रय होतें तें समवायि कारण होय. घट समवायसंबंधानें ज्या कपालरूपी अधिकरणावर रहातो त्यावर कपाल हें तादात्म्य संबंधानेंच आहे. म्हणजे समवायसंबंधानें अवच्छिन्न व घटत्वानें अवच्छिन्न जी घटावर असणारी कार्यता तिनें दाखविलेली जी तादात्म्यसंबंधानें अवच्छिन्न कारणता ती कपालावर आहे. म्हणून त्याच्यावर समवायिकारणाच्या लक्षणाचा समन्वय होतो. जन्यभावत्व-उत्पन्न होणारें पदार्थत्व यानें अवच्छिन्न प्रत्येक पदार्थाचें कारणत्व तादात्म्यसंबंधानें द्रव्यालाच असल्यामुळें द्रव्य, गुण व कर्म हे जे तीन जन्य असून भाव पदार्थ आहेत त्यांतील द्रव्य हेंच समवायि कारण आहे आणि द्रव्याचें अवयव हेंच द्रव्याचें ( घटादि द्रव्याचें ) समवायि कारण आहे, म्हणून गुणादिकांचेंही द्रव्य हेंच समवायि कारण आहे, अशा अभिप्रायानें ' घट ' हा आपल्या वरील रूपादिगुणाचें समवायि कारण आहे असें मुळांत म्हटलें आहे. 'स्वगतरूपादेः' ह्मणजे आपल्यांतील रूपादिकांचें; याच्यापुढें ' समवायि कारण ' असा अनुषंग ह्मणजे अन्वय करून घ्यावा.

( प० ) यदिति । यस्मिन्समवायसंबन्धेन वर्तमानं तदित्यर्थः । चक्रादिवारणाय समवेतमिति ॥

( प० भा० )—'यत्समवेतं' ह्मणजे ज्याचे ठिकाणीं समवाय-संबंधानें असणारें कार्य उत्पन्न होतें तें समवायिकारण असा इत्यर्थ. चक्रादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' समवेत ' असें म्हटलें आहे. चक्रादिकांवर घटरूपी कार्य समवाय संबंधानें राहणारें नसल्यामुळें आतां त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं.

**कार्येण कारणेन वा सहैकस्मिन्नर्थे समवेतं सत् कारणमसमवायिकारणम् । यथा तन्तुसंयोगः पटस्य । तन्तुरूपं पटरूपस्य ॥**

( त०भा० )—कार्य किंवा कारण यांसहवर्तमान एका वस्तूवर समवायसंबंधानें राहणारें असें असून जें कारण होतें तें असमवायि कारण होय. जसें तंतूचा संयोग हें पटाचें असमवायि कारण आहे व तंतूचें रूप पटाच्या रूपाचें असमवायि कारण आहे.

( न्या० ) असमवायिकारणं लक्षयति—कार्येणेति । कार्येण सहैकस्मिन्नर्थे समवेत सत् यत् कारण तत् असमवायिकारणमित्यन्वय । कारणेन सहैकस्मिन्नर्थे समवेत सत् यत् कारणं तदसमवायिकारणमित्यन्वय । अत्र कारणेनेत्यस्य स्वकार्यसमवायिकारणेनेत्यर्थं । जन्यद्रव्यमात्रे अवयवसंयोगस्यैवासमवायिकारणत्वात्पटात्मककार्ये तदवयवतन्तुसंयोगस्यैवासमवायिकारणत्वमिति दर्शयति—यथा तन्तुसंयोग. पटस्येति । पटात्मककार्येण, सहैकस्मिन्नर्थे तन्तौ समवेत सत्समवायसंबन्धेन वर्तमान सत्पटात्मककार्यं प्रति तन्तुसंयोगात्मक कारणमसमवायि कारणमित्यर्थं । द्वितीयमसमवायिकारण कारणेन सहेत्यादिना पूर्वोक्त तदुदाहरति—तन्तुरूपमिति । कारणेन सह पटरूपसमवायिकारणीभूतपटेन सह एकस्मिन्नर्थे तन्तुरूपेऽर्थे समवेत सत्समवायसंबन्धेन वर्तमान सत् तन्तुरूप पटगतरूप प्रति कारण भवति, अतोऽसमवायिकारण तन्तुरूप पटगतरूपस्य । सामान्यलक्षण तु समवायसंबन्धावच्छिन्नकार्यतानिरूपिता या समवायस्वसमवायिसमवेतत्वान्यतरसंबन्धावच्छिन्ना कारणता तदाश्रयत्वमसमवायिकारणत्वमिति । द्रव्यासमवायिकारणीभूतावयवसंयोगादौ तु समवायसंबन्धावच्छिन्नघटत्वावच्छिन्नकार्यतानिरूपितासमवायसंबन्धावच्छिन्ना कपालद्वयसंयोगनिष्ठा कारणता कपालद्वयसंयोगे वर्तते । एवमाद्यपतनक्रियायामाद्यस्यन्दनक्रियायां च गुरुत्वद्रवत्वे असमवायिकारणे भवत । आद्यपतनक्रियां प्रति आद्यस्यन्दनक्रियां प्रति च समवायसंबन्धेनैव तयो कारणत्वात् । अवयविगुणादौ त्ववयवगुणादे स्वसमवायिसमवेतत्वसंबन्धेनैव कारणत्वात्। तत्संबन्धावच्छिन्नकारणताश्रयत्वमवयवगुणादौ वर्तते । अवयवगुणकपालतन्तुरूपादे स्वशब्दग्राह्यकपालरूपतन्तुरूपसमवायिकपालतन्तुसमवेतत्वसंबन्धेन घटपटादौ सत्त्वात् ॥

( न्या०भा० )–' कार्येण० ' यानें असमवायि कारणाचें लक्षण करितात. कार्यासह एका अर्थाचे ठायीं समवायसंबंधानें राहणारें असें होत्सातें जें कारण होतें तें असमवायि कारण होय, असा अन्वय लावावा व कारणासह एका वस्तूवर समवायसंबंधानें राहणारें असें होत्सातें जें कारण तें असमवायि कारण, असा अन्वय लावावा. या ठिकाणीं 'कारणेन सह' याचा आपल्या कार्याच्या समवायी कारणासह असा अर्थ करावा. उत्पन्न होणाऱ्या सर्व द्रव्यांत त्याच्या त्याच्या अवयवांचा संयोग हेंच असमवायी कारण असल्यानें पट

समवायसंबंधानें अवच्छिन्न अशी दोन कपालांच्या संयोगावर असणारी कारणता ती कपालद्वयाच्या संयोगावर आहे. म्हणून तो संयोग घटाचें असमवायि कारण होय. अशाच रीतीनें आद्य पतनक्रियेचें गुरुत्व व आद्य स्पंदन क्रियेचें द्रवत्व हें असमवायि कारण आहे. ( आद्य पतन क्रिया ज्या फळावर रहाते तेथेंच गुरुत्वही समवायसंबंधानेंच रहाणारें असून तें गुरुत्व पतनक्रियेला कारण होत असतें. म्हणून पतनक्रियारूपी कार्य व गुरुत्वरूपी कारण यांचें फळाचे ठायीं सामानाधिकरण्य असल्यानें त्यांच्यांत कार्यकारणभाव संभवतो व हें गुरुत्व पतनक्रियेचें असमवायी कारण होतें. ) कारण आद्य पतनक्रियेला व आद्य स्पंदनक्रियेला त्या क्रिया ज्या ठिकाणी घडतात त्या ठिकाणीं समवायसंबंधानें राहून हे गुण कारण होत असतात. अवयवीच्या गुणादिकांचे अवयवांचें गुण स्वसमवायिसमवेतत्व या संबंधानें कारण होत असतात. त्या संबंधानें अवच्छिन्न जी कारणता तिला अवयवांचे गुण आश्रय होत असतात. म्हणून ते अवयवींच्या गुणाला असमवायि कारण होतात आणि अवयवांचे गुण म्हणजे कपालाचें रूप किंवा तंतूचें रूप हे 'स्व' शब्दानें ग्राह्य जें कपालरूप किंवा तंतुरूप त्यांचा समवाय कपालावर किंवा तंतूवर ते असल्यामुळे असमवायी होत. म्हणून त्यांच्यावर समवाय संबंधानें राहणारा घट किंवा पट हे समवेत होत. म्हणूनच त्यांच्यावर समवेतत्व हा धर्म रहातो. तेव्हां या स्वसमवायिसमवेतत्वसंबंधानें तंतूचें रूप पटावर आलें व तेथेंच त्याचें कार्य जें पटावरील रूप तेंही आहे, म्हणून कार्यकारणांचें सामानाधिकरण्य झालें व अशा रीतीनें तें कपालरूप घटरूपाचें व तंतूरूप पटरूपाचें असमवायि कारण होतें.

( प० ) कार्येणेति । कार्येण कारणेन वा सहैकस्मिन्नर्थे समवेतत्वे सति आत्मविशेषगुणभिन्नत्वे सति यत्कारणं तदसमवायिकारणम् । तन्तुसंयोगादावव्याप्तिवारणाय कार्येणेति । तन्तुरूपादावव्याप्तिवारणाय कारणेनेति । आत्मविशेषगुणेऽतिव्याप्तिवारणायात्मविशेषगुणभिन्नत्वे सतीति । विशेषणवारणाय कारणमिति ॥

( प०भा० )—कार्य किंवा कारण यासह एका अर्थाचे ठायीं समवायसंबंधानें राहून व आत्म्याच्या विशेष गुणाहून भिन्न असून जें कारण होतें तें असमवायि कारण होय. तंतूच्या संयोगावर या

लक्षणाची अव्याप्ति होते. तिचें निवारण करण्याकरितां ' कार्यासह ' असें म्हटलें आहे. तसेंच तंतुरूपावर येणाऱ्या अव्याप्तीचें निवारण करण्याकरितां ' कारणासह ' असें म्हटलें आहे. आत्म्याच्या विशेष गुणाहून भिन्न असें म्हणण्याचें कारण हें कीं आत्म्याचे विशेष गुण कोणाचेही असमवायी कारण होत नसतात, असा सिद्धांत आहे. तेव्हां त्यांच्यावर हें लक्षण असें जातें जाणतो, इच्छितो, आणि प्रयत्न करितो, या नियमानुसार ज्ञानापासून इच्छा व इच्छेपासून प्रयत्न होत असतो असें ठरतें. तेव्हां कार्य जी इच्छा त्या इच्छेसह ज्ञान रूपी कारण हें आत्मरूपी जो एक अर्थ त्यावर समवायसंबंधानें रहात असून तें ज्ञान इच्छेला कारणही होतें. म्हणून तें असमवायि कारण होऊं लागेल. म्हणजे त्याच्यावर असमवायि कारणाचें लक्षण जाऊं लागेल. तें न जावें यास्तव त्या लक्षणांत ' आत्मविशेष गुणाहून वेगळें असून ' असें पद घातलें पाहिजे व नित्य द्रव्यावर असणारे जे विशेष त्यावर अशीच लक्षणाची अतिव्याप्ति न जावी म्हणून ' कारण ' असेंही त्या लक्षणांत पद पाहिजे. नाहीं तर पूर्वीप्रमाणें कार्य जी इच्छा किंवा कारण जें ज्ञान यांच्यासह आत्मरूप अर्थाचे ठिकाणीं विशेष हे समवायसंबंधानें रहाणारे असून ते आत्म्याच्या विशेष गुणाहून वेगळेही आहेत. ( यावरून वास्तविक विशेष हें कोणाचेही असमवायि कारण होत नसतांना त्यांच्यावर वरीलप्रमाणें असमवायी कारणाचें लक्षण जातें तें न जावें यासाठीं लक्षणांत ' कारण ' असें म्हटलें पाहिजे. म्हणजे ते विशेष कोणाचेही कारण होत नसल्यानें लक्षणांतील बाकीचीं पदें जरी त्या विशेषांवर आलीं तरी ' कारण ' हें पद येत नसल्यानें असमवायि कारणाच्या लक्षणाची विशेषावर अतिव्याप्ति जात नाहीं.

तदुभयभिन्नं कारणं निमित्तकारणम्। यथा तुरीवेमादिकं पटस्य ॥

( त० भा० )–ह्या दोघांहून भिन्न असें जें कारण तें निमित्त कारण होय. जसें पट या कार्याची तुरी ( फणी ) वेमा ( धोटा ) इत्यादि निमित्त कारणें आहेत.

( न्या० ) निमित्तकारणं लक्षयति–तदुभयभिन्नमिति। समवायिकारणभिन्नत्वे सति असमवायिकारणभिन्नत्वे सति कारणत्वं निमित्तकारणत्वमित्यर्थः ॥

( न्या० भा० )–समवायिकारणाहून वेगळें असून व असमवायि कारणाहून वेगळें असून जें कारण असतें तें निमित्तकारण होय.

( प० ) तदुभयभिन्नं कारणं निमित्तकारणमिति । समवाय्यसमवायि-कारणवारणाय तदुभयभिन्नमिति । विशेषादावतिव्याप्तिवारणाय कारणमिति ॥

( प० भा० )–वर नुसतें 'जें कारण असतें तें निमित्त कारण' असें म्हटल्यास समवायि व असमवायि हीं कारणें असल्यानें त्याचे-वर अतिव्याप्ति जाईल. ती जाऊं नये म्हणून 'त्या दोघांहून भिन्न' असें म्हटलें पाहिजे. म्हणजे तीं स्वतःहून भिन्न नसल्यानें अति-व्याप्ति जात नाहीं. आतां 'त्या दोघांहून जें भिन्न तें निमित्त कारण होय' असें म्हटल्यास विशेषरूपी पदार्थ हाही त्या दोघांहून भिन्न असल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जाईल ती न जावी यास्तव कारण असें पद घालावें.

तदेतत्त्रिविधकारणमध्ये यदसाधारणं कारणं तदेव करणम् ॥

( प० भा० )–ह्या तीन प्रकारच्या कारणांपैकीं जें असाधारण कारण तेंच करण होय.

( न्या० ) तदेतदिति । यदसाधारणमिति । व्यापारवत्त्वे सतीत्यपि पूरणीयम् । अन्यथा तन्तुकपालसंयोगयोरतिव्याप्तिः । तन्तुकपालसंयोगयोरपि कार्यत्वातिरिक्तपटत्वघटत्वावच्छिन्नं प्रति कारणत्वादसाधारणत्वमस्त्येव अतस्तत्र करणत्ववारणाय व्यापारवत्त्वे सतीति करणलक्षणे विशेषणं देयम् । व्यापारवत्त्वं च तज्जन्यत्वे सति तज्जन्यजनकत्वम् । भवति हि दण्डजन्यत्वे सति दण्डजन्यघटजनकत्वाद्भ्रम्यादेर्दण्डव्यापारत्वम् । एवं कपालसंयोगतन्तुसंयोगादेरपि कपालतन्तुव्यापारत्वं कपालतन्तुजन्यत्वे सति कपालतन्तुजन्यघटपट-जनकत्वात् । करणलक्षणेऽसाधारणत्वविशेषणानुपादाने ईश्वरादृष्टादेरपि व्यापार-वत्कारणत्वस्य सत्त्वात्, तत्रातिव्याप्तिवारणायासाधारणेति विशेषणम् ॥

( न्या० भा० )–जें असाधारण कारण असतें तें व्यापारवान्हीं असलें पाहिजे, असें म्हटलें पाहिजे. असें न म्हटल्यास ततूंचा संयोग व कपालांचा संयोग यांच्यावर अतिव्याप्ति जाते. कारण तंतूंचा संयोग व कपालांचा संयोग हे, कार्यत्वाहून वेगळ्या पटत्व व घटत्व यांनीं युक्त असे जे पट व घट यांना कारण होत असल्यामुळें तेही असाधारण होणारच. याकरितां यांच्यावर करणलक्षणाची

अतिव्याप्ति न जावी म्हणून 'व्यापारवान्' असें कारणाला विशेषण करणलक्षणामध्यें घातलें पाहिजे. व्यापार म्हणजे त्यापासून उत्पन्न होऊन त्यापासूनच उत्पन्न होणाऱ्याला उत्पन्न करणारा असा असतो. फिरणें हा दंडाचा व्यापार आहे. कारण तो दंडापासून उत्पन्न होऊन दंडापासूनच उत्पन्न होणारा जो घट त्याला उत्पन्न करणारा हा भ्रम्यादि ( फिरणें इत्यादि ) व्यापार होतो. अशाच रीतीनें कपालांचे संयोग व तंतूंचे संयोग हे सुद्धां कपाल व तंतु यांचे व्यापार होत. कारण हे कपाल व तंतु यांपासून उत्पन्न होणारे असून अनुक्रमें कपालापासून उत्पन्न होणारा जो घट व तंतूपासून उत्पन्न होणारा जो पट ह्यांना उत्पन्न करणारे आहेत. याच कारणानें ते व्यापार होऊं शकतात. करणाच्या लक्षणांत 'असाधारण' हें विशेषण न दिल्यास ईश्वर व अदृष्ट हे सुद्धां व्यापारवान् असून कारणही आहेत. तेव्हां यांच्यावर करणलक्षणाची अतिव्याप्ति न जावी म्हणून 'असाधारण' हें विशेषण घालावें. हें विशेषण दिलें म्हणजे ईश्वरादीक साधारण कारण असल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जात नाहीं.

( प० ) तदेतदिति । यस्मात्कारणात्करणत्वघटकं कारणमुपदर्शितं तस्मादेतत्त्रिविधसाधकमध्ये यत्साधकतमं तदेव करणमिति भावः ॥ इति करणप्रपञ्चः ॥

( प० भा० )—ज्या अर्थी करणत्वाचें घटक असें कारण दाखविलें त्याअर्थी त्या ह्या तीन कारणांमध्यें जें कार्याला अतिशय साधक असेल तेंच करण असा भाव आहे. असा करणाचा विस्तार झाला.

तत्र प्रत्यक्षज्ञानकरणं प्रत्यक्षम् ॥

( त० भा० )—त्यापैकीं प्रत्यक्षज्ञानाचें जें करण तें प्रत्यक्षप्रमाण होय.

( न्या० ) षड्विधेन्द्रियभूतप्रत्यक्षप्रमाणस्य लक्षणमाह—तत्रेति । प्रमाभूतेषु प्रत्यक्षात्मकं यज्ज्ञानं चाक्षुषादिप्रत्यक्षं तत्प्रति व्यापारवदसाधारणं कारणमिन्द्रियं भवति । अतः प्रत्यक्षज्ञानकरणत्वं प्रत्यक्षस्य लक्षणम् । आद्यसंनिकर्षातिरिक्तचतुर्विधसंनिकर्षाणां समवायरूपत्वेनेन्द्रियजन्यत्वाभावाद्व्यापारत्वं न संभवतीति इन्द्रियमनःसंयोगस्यैव बाह्यप्रत्यक्षे जननीये इन्द्रियव्यापारता बोध्या। मानसप्रत्यक्षे त्वात्ममनःसंयोगस्यैव सा बोध्या ॥

( न्या० भा० )—सहा प्रकारच्या इंद्रियरूपी प्रत्यक्षप्रमाणाचें

'तत्रेति,' यानें लक्षण सांगतात. प्रमाभूत जीं ज्ञानें त्यामध्यें प्रत्यक्षात्मक जें ज्ञान म्हणजे चाक्षुषादि प्रत्यक्षज्ञान त्याचें 'व्यापारवान् असाधारण कारण' इंद्रिय आहे. म्हणून प्रत्यक्ष ज्ञानाचें करणत्व' हें प्रत्यक्षप्रमाणाचें लक्षण होय. आद्य संनिकर्षावाचून बाकीचे चार संनिकर्ष हे समवायरूप असल्यामुळे व समवाय नित्य असल्यामुळें ते इंद्रियजन्य होऊं शकत नाहीत. म्हणून ते व्यापारही होत नाहींत ह्यासाठीं बाह्य प्रत्यक्ष उत्पन्न व्हावयाचें असतां इंद्रियें व मन यांचा संयोग हाच व्यापार आहे, असें समजावें व मानस प्रत्यक्षामध्यें आत्मा व मन यांचा संयोग हा व्यापार आहे असें समजावें.

( प० ) तत्रेति । प्रमाणचतुष्टयमध्ये । दण्डादिवारणाय ज्ञानेति । अनुमानादिवारणाय प्रत्यक्षेति ॥

( प० भा० )—'तत्र' म्हणजे चार प्रकारच्या प्रमाणांमध्यें दंडावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं प्रत्यक्षप्रमाणाच्या लक्षणांत 'ज्ञान' असें पद घातलें आहे. हें घातल्यानें दंड हा ज्ञानाचें करण होत नसल्यानें त्याचेवर आतां अतिव्याप्ति जात नाहीं. आतां 'ज्ञानाच्या करणास' प्रत्यक्षप्रमाण म्हटल्यास अनुमानादिक देखील अनुमिति इत्यादि ज्ञानांचीं करणें होत असल्यामुळें त्यांचेवर हें लक्षण जाईल. ह्याकरितां 'प्रत्यक्ष' असें म्हटलें आहे. असें म्हटल्यानें अनुमानादिक प्रत्यक्षज्ञानाचीं करणें होत नसल्यानें त्याचेवर प्रत्यक्षप्रमाणाच्या लक्षणाची अतिव्याप्ति जात नाहीं.

[ ज्ञानाकरणकं ज्ञानं प्रत्यक्षम् ]
इन्द्रियार्थसंनिकर्षजन्यं ज्ञानं प्रत्यक्षम् । तद्द्विविधम् ।
निर्विकल्पकं सविकल्पकं चेति ॥

( त० भा० )—ज्ञान ज्याला करण होत नाहीं तें प्रत्यक्ष ज्ञान होय. किंवा इंद्रिय आणि अर्थ यांच्या संनिकर्षापासून उत्पन्न होणारें जें ज्ञान तें प्रत्यक्षज्ञान होय. तें सविकल्पक व निर्विकल्पक असें दोन प्रकारचें आहे.

( न्या० ) प्रत्यक्षप्रमाणलक्षणमुक्त्वा प्रत्यक्षप्रमालक्षणमाह–[ ज्ञानाकरणकमिति । क्षेपकं लक्षणमिदम् । ज्ञानं व्याप्तिज्ञानं सादृश्यज्ञानं पदज्ञानं च तदेव करणं येषां ते ज्ञानकरणका अनुमित्युपमितिशाब्दाः। ज्ञानकरणकं न भवतीति ज्ञानाकरणकम् । तत्त्वं प्रत्यक्षलक्षणम् । इदं लक्षणमीश्वरप्रत्यक्षसाधारणम् ।

ईश्वरप्रत्यक्षस्याजन्यत्वात्, जन्यप्रत्यक्षे च इन्द्रियाणामेव करणत्वं न तु ज्ञानस्येति तयोरुभयोः संग्रहः । ]

इन्द्रियार्थसंनिकर्षेति । जन्यप्रत्यक्षस्यैव लक्ष्यत्वमित्यभिप्रायेणेदं लक्षणम् । प्रत्यक्षं विभजते–निर्विकल्पकमिति ॥

( न्या०भा० )–प्रत्यक्षप्रमाणाचें लक्षण सांगून आतां प्रत्यक्ष प्रमेचें लक्षण सांगतात. 'ज्ञानाकरणकं०' हें लक्षण क्षेपक आहे. ज्ञान ह्मणजे व्याप्तिज्ञान, किंवा सादृश्यज्ञान, अथवा पदज्ञान हीं ज्यांचीं करणें आहेत तीं ज्ञानकरणक ज्ञानें होत. ह्मणजे अनुमिति, उपमिति, व शब्दज्ञान हीं होत. असें जें ज्ञानकरणक नाहीं तें ज्ञानाकरणक होय. हेंच प्रत्यक्षप्रमेचें लक्षण आहे. प्रत्यक्ष प्रमेला कोणतेंही ज्ञान करण होत नसतें. हें लक्षण ईश्वराच्या प्रत्यक्षज्ञानालाही साधारण आहे. ह्मणजे ईश्वरप्रत्यक्षावर हें लक्षण जातें. कारण ईश्वरप्रत्यक्षज्ञान उत्पन्न होणारें नसतें व जन्य जें प्रत्यक्ष त्याचें इंद्रियें हेंच करण असल्यामुळें तेथें ज्ञान 'करण' नाहीं. म्हणून या लक्षणानें जन्य व अजन्य या दोन्ही प्रत्यक्षांचा संग्रह होतो. जन्यप्रत्यक्ष हेंच लक्ष्य आहे असें समजून 'इंद्रियार्थसंनिकर्षजन्यज्ञान' असें प्रत्यक्षलक्षण केलें आहे. 'निर्विकल्पक' या वाक्यानें प्रत्यक्षज्ञानाचा विभाग केला आहे.

( प० ) इन्द्रियार्थेति । इन्द्रियं चक्षुरादिकमर्थो घटादिस्तयोः संनिकर्षः संयोगादिस्तज्जन्यं ज्ञानं प्रत्यक्षमित्यर्थः। संनिकर्षध्वंसवारणाय ज्ञानमिति । अनुमित्यादिवारणायेन्द्रियार्थसंनिकर्षेति। ननु सोपनेत्रचक्षुषा कथं पदार्थग्रहणं चक्षुष उपनेत्रनिरुद्धत्वेन पदार्थेन सह संनिकर्षाभावात् । कथं वा स्वच्छजाह्नवीसलिलावृतमत्स्यादिश्चक्षुषा ग्रहणमिति चेन्न । स्वच्छद्रव्यस्य तेजोनिरोधकत्वाभावेन तदन्तश्चक्षुःप्रवेशसंभवात् । न चेश्वरप्रत्यक्षेऽव्याप्तिरिति वाच्यम् । अत्र जन्यप्रत्यक्षस्यैव लक्षितत्वात् ॥

( प० भा० )–'इंद्रिय' ह्मणजे चक्षुरादिक व अर्थ म्हणजे घटादिक, त्यांचा संनिकर्ष म्हणजे संयोगादिक, त्यापासून होणाऱ्या ज्ञानास 'प्रत्यक्ष' असें ह्मणतात. संनिकर्षध्वंसही इंद्रियार्थसंनिकर्षापासून जन्य असल्यामुळें याचेवर प्रत्यक्षप्रमेचें लक्षण जाऊं लागेल, याकरितां लक्षणांत 'ज्ञान' असें पद घातलें आहे. तें घातल्यानें ध्वंस हा अभाव असल्यानें व तो ज्ञान नसल्यानें त्याचेवर अति-

व्याप्ति जात नाही. आतां 'जें ज्ञान तें प्रत्यक्ष' असें ह्मटल्यास 'अनुमिति' इत्यादिकहि ज्ञानेंच असल्यानें त्यांचेवर ह्या लक्षणाची अतिव्याप्ति जाईल. ती न जावी याकरितां 'इंद्रियार्थसंनिकर्षजन्य' असें ह्मटलें आहे. 'अनुमिति' इत्यादि ज्ञानें इंद्रिय व अर्थ यांच्या संनिकर्षापासून उत्पन्न होत नसल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जात नाही. 'अहो पण, ज्यावर उपनेत्र घातले आहेत अशा डोळ्यानें पदार्थाचें ग्रहण कसें होतें! कारण डोळा हा चष्म्यानें निरुद्ध झाल्यानें त्याचा पदार्थाशीं संनिकर्ष होत नाहीं. तसेंच, स्वच्छ अशा जान्हवीच्या पाण्यामध्यें असणाऱ्या मासे इत्यादि प्राण्यांचें कसें बरें डोळ्यानें ग्रहण होतें! कारण तेथेंही मासे इत्यादिकांशीं चक्षुरादिक इंद्रियांचा संनिकर्ष होत नाहीं' असें म्हणाल तर तें बरोबर नाही. कारण, स्वच्छ द्रव्यें तेजाचा निरोध करीत नसल्यानें पाण्यांत देखील चक्षूचा प्रवेश संभवतो, व त्यातील वस्तूशीं संनिकर्ष होतो. त्यामुळें प्रत्यक्षज्ञान होतें. 'अहोपण ईश्वराच्या प्रत्यक्षज्ञानामध्यें या लक्षणाची अव्याप्ति होते कारण तें ज्ञान जन्य नाहीं' असें जर ह्मणाल तर तसेंही म्हणण्याचें कारण नाहीं, कारण, येथें 'जन्य प्रत्यक्ष' हेंच लक्ष्य मानून प्रत्यक्षप्रमेचें लक्षण केलें आहे. ईश्वराचें प्रत्यक्ष जन्य नाहीं. त्यामुळें तें यांचें लक्ष्य नाही. म्हणून त्यांत अव्याप्ति होतें हें ह्मणणेंही योग्य नाहीं.

तत्र निष्प्रकारकं ज्ञानं निर्विकल्पकम् ॥

( त० भा० )—ज्यामध्यें कोणताही प्रकार नाहीं, त्या ज्ञानास निर्विकल्पक ज्ञान ह्मणतात.

( न्या० ) तल्लक्षयति—तत्र निष्प्रकारकमिति। प्रकारताशून्यज्ञानत्वमेव निर्विकल्पकत्वमित्यर्थः । निर्विकल्पके चतुर्थी विषयता स्वीक्रियते । न तु त्रिविधविषयतामध्ये कापि तत्रास्ति। अतो विशेष्यताशून्यज्ञानत्वं संसर्गताशून्यज्ञानत्वमित्यपि लक्षणं संभवति ॥

(न्या० भा०)—'तत्र निष्प्रकारकं०' या खंडानें निर्विकल्पक ज्ञानाचें लक्षण करितात. प्रकारतेनें शून्य असें ज्ञानत्व हेंच निर्विकल्पक ज्ञान होय. निर्विकल्पकामध्यें चवथी विषयता स्वीकारीत असतात. तीन प्रकारच्या विषयतेपैकीं त्याठिकाणीं कोणतीहि विषयता असत नाहीं.

ह्मणून 'विशेष्यतेनें शून्य असें ज्ञानत्व' किंवा 'ज्या ज्ञानामध्यें विशेषण आणि विशेष्य यांचा संबंध भासत नाहीं,' अशीं हीं दोन निर्विकल्पक ज्ञानाचीं लक्षणें संभवतात.

( प० ) तत्र निष्प्रकारेति । सविकल्पकेऽतिव्याप्तिवारणाय निष्प्रकारकमिति । प्रकारवारणाय ज्ञानमिति ॥

( प० भा० )–सविकल्पक ज्ञानावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'निष्प्रकारक' असें म्हटलें आहे. त्यामुळें सविकल्पक ज्ञानांत प्रकार असल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. आतां 'जें निष्प्रकारक तें निर्विकल्पक' असें म्हटल्यास प्रकार हा देखील निष्प्रकारक असल्यानें म्हणजे त्याच्यावर पुनः प्रकार रहात नसल्यानें त्यावर निर्विकल्पक ज्ञानाची अतिव्याप्ति होऊं लागेल, यासाठीं 'ज्ञान' असें म्हटलें आहे. प्रकार ज्ञान नसल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं.

सप्रकारकं ज्ञानं सविकल्पकम् । यथा डित्थोऽयं ब्राह्मणोऽयं श्यामोऽयमिति ॥

( त० भा० )–जें सप्रकारक ज्ञान असतें तें सविकल्पक होय. उदाहरणार्थ, हा डित्थ आहे, हा ब्राह्मण आहे, हा श्याम आहे इत्यादि.

( न्या० ) सविकल्पकं लक्षयति–सप्रकारकमिति । विषयताया ज्ञाननिरूपितत्वाज्ज्ञानस्य विषयतानिरूपकत्वेन प्रकारतानिरूपकज्ञानत्वं सविकल्पकस्य लक्षणम् । एवं विशेष्यतानिरूपकज्ञानत्वं संसर्गतानिरूपकज्ञानत्वमित्यपि लक्षणं संभवति । उदाहरणम्–यथेति । इदन्त्वावच्छिन्नविशेष्यतानिरूपितडित्थत्वप्रकारताशालिज्ञानं ब्राह्मणत्वप्रकारताशालिज्ञानं च सविकल्पकमित्यर्थः ॥

( न्या० भा० )–'सप्रकारकं०' या वाक्यानें सविकल्पक ज्ञानाचें लक्षण करितात. विषयता ज्ञानानें निरूपित असल्यामुळें, म्हणजे ज्ञान हें त्या विषयतेचें निरूपक असल्यामुळें 'प्रकारतेचें निरूपक ज्ञानत्व' हें सविकल्पक ज्ञानाचें लक्षण आहे. त्याचि प्रमाणें रीतीनें 'विशेष्यतेचें निरूपक व संसर्गतेचें निरूपक असें जें ज्ञान तें सविकल्पकज्ञान' असें हें लक्षण संभवतें. 'यथेति०' ह्यानें या ज्ञानाचें उदाहरण दिलें आहे. इदंत्वानें अवच्छिन्न जी विशेष्यता तिनें दाखविलेली--निरूपित जी डित्थत्वनिष्ठ--डित्थत्वावर असणारी प्रकारता तिनें

शोभणारें ज्ञान किंवा ब्राह्मणत्वावर असणाऱ्या प्रकारतेनें युक्त जें ज्ञान तें सविकल्पक ज्ञान होय, असा याचा इत्यर्थ.

( प० ) सप्रकारकेति । घटादिवारणाय ज्ञानमिति । निर्विकल्पकवारणाय सप्रकारकमिति ॥

(प० भा० )–' जें सप्रकारक असतें तें सविकल्पक ' असें म्हटल्यास ' हा घट ' या वाक्यातील घटादि वस्तुसुद्धां घटत्व या प्रकारानें युक्त असल्यामुळें त्याच्यावर सविकल्पकाचें लक्षण जाऊं लागेल यासाठीं ' ज्ञान ' असें म्हटलें आहे, त्यामुळें घटादि वस्तु ज्ञान नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति होत नाहीं. आतां ' जें ज्ञान तें सविकल्पक असें म्हटल्यास निर्विकल्पक ज्ञानसुद्धां ज्ञानच असल्यानें त्यावर सविकल्पकाचें लक्षण जाऊं लागेल. तें न जावें यासाठीं ' सप्रकारक ' असें म्हटलें आहे. म्हणजे निर्विकल्पक ज्ञान हें सप्रकारक नसल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति होत नाहीं.

प्रत्यक्षज्ञानहेतुरिन्द्रियार्थसंनिकर्षः षड्विधः । संयोगः संयुक्तसमवायः संयुक्तसमवेतसमवायः समवायः समवेतसमवायो विशेषणविशेष्यभावश्चेति ॥

( त०भा० )–प्रत्यक्ष ज्ञानाचा कारण होणारा जो इंद्रिय व अर्थ यांचा संनिकर्ष तो सहा प्रकारचा आहे. ते प्रकार असेः–संयोग, संयुक्तसमवाय, संयुक्तसमवेतसमवाय, समवाय, समवेतसमवाय, व विशेषणविशेष्यभाव.

( न्या० ) चाक्षुषादिषड्विधप्रत्यक्षकारणीभूतान् षड्विधसंनिकर्षान्विभजते–संयोग इत्यादिना । द्रव्यवृत्तिलौकिकविषयतासंबन्धेन चाक्षुषत्वावच्छिन्नं प्रति चक्षुःसंयोगः कारणम् । द्रव्यसमवेतवृत्तिलौकिकविषयतासंबन्धेन चाक्षुषत्वावच्छिन्नं प्रति चक्षुःसंयुक्तसमवायस्य हेतुत्वम् । द्रव्यसमवेतसमवेतवृत्तिलौकिकविषयतासंबन्धेन चाक्षुषत्वावच्छिन्नं प्रति चक्षुःसंयुक्तसमवेतसमवायस्य हेतुत्वम् । *द्रव्यग्राहकाणीन्द्रियाणि चक्षुस्त्वङ्मनांसि त्रीण्येव । अन्यानि घ्राणरसनश्रवणानि* गुणग्राहकाणि । अतस्त्वगिन्द्रियस्थले द्रव्यवृत्तिलौकिकविषयतासंबन्धेन त्वाचप्रत्यक्षत्वावच्छिन्नं प्रति त्वक्संयोगस्य हेतुता । एवं द्रव्यसमवेतत्वाचप्रत्यक्षत्वावच्छिन्नं प्रति त्वक्संयुक्तसमवायस्य हेतुता । द्रव्यसमवेतसमवेतोष्णत्वशीतत्वादि*जातिस्पार्शनप्रत्यक्षे त्वक्संयुक्तसमवेतसमवायस्य हेतुता । एवमात्ममानसप्रत्यक्षे* मनःसंयोगस्य हेतुता । आत्मसमवेतसुखादिमानसप्रत्यक्षे मनःसंयुक्तसमवायस्य हेतुता । *आत्मसमवेतसमवेतसुखत्वादिमानसप्रत्यक्षे मनःसंयुक्तसमवेतसमवायस्य*

हेतुता । रसनघ्राणयोस्तु रसगन्धतद्गतजातिग्राहकत्वेन द्वितीयतृतीययोः संनिकर्षयोरेव तत्र हेतुता वाच्या। श्रवणेन्द्रियस्याकाशरूपत्वेन शब्दस्याकाशगुणत्वेन श्रवणेन्द्रियेण च समं शब्दस्य समवायः संनिकर्षः । शब्दवृत्तिशब्दत्वकत्वत्वादिजातिविषयकश्रावणप्रत्यक्षे समवेतसमवायस्य हेतुता। अभावप्रत्यक्षे विशेषणविशेष्यभावो नाम विशेषणतासंनिकर्षः । पञ्चविधसंनिकर्षोपरि विशेषणता योजनीया । तथाहि– द्रव्याधिकरणकाभावप्रत्यक्षे इंद्रियसंयुक्तविशेषणता । द्रव्यसमवेताधिकरणकाभावप्रत्यक्षे इन्द्रियसंयुक्तसमवेतविशेषणता। द्रव्यसमवेतसमवेताधिकरणकाभावप्रत्यक्षे इन्द्रियसंयुक्तसमवेतसमवेतविशेषणता । संयोगस्थाने संयुक्तपदं घटयित्वा समवायस्थाने समवेतपदं घटयित्वा अभावप्रत्यक्षस्थले निर्वाह्यम् । यथा घटद्रव्यसमवेतं घटत्वं पृथ्वीत्वादिकं रूपादिकं च । तत्र नीलादौ पीतत्वाभावः घटत्वादिजातौ पटत्वाभावश्च वर्तते स चाभावः संयुक्तसमवेतविशेषणतासंनिकर्षेण गृह्यते । एवं नीलत्वादिजातौ पीतत्वाभावोऽपीन्द्रियसंयुक्तसमवेतसमवेतविशेषणतासंनिकर्षेण गृह्यते । घटसमवेतं नीलं तत्समवेतं नीलत्वं तद्विशेषणता पीतत्वाभावे वर्तते इति रहस्यः ॥ इति प्रत्यक्षपरिच्छेदः ॥

( न्या० भा० )–चाक्षुषादि सहा प्रकारच्या प्रत्यक्ष ज्ञानांना कारण होणाऱ्या सहा प्रकारच्या संबंधांचा विभाग 'संयोगः०' इत्यादि ग्रंथानें करितात. चाक्षुषत्वानें अवच्छिन्न जें चाक्षुषज्ञान त्याला चक्षूचा संयोग द्रव्यावर असणाऱ्या 'लौकिकविषयता-' नांवाच्या संबंधानें कारण आहे. द्रव्यावर समवायसंबंधानें राहणारा जो लौकिकविषयतासंबंध त्यानें चाक्षुषत्वावच्छिन्न ज्ञानाला चक्षुःसंयुक्तसमवाय कारण होतो. आतां द्रव्यसमवेताशीं ( रूपादिकाशीं ) जें ( रूपत्वादिक ) समवेत असतें त्यावर असणाऱ्या लौकिकविषयतासंबंधानें चाक्षुषत्वावच्छिन्न चाक्षुषज्ञानाला चक्षुःसंयुक्तसमवेतसमवाय हेतु आहे. द्रव्याचें ग्रहण करणारीं इंद्रियें चक्षु त्वक् व मन हीं तीनच आहेत. बाकीचीं घ्राण, जिव्हा, व कर्ण हीं गुणांचें ग्रहण करणारीं आहेत. म्हणून त्वगिंद्रियाच्या स्थलीं द्रव्यावरील लौकिकविषयतासंबंधानें त्वगिंद्रियापासून होणाऱ्या प्रत्यक्षज्ञानाचा त्वक्संयोग हेतु आहे. अशाच रीतीनें द्रव्यसमवेताच्या त्वगिंद्रियापासून होणाऱ्या प्रत्यक्षास त्वक्संयुक्तसमवाय कारण आहे. आतां द्रव्यसमवेत जो उष्ण इत्यादि स्पर्श त्यावर समवेत ज्या उष्णत्व, शीतत्व इत्यादि जाती त्यांच्या स्पार्शन प्रत्यक्षाचा त्वक्संयुक्तसमवेतसमवाय हेतु आहे. अशाच रीतीनें आत्म्याच्या मानस प्रत्यक्षामध्यें मनाचा संयोग हें कारण आहे.

आत्म्यावर समवायसंबंधानें राहणारे जे सुखादि गुण त्यांचें जें मानस प्रत्यक्ष होतें त्यामध्यें मनःसंयुक्तसमवाय कारण होतो. त्याचप्रमाणे आत्मसमवेत जे सुखादि गुण, त्याशीं समवेत ज्या सुखत्वादि जाति, त्याच्या मानस प्रत्यक्षाचें मनःसंयुक्तसमवेतसमवाय कारण आहे. रसन व घ्राण, हीं इंद्रियें रस व गंध आणि त्यावरील जाति यांचें ग्रहण करणारीं असल्यामुळें त्यांचें ज्ञान होतांना अनुक्रमें दुसरा संयुक्तसमवाय व तिसरा संयुक्तसमवेतसमवाय हे संनिकर्षच कारण होतात असें म्हणावें. श्रवणेंद्रिय आकाशरूपी व त्यानें व शब्द हा आकाशाचा गुण असल्यानें श्रवणेंद्रियाबरोबर शब्दाचा समवाय-संबध असतो व शब्दावर असणाऱ्या ज्या शब्दत्व, कत्व, खत्व इत्यादि जाति, त्याचें श्रवणेंद्रियानें होणारें जें प्रत्यक्षज्ञान त्यास समवेतसमवाय हा हेतु आहे. अभावाचें प्रत्यक्ष व्हावयाचें असतां विशेषणविशेष्यभावनांवाचा विशेषणतासंबध कारण होत असतो. पांच प्रकारच्या संनिकर्षापुढें ' विशेषणता ' हा शब्द योजावा. तो असा द्रव्यावर असणाऱ्या अभावाचें प्रत्यक्ष व्हावयाचें असतां इंद्रियसंयुक्तविशेषणता कारण आहे. द्रव्यसमवेतावर असणाऱ्या अभावाच्या प्रत्यक्षामध्यें इंद्रियसंयुक्तसमवेतविशेषणताकारण आहे. द्रव्यसमवेताशीं समवेत असणाऱ्यावर अभावाचें प्रत्यक्ष व्हावयाचें असतां इंद्रियसंयुक्त-समवेत-समवेत विशेषणता कारण आहे. अभावाच्या प्रत्यक्षस्थानीं 'संयोग' अशा शब्दाकरितां 'संयुक्त' असें पद घालून व समवायाच्या ठिकाणीं 'समवेत' असें पद घालून निर्वाह करावा. जसें घट या द्रव्यावर समवायसंबंधानें राहणारें घटत्व, पृथ्वीत्व, व रूपादिक आहेत. त्यापैकीं नीलरूपावर राहणारा जो पीतत्वाचा अभाव किंवा घटत्वादि जातीवर पटत्वाचा अभाव तो संयुक्तसमवेतविशेषणता या संबंधानें समजतो. अशाच रीतीनें नीलत्वादि जातीवर सुद्धां पीतत्वाचा अभाव इंद्रियसंयुक्तसमवेतसमवेत विशेषणता संनिकर्षानें समजतो. कारण घटावर समवायसंबंधानें नीलरूप राहतें व त्यावर समवायसंबंधानें नीलत्व राहतें. व त्याचा विशेषणता पीतत्वाभावावर आहे. म्हणून वरील संबंधानें त्याचें ज्ञान होतें, असें संक्षेपतः जाणावें येथें प्रत्यक्षपरिच्छेद समाप्त झाला.

( प० ) प्रत्यक्षेति । तच्च प्रत्यक्षं षड्विधं घ्राणजरासनचाक्षुषत्वाचमानसभेदात् । ननु प्रत्यक्षकारणीभूतेन्द्रियनिष्ठप्रत्यक्षसामानाधिकरण्यघटकः संनिकर्षः क इत्यपेक्षायां तं विभज्य दर्शयति–प्रत्यक्षेति । लौकिकप्रत्यक्षेत्यर्थः ॥

( प० भा० )–तें प्रत्यक्ष घ्राणज, जिव्हेपासून होणारें, डोळ्यापासून होणारें, कर्णेंद्रियापासून होणारें, त्वगिंद्रियापासून होणारें, व मनापासून होणारें, अशा भेदानें सहा प्रकारचें आहे. बरें पण, प्रत्यक्षाला कारणीभूत होणारें जें इंद्रिय त्यावर असणारा, व प्रत्यक्षसामानाधिकरण्यामध्यें घटक झालेला संनिकर्ष कोणता ? असें समजण्याची इच्छा झाली असतां 'प्रत्यक्ष०' इत्यादि ग्रंथानें त्यांचा विभाग करून दाखवितात. येथें प्रत्यक्ष या शब्दानें लौकिक प्रत्यक्ष असा अर्थ घ्यावयाचा आहे.

चक्षुषा घटप्रत्यक्षजनने संयोगः संनिकर्षः ॥

( त० भा० )–चक्षुरिंद्रियानें जेव्हां आपल्याला घटाचें प्रत्यक्ष ज्ञान होतें तेव्हां तेथें संयोगनांवाचा संबंध असतो.

( प० ) संयोगमुदाहरति–चक्षुषेति। तथा च द्रव्यचाक्षुषत्वाचमानसेषु संयोग एव संनिकर्ष इति भावः ॥

( प० भा० )–' चक्षुषा ' या खंडानें संयोगसंनिकर्षाचें उदाहरण देतात. अर्थात् द्रव्याच्या त्वगिंद्रियजन्य, चक्षुरिंद्रियजन्य व मानस या प्रत्यक्षज्ञानांत संयोग हाच संबंध असतो, असा भाव.

घटरूपप्रत्यक्षजनने संयुक्तसमवायः संनिकर्षः । चक्षुःसंयुक्ते घटे रूपस्य समवायात् ॥

( त० भा० )–जेव्हां घटावरील रूपाचें प्रत्यक्षज्ञान होतें तेव्हां तेथें संयुक्तसमवाय हा संनिकर्ष असतो. कारण घट हा आपल्या चक्षूशी संयुक्त झालेला असतो व त्यावर रूप हें समवायसंबंधानें रहात असतें.

( प० ) घटरूपेति। चक्षुषा इत्यनुषज्यते। तथा च द्रव्यसमवेतचाक्षुषत्वाचमानसरासनघ्राणजेषु संयुक्तसमवाय एव संनिकर्ष इत्यर्थः ॥

( प० भा० )–' घटरूप० ' इत्यादि खंडाशीं मागील 'चक्षुषा' या पदाचा संबंध लागतो. अर्थात् द्रव्यावर समवायसंबंधानें राहणाऱ्या गुणांचीं चाक्षुष, त्वगिंद्रियजन्य, मानस, रासन व घ्राणज हीं

प्रत्यक्ष ज्ञान व्हावयाचें असता वर सांगितल्याप्रमाणें संयुक्तसमवाय हाच संबंध असतो. असा भावार्थ.

**रूपत्वसामान्यप्रत्यक्षे संयुक्तसमवेतसमवायः संनिकर्षः।**
**चक्षुःसंयुक्ते घटे रूपं समवेतं तत्र रूपत्वस्य समवायात्॥**

( त० भा० )–जेव्हां घटरूपावरील रूपत्व या जातीचें आपल्याला प्रत्यक्षज्ञान होतें, तेव्हां तेथें संयुक्तसमवेतसमवाय हा संबंध असतो. कारण आपल्या चक्षूशीं घट संयुक्त झालेला असतो. त्यावर रूप हें समवेत असतें व त्या रूपावर रूपत्व ही जाति समवाय संबंधानें राहते.

(प०) रूप वेति। रूपत्वात्मक यत्साम न्यं तत्प्रत्यक्ष इत्यर्थ । अत्रापि चक्षुषा इत्यनुषज्यते । तथा च द्रव्यसमवेतसमवेतचाक्षुषरासनघ्राणजस्पार्शनमानसेषु संयुक्तसमवेतसमवाय एव संनिकर्ष इति भावः। अथ द्रव्यतत्समवेतप्रत्यक्षेऽपि संयुक्तसमवेतसमवाय एव संनिकर्षोऽस्त्विति चेन्नैतत् । ईश्वरात्मादे ( आत्मसुखादे )–रप्रत्यक्षत्वप्रसङ्गात् ॥

( प० भा० )–रूपत्व या स्वरूपाचें जें सामान्य–जाति त्याच्या प्रत्यक्ष ज्ञानांत, असा ' रूपत्वसामान्यप्रत्यक्षे ' याचा इत्यर्थ आहे येथें, ही ' चक्षुषा ' या पदाचा अनुषंग करावा. अर्थात् द्रव्याशीं समवेत असलेल्या गुणादिकाशीं समवेत असलेल्या जात्यादिकाचें जें चाक्षुष, रासन, घ्राणज, स्पर्शन व मानस प्रत्यक्षज्ञान त्याचे ठिकाणीं ' संयुक्तसमवेतसमवाय ' हाच संनिकर्ष असतो, असा भावार्थ. बरें पण, द्रव्य व त्याच्याशीं समवेत असलेले गुणादिक यांच्या प्रत्यक्षज्ञानातही ' संयुक्तसमवेतसमवाय ' हाच संनिकर्ष असूं दे, असें जर म्हणाल, तर असें म्हणतां येणार नाहीं. कारण, मग ईश्वर, आत्मा व आत्मसुख यांचें प्रत्यक्षज्ञान होणार नाहीं. कारण, तेथें ' संयुक्तसमवेतसमवाय ' हा संबंध संभवत नाहीं. कारण, ईश्वर किंवा आत्मा जरी संयुक्त झाला तरी त्याच्यावर समवेत कोण ? व त्याचा समवाय कोठें ? फार झालें तर आत्मसुखाचें प्रत्यक्ष होण्यास 'संयुक्तसमवाय ' हा संनिकर्ष होईल. कारण, संयुक्त आत्मा व त्याचा समवाय सुखावर, या रीतीनें जेथें प्रत्यक्ष तेथें हा संबंध संभवतो. परंतु ' संयुक्तसमवेतसमवाय ' हा संबंध जुळत नसल्यामुळें तो मानितां येत नाहीं.

आहे. प्रत्यक्ष प्रमाणाचा ' तस्मात् ' यानें उपसंहार केला आहे. ' तस्मात् ' म्हणजे प्रत्यक्ष प्रमेचें करण असल्यामुळें, असा भावार्थ सिद्ध म्हणजे न्यायशास्त्राच्या सिद्धान्तामध्यें सिद्ध झालें, असा इत्यर्थ. असा पदकृत्यकांतील प्रत्यक्ष परिच्छेद संपला.

अनुमितिकरणमनुमानम् ॥

( त० भा० )—अनुमितीचें जें करण तें अनुमान होय.

( न्या० ) अनुमानं लक्षयति–अनुमितीति । अनुमितौ व्याप्तिज्ञानं करणं, परामर्शो व्यापारः, अनुमितिः फलं, कार्यमित्यर्थः । परामर्शस्य व्याप्तिज्ञानजन्यत्वाद्व्याप्तिज्ञानजन्यानुमितिजनकत्वात्तज्जन्यत्वे सति तज्जन्यजनकत्वरूपव्यापारत्वमुपपन्नम् । अनुमितिकरणत्वमनुमानस्य लक्षणम् । अनुमानं व्याप्तिज्ञानम् । एतस्य परामर्शरूपव्यापारद्वारा अनुमितिं प्रत्यसाधारणकारणतयानुमितिकरणत्वमुपपन्नम् ॥

( न्या० भा० )–' अनुमिति० ' यानें अनुमानाचें लक्षण करितात. अनुमितीमध्यें व्याप्तिज्ञान हें करण असतें. परामर्श हा व्यापार

---

१. अनुमान हें अनुमितीचें साधन आहे. अनुमान म्हणजे प्रत्यक्ष वस्तूवरून अप्रत्यक्ष वस्तूची कल्पना होय. तेव्हां अनुमानाला प्रत्यक्ष कारण असल्यानें कारणस्वरूपी प्रत्यक्षाचें निरूपण येथपर्यंत केलें. आतां कार्यस्वरूपी अनुमानाचें निरूपण करणें आवश्यक असल्यामुळें तें येथून करितात. अनुमान हें सदनुमान व असदनुमान असें दोन प्रकारचें आहे. जेथें हेतु व साध्य इत्यादिक योग्य असतील तें सदनुमान होय व जेथें हेतु वगैरे योग्य नसतील तें असदनुमान होय.

२. कोणी एका पुरुषानें महानस–स्वयंपाकगृह इत्यादि पुष्कळ ठिकाणीं धूम व अग्नि पाहिले होते. तेव्हां तेथें त्या पुरुषास ' धूम हा अग्नीशीं व्याप्त आहे ' अशा प्रकारचें व्याप्तीचें ज्ञान ( जेथें जेथें धूम असतो तेथें तेथें अग्नि असतोच. अशा प्रकारचें धूमांतील अग्नीच्या व्याप्तीचें ज्ञान ) झालें होतें. नंतर त्याच पुरुषानें एकेवेळीं पर्वत इत्यादि उंच ठिकाणावर जमिनीपासून मेघमंडलापर्यंत पोंचणारा अखंड असा धुराचा लोट पाहिला व त्यानंतर पूर्वी झालेल्या व्याप्तिज्ञानाच्यायोगानें त्या पुरुषाला व्याप्तीचें स्मरण झालें. नंतर अग्नीचा व्याप्य धूम या पर्वतावर आहे असें परामर्शनांवाचें विशिष्टज्ञान झालें व हें झाल्यावर ' या पर्वतावर अग्नि आहे ' असें अनुमितिसंज्ञक ज्ञान त्याच पुरुषास होतें. एकंदरीत व्याप्तिज्ञानानें परामर्श होतो व परामर्शापासून अनुमिति होते अशारीतीनें परामर्श व्यापार असून व्याप्तीचें ज्ञान हें अनुमितीचें करण आहे व अनुमिति हें फल आहे.

असतो व अनुमिति हें फल म्हणजे कार्य असतें. परामर्श हा व्याप्तिज्ञानापासून उत्पन्न होऊन व्याप्तिज्ञानापासून उत्पन्न होणाऱ्या अनुमितीला उत्पन्न करणारा असल्यामुळें 'त्यापासून उत्पन्न होऊन त्यापासून उत्पन्न होणाऱ्याला उत्पन्न करणें' हें व्यापाराचें लक्षण त्यांत आहे. 'अनुमितीचें करणत्व' हें अनुमानाचें लक्षण आहे. म्हणजे हें करणत्व ज्या ठिकाणीं येईल त्याला 'अनुमान' असें म्हणावयाचें. अनुमान म्हणजे व्याप्तिज्ञान होय. हें व्याप्तिज्ञान परामर्शरूपी व्यापाराच्या द्वारा अनुमितीचें असाधारण कारण होत असल्यामुळें त्याला अनुमितीचें करणत्व संभवतें.

(प०) प्रत्यक्षानुमानयोः कार्यकारणभावसंगतिमभिप्रेत्य प्रत्यक्षानन्तरमनुमानं निरूपयति अनुमितीति। अनुमितेः करणमनुमानमित्यर्थः। तच्च लिङ्गपरामर्श एवेति निवेदयिष्यते। कुठारादावतिव्याप्तिवारणाय अनुमितीति। प्रत्यक्षादावतिव्याप्तिवारणाय अन्विति॥

(प० भा०)—प्रत्यक्ष व अनुमान याच्यामध्यें कार्यकारणभावनांवाची संगति आहे. अशा अभिप्रायानें प्रत्यक्षानंतर 'अनुमिति०' या वाक्यानें प्रत्यक्षकारणाचें कार्य जें अनुमान तें सांगतात. अनुमितीचें जें करण तें अनुमान होय. तें अनुमान म्हणजे लिंगपरामर्शच होय, असें पुढें सांगितलें जाणार आहे. कुऱ्हाडीवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'अनुमितीचें करण' असें ह्मटलें आहे. त्यामुळें कुऱ्हाड नुसत्या छेदनक्रियेचें करण होत असल्यानें व अनुमितीचें करण होत नसल्यामुळें तिच्यावर अतिव्याप्ति नाहीं. आतां 'मितीचें जें करण तें अनुमान' असें म्हटल्यास प्रत्यक्षरूपी जी मिति म्हणजे ज्ञान तिचें करण प्रत्यक्षप्रमाण असल्यामुळें त्यावर अनुमानाचें लक्षण जातें तें न जावें यासाठीं 'अनु' असें ह्मटलें

---

१. सदनुमान करितांना व्याप्यावरून व्यापक साधावें असा नियम आहे. 'पर्वतो वन्हिमान् धूमात् महानसवत्, अशा अनुमानांत (पर्वतपक्षावर धूम या हेतूनें अग्नि हें साध्य सिद्ध करितांना) 'अग्निव्याप्यधूमवान् पर्वतः' असा प्रमात्मक परामर्श होतो, व यापासून 'पर्वतो अग्निमान्' अशी प्रमात्मक अनुमिति होते. दुष्ट अनुमानामध्यें हा नियम नाहीं. प्रत्येक सदनुमानांत 'पक्ष, साध्य, हेतु व दृष्टान्त' हे चार बहुतेक असतात. उदाहरण—'पर्वतो वन्हिमान् धूमात् महानसवत्' येथें पर्वत हा पक्ष, वह्निसाध्य, धुम हेतु, व महानस दृष्टान्त आहे.

परामर्शाचें लक्षण 'व्याप्तिविशिष्ट०', इत्यादि वाक्यानें सांगतात. व्याप्तिविशिष्ट असें पक्षधर्मताज्ञान, अशा कर्मधारय समासामध्यें विशिष्ट हें पद प्रकारतेचें निरूपण करीत असल्यामुळें, व 'पक्षधर्मतेचें ज्ञान' ह्यांतील 'पक्षधर्मतेचें' या षष्ठीनें विषयत्वाचा बोध केल्यामुळें, व धर्मता हें पद संबंधार्थक असल्यामुळें कर्मधारयसमासामध्यें ज्यांचा समास होतो त्या पदार्थांच्या अभेद संसर्गाचा लाभ होत असल्यामुळें 'व्याप्तिप्रकारकांहून अभिन्न असें जें पक्षसंबंधविषयक ज्ञान तो परामर्श' असें परामर्शाचें लक्षण सिद्ध होतें. पण, असें म्हटलें असतां 'धूम हा वन्हिव्याप्य आहे व पर्वत हा आलोकवान् आहे.' अशा रीतीच्या समूहालंबनज्ञानावर परामर्शलक्षणाची अतिव्याप्ति जाते. कारण, हें समूहालंबनज्ञान सुद्धां व्याप्तिविशिष्ट पक्षधर्मताज्ञान आहे. (कारण वन्हिव्याप्य म्हटल्यानें व्याप्तिही येथें आहेच व आलोकवान् पर्वत म्हटल्यानें आलोक हा पक्षधर्मही आहेच. म्हणून हें व्याप्तिविशिष्ट पक्षधर्मताज्ञान होय.) तेव्हां ही अतिव्याप्ति न जावी यासाठीं 'पक्षावर असणाऱ्या विशेष्यतेनें दाखविलेली जी हेतुवर असणारी प्रकारता, त्या प्रकारतेनें दाखविलेली जी व्याप्तीवर असणारी प्रकारता तिनें शोभणारें ज्ञान परामर्श' असा याचा निष्कर्ष आहे. ह्यामुळें हें लक्षण वरील समूहालंबनज्ञानावर जात नाहीं. कारण पक्षावर असणाऱ्या विशेष्यतेनें हेतुवरील प्रकारता तेथें दाखविलेली नाहीं. तर आलोकावरील दाखविलेली आहे. आलोक हेतु नव्हे व हेतूवरील प्रकारतेनें व्याप्तीवरील प्रकारताही दाखविलेली नाहीं. म्हणून अतिव्याप्ति नाहीं. 'अशा परामर्शापासून उत्पन्न होणारें असून ज्ञानत्व' हें अनुमितीचें लक्षण आहे आणि अनुमिति वपरामर्श याचा विशेषप्रकारानें कार्यकारणभाव असा आहे- पर्वतत्वानें अवच्छिन्न अशी

१ व्याप्तीवर ज्ञानाची विषयता आहे व त्या विषयतेनें दाखविलेली जी विषयिता ती ज्ञानावर आहे- तेव्हां या विषयितासंबंधानें व्याप्तिविशिष्ट असें जें पक्षधर्मताज्ञान तो परामर्श होय. (ज्ञान हें नेहमीं विषयी असतें. म्हणजे त्यांत कोणता तरी विषय असतो. न्यायबोधिनींत म्हटल्याप्रमाणें व्याप्तीवर असणाऱ्या प्रकारतेनें दाखविलेली जी प्रकारिता तीही ज्ञानावर आहेच. म्हणूनच 'व्याप्तिप्रकारकाभिन्न' असें ज्ञानास म्हटलें आहे.

२ व्याप्ति ज्यांत विशेषण आहे अशा ज्ञानाहून अभिन्न

जी पर्वतावर असणारी उद्देश्यता तिनें दाखविलेली जी संयोगसंबंधानें अवच्छिन्न व वन्हित्वानें अवच्छिन्न अशी विधेयता ( पर्वतावर वन्हि आहे, असें विधान करावयाचें असल्यामुळें वन्हीवर विधेयता आहे) ती जिच्यामध्यें आहे, अशा अनुमितित्वावच्छिन्न सर्व अनुमितींना वन्हीच्या व्याप्तीवर असणाऱ्या प्रकारतेनें दाखविलेली जी धूमत्वानें अवच्छिन्न अशा धूमावर असणारी प्रकारता, त्या प्रकारतेनें दाखविलेली जी पर्वतत्वानें अवच्छिन्न अशा पर्वतावर असणारी विशेष्यता, तिनें शोभणारा निर्णय वरील अनुमितीला कारण आहे. तो निर्णय म्हणजे ' वन्हीचा व्याप्य जो धूम तद्वान् पर्वत आहे ' अशा प्रकारचा समजावा.

( प० ) व्याप्तिविशिष्टेति । विषयितासंबन्धेन व्याप्तिविशिष्टपक्षधर्मताज्ञान परामर्श इत्यर्थः । घटादिज्ञानवारणाय पक्षधर्मतेति । धूमवान्पर्वत इत्यादिज्ञानवारणाय व्याप्तिविशिष्टेति । तदिति । परामर्शजन्यमित्यर्थ ॥

( प० भा० )–विषयितासंबंधानें व्याप्तिविशिष्ट अशा पक्षधर्मता ज्ञानाला परामर्श असें म्हणतात. नुसत्या ' ज्ञानास ' 'परामर्श' असें म्हटल्यास या लक्षणाची अतिव्याप्ति घटादिकांच्या ज्ञानावरही जाऊं लागेल. यासाठीं ' पक्षधर्मताज्ञानाला ' ' परामर्श ' असें म्हटलें आहे. घटादिज्ञान हें पक्षधर्मताज्ञान नसल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. आतां ' पक्षधर्मता ज्ञानासपरामर्श ' असें म्हटल्यास ' धूमवान् पर्वत ' इत्यादि ज्ञान सुद्धां पक्षधर्मतेचें ज्ञान असल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं ' व्याप्तिविशिष्ट ' असें म्हटलें आहे. ' धूमवान् पर्वत ' हें ज्ञान व्याप्तिविशिष्ट नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति नाहीं. त्यापासून जन्य म्हणजे परामर्शापासून उत्पन्न होणारें; असा अर्थ समजावा.

यत्र यत्र धूमस्तत्राग्निरिति साहचर्यनियमो व्याप्ति ॥

( त० भा० )–ज्या ज्या ठिकाणीं धूम असतो. त्या त्या ठिकाणीं अग्नि असतो. अशा साहचर्याच्या नियमाला व्याप्ति असें म्हणतात.

---

१ 'संयोगेन वन्हिमान् पर्वतः' अशा अनुमितींत.

२ व्याप्ति म्हणजे साध्याचा हेतूशीं एकप्रकारच्या संबध होय, जें सिद्ध करावयाचें तें साध्य होय व हेतु द्द्द. सद्धेतु आणि असद्धेतु अशा दोन प्रकारचा असतो व्याप्ति व पक्षधर्मता ज्या हेतूवर असतात, तो सद्धेतु व त्या ज्यावर नाहींत तो असद्धेतु होय–हेत्वाभास होय

( न्या० ) यत्र यत्रेति । यत्रपदवीप्सावशाद्धूमाधिकरणे यावति वन्हिमत्त्वलाभाद्यावत्पदमहिम्ना वन्हेर्धूमव्यापकत्वं लब्धम् ॥ तदेव स्पष्टयति–साहचर्यनियम इति । एतदर्थस्तु नियतसाहचर्यं व्याप्तिरिति । नियतत्वं व्यापकत्वम् ॥ साहचर्यं नाम सामानाधिकरण्यम् । तथाच धूमनियतवन्हिसामानाधिकरण्यं व्याप्तिरित्यर्थः । अत्र वन्हेर्धूमव्यापकत्वं नाम धूमसमानाधिकरणात्यन्ताभावप्रतियोगितानवच्छेदकधर्मवत्त्वम् । तथाहि–धूमाधिकरणे पर्वतचत्वरमहानसादौ वर्तमानो योऽभावः घटत्वाद्यवच्छिन्नप्रतियोगिताकाभावः न तु वन्हित्वावच्छिन्नप्रतियोगिताकाभावः कुतः । पर्वतादौ वन्हेः सत्त्वात् । एवं सति धूमाधिकरणे पर्वतचत्वरादौ वर्तमानस्य घटाद्यभावस्य प्रतियोगितावच्छेदकं घटत्वादिकमनवच्छेदक वन्हित्वं वन्हौ वर्ततेऽतो धूमव्यापकत्वं वन्हौ वर्तते । इयमन्वयव्याप्तिः सिद्धान्तानुसारेण । पूर्वपक्षव्याप्तिस्तु–साध्याभाववदवृत्तित्वम् । साध्यतावच्छेदकसंबन्धावच्छिन्नसाध्यतावच्छेदकावच्छिन्नप्रतियोगिताक–प्रतियोगितावच्छेदकसंबन्धावच्छिन्नप्रतियोगितावच्छेदकावच्छिन्नवैयधिकरण्यावच्छिन्नाभाववन्निरूपितहेतुतावच्छेदकसंबन्धावच्छिन्नवृत्तित्वत्वावच्छिन्नप्रतियोगिताकाभाव इति निष्कर्षः । तच्च केवलान्वयिन्यव्याप्तमिति सिद्धान्तानुसरणम् ॥

( न्या० भा० )–' ज्या ज्या ठिकाणीं ' या अर्थी ' यत्र ' पद दोनदा उच्चारल्यानें जेवढ्या ठिकाणीं धूम आहे तेवढ्या सर्व ठिकाणीं अग्नि आहे, असें कळत असल्यामुळें ' यावत् ' पदाच्या प्रभावानें वन्हि हा धूमाचा व्यापक आहे असें प्राप्त झालें. तेंच ' साहचर्यनियम ' या शब्दानें स्पष्ट करून दाखवितात. याचा अर्थ असा–नियमानें जें साहचर्य तीच व्याप्ति होय. नियत म्हणजे व्यापक व साहचर्य म्हणजे एका अधिकरणावर राहणें. अर्थात् धूमाला नियत म्हणजे व्यापक जो वन्हि त्यासह धूमानें एका अधिकरणावर राहणेंही

---

१ वन्हिमान्धूमादित्यादौ समवायेन वन्ह्यभावमादायाव्याप्तिवारणार्थं प्रतियोगितायां प्रथममवच्छिन्नान्तं विशेषणम् । २ तत्रैव महानसीयवन्ह्याद्यभावमादायाव्याप्तिवारणाय द्वितीयमवच्छिन्नान्तम् । ३ कपिसंयोगी एतद्वृक्षत्वादित्यादावव्याप्तिवारणायाभावे वैयधिकरण्यावच्छिन्नान्तं विशेषणम्, प्रतियोगितावच्छेदकसंबन्धेन प्रतियोगिनो यदनधिकरणं तद्वृत्तिरिति तस्यार्थः । ४ वन्हिमान्धूमादित्यादौ तादृशसाध्याभावाधिकरणे स्वावयवे धूमस्य समवायेन वृत्तित्वादव्याप्तिरतस्तद्वारणाय वृत्तित्वे हेतुतावच्छेदकसंबन्धावच्छिन्नत्वविशेषणम् । ५ धूमवान्वन्हेरित्यादौ न्हदादिरूपयत्किंचित्साध्याभावाधिकरणवृत्तित्वाभावस्य वन्हौ सत्त्वादतिव्याप्तिरतस्तद्वारणाय वृत्तित्वसामान्याभावो विवक्षित इति बोध्यम् ॥ ६ इदं वाच्यं, ईश्वरत्वादित्यादौ ॥

व्याप्ति होय. येथें वन्हीला धूमाचें व्यापकत्व म्हणजे आहे धूम ज्या अधिकरणावर राहतो, त्या अधिकरणावर राहणारा जो अत्यन्ताभाव त्या अत्यंताभावाच्या प्रतियोगितेचा अवच्छेदक न होणारा असा जो धर्म ( वन्हित्व ) त्यात असणें यास व्यापकत्व म्हणावें. आतां हेंच स्पष्ट करून दाखवितात. धूमाच्या अधिकरणावर म्हणजे पर्वत, चव्हाटा व स्वयंपाकघर इत्यादि ठिकाणीं असणारा जो अभाव, म्हणजे ज्याची प्रतियोगिता घटत्वादिकानें अवच्छिन्न आहे असा घटादिकाचा अभावच घेतला पाहिजे. ज्या अभावाची प्रतियोगिता वन्हित्वानें अवच्छिन्न आहे, असा वन्हीचा अभाव घेता येत नाहीं. ( ज्याचा अभाव तो त्याचा प्रतियोगी असतो, व त्यावर प्रतियोगिता म्हणून एक धर्म राहत असतो. तो धर्म ज्या ठिकाणीं असतो. त्या ठिकाणीं वन्हित्व हाही धर्म प्रकृतस्थळीं आहे. म्हणून प्रतियोगिता ही वन्हित्वानें अवच्छिन्न म्हणता येते. ) कोणत्या कारणास्तव ? तर पर्वतादिकांवर वन्हि असतो, म्हणून त्याचा अभाव घेतां येत नाहीं. असें ठरलें असतां धूमाची अधिकरणें जीं पर्वत चत्वर इत्यादि आहेत, त्यांवर घटादिकांचा अभाव असतो, व त्याचें प्रतियोगितावच्छेदक घटत्वादिक आहे. त्या प्रतियोगितेचा अनवच्छेदक वन्हित्व हा धर्म आहे. हा वन्हित्व धर्म वन्हीवर असतो, म्हणून धूमाचें व्यापकत्व वन्हिवर आहे. ही सिद्धान्ताला धरून अन्वय व्याप्ति सांगितली. पण पूर्वपक्ष व्याप्ति अशी आहे.—साध्याचा अभाव ज्यावर राहतो, त्यावर हेतूनें न राहणें, यासच पूर्वपक्षव्याप्ति म्हणतात. पण नुस्तें इतकेंच म्हटल्यास समवायसंबंधानें वन्हि पर्वतावर नसल्यानें वन्हीच्या अभावाचें अधिकरण पर्वतही होतो. वस्तुतः त्यावर धूमाचें अवृत्तित्व ( नसणें ) असावयास पाहिजे. पण, त्याच्या उलट, वृत्तित्वच ( असणें ) असतें. म्हणून या सद्धेतुरूपा स्थळीं वरील व्याप्तिलक्षणाची अव्याप्ति येते. ती न यावी या साठीं ' साध्यतावच्छेदक संबंधानें साध्यावर ज्याची प्रतियोगिता येईल ' असा साध्याभाव घ्यावा. म्हणजे अव्याप्ति येत नाहीं. कशी ती पहा—साध्य पक्षावर ज्या संबंधानें राहतें, तो साध्यतावच्छेदक संबंध होय. येथें तो संबंध म्हणजे संयोग आहे. कारण अग्नि हा द्रव्य असल्यानें पर्वत

या द्रव्याशीं त्याचा संयोगसंबंधच असणार हें उघड आहे. (द्रव्याचा द्रव्याशीं संयोग संबंधच होतो. समवाय होत नाहीं.) म्हणून संयोगसंबंधानें वन्हीचा अभाव घेतां येत नाहीं. कारण वन्हि पर्वतावर संयोगसंबंधानें राहतो. म्हणून वन्हीच्या अभावाची वन्हीवर असणारी जी प्रतियोगिता ती साध्यतावच्छेदकसंबंधानें अवच्छिन्न होत नाहीं. यास्तव अशा वन्ह्यभावाचें अधिकरण न्हद होईल व त्यावर धूमही नसल्यानें लक्षण सुसंगत होतें. परंतु आतां 'साध्यतावच्छेदक संबंधानें साध्याचा अभाव' घ्यावा असें जरी म्हटलें, तरी संयोगसंबंधानें महानसीय वन्हि पर्वतावर नसल्यानें, पर्वत साध्याभावयुक्त होतो व त्यावर धूमाला अवृत्तित्व न येतां, वृत्तित्वच येतं. म्हणून पुन्हां अव्याप्ति येतें. ती न यावी या साठीं ज्याची प्रतियोगिता साध्यतावच्छेदकानें अवच्छिन्न आहे, असा साध्याचा अभाव घ्यावा म्हणजे अव्याप्ति नाहीं. कारण, येथें साध्यतावच्छेदक वन्हित्व आहे. तेव्हां त्यानें अवच्छिन्न सर्व वन्हि होणार. पण, सर्व वन्हींचा अभाव पर्वतावर नाहीं. कारण, पर्वतीय वन्हि पर्वतावर आहेच. तेव्हां सर्व वन्हिवर ज्याची प्रतियोगिता आहे, असा साध्याचा अभाव पर्वतावर नसल्यानें व साध्याभाववान् जो न्हदादि तेथें धूमरूपी हेतु नसल्यानें लक्षणसमन्वय होतो. आतां 'प्रतियोगितावच्छेदक संबंधानें अवच्छिन्न व प्रतियोगितावच्छेदकानें अवच्छिन्न असा जो प्रतियोगी त्याच्या अनधिकरणावर राहणारा जो अभाव ( साध्याभाव ) यानें युक्त असें अधिकरण' असें म्हटलें पाहिजे. असें न म्हटल्यास 'कपिसंयोगी एतद्वृक्षत्वात्' येथें अव्याप्ति

१ अवच्छेद्यअवच्छेदकभाव हा एकाच ठिकाणी राहणाऱ्या दोन धर्मांमध्यें असतो असा नियम आहे. या नियमावरून प्रतियोगितेचा अवच्छेदक असा साध्यावरील असाधारण धर्म होतो. उदाहरण– 'पर्वतो वन्हिमान् धूमात्' या ठिकाणी वन्हि साध्य असून वन्हित्व हें साध्यतावच्छेदक आहे. तेव्हां वन्हीचा अभाव घेतल्यास त्याचा प्रतियोगी वन्हि आहे. त्यावर प्रतियोगिता हा एक धर्म राहतो. म्हणून ही प्रतियोगिता वन्हित्वानें अवच्छिन्न होते. तसेंच केव्हां केव्हां वन्हि साध्य असतां वन्हित्व हें त्या साध्यतेचे अवच्छेदक होतें व साध्यता ही वन्हित्वाची अवच्छेद्य होते. म्हणूनच ती वन्हित्वरूपी साध्यतावच्छेदकानें अवच्छिन्न होऊं शकते.

येते. ती अशी की—येथें संयोग साध्य असल्यानें साध्यतावच्छेदकसंबंध म्हणजे समवाय होय. कारण गुण व गुणी यांचा समवाय असतो व साध्यतावच्छेदक संयोगत्व होय. तेव्हां समवायसंबंधानें अवच्छिन्न व संयोगत्वानें अवच्छिन्न जो संयोग त्यावर ज्याची प्रतियोगिता आहे असा अभाव—वृक्षाच्या मुळावर असणारा जो संयोगाभाव, तद्वान् वृक्ष आहे व त्यावर एतद्वृक्षत्व हा हेतु आहे. तो वृक्षावर अवृत्ति नाहीं तर वृक्षवृत्तिच आहे. म्हणून अव्याप्ति होते. तिचें निवारण करण्यासाठीं 'वैयधिकरण्यानें अवच्छिन्न' असा अभाव घ्यावा. म्हणजे संयोगाभाव हा वैयधिकरण्यानें अवच्छिन्न नसल्यानें (कारण तो अव्याप्यवृत्ति आहे.) या वृक्षावरचा संयोगाभाव घेतां येत नाहीं तर दुसऱ्या वृक्षावरचा संयोगाभाव हा वैयधिकरण्यानें अवच्छिन्न (तेथें संयोगरूपी साध्य नाहीं म्हणून) होतो व तद्वान् असा त्या वृक्षावर एतद्वृक्षत्वरूपी हेतूचें अवृत्तित्व असल्यानें अव्याप्ति नाहीं. तसेंच 'ज्याची प्रतियोगिता प्रतियोगितावच्छेदकसंबंधानें अवच्छिन्न आहे' असा अभाव घेतला पाहिजे. नाहीं तर 'कपिसंयोगी एतद्वृक्षत्वात्' येथें अव्याप्ति येते. ती अशी की—साध्यतावच्छेदक संबंधानें म्हणजे समवायसंबंधानें अवच्छिन्न व साध्यतावच्छेदक म्हणजे संयोग व यानें अवच्छिन्न जो संयोग त्यावर ज्याची प्रतियोगिता आहे असा अभाव म्हणजे संयोगाभाव हा त्या वृक्षावर राहतोच आहे. म्हणजे तो वैयधिकरण्यानें अवच्छिन्न आहेच व तोच संयोगाभाव या वृक्षावर स्वरूपसंबंधानें आहे.[१] म्हणून एतद्वृक्षत्वरूपी हेतूचें साध्याभाववान् वृक्षावर अवृत्तित्व न येतां वृत्तित्वच येतें म्हणून अव्याप्ति येते. ती न यावी यासाठीं, 'ज्याची प्रतियोगिता प्रतियोगितावच्छेदकसंबंधानें अवच्छिन्न आहे, असा अभाव' म्हटल्यानें आतां संयोगाभाव घेतां येत नाहीं कारण संयोगरूपी प्रतियोगी हा प्रतियोगितावच्छेदक संबंधानें म्हणजे समवायसंबंधानें राहतोच आहे. तेव्हां पूर्वी स्वरूपसंबंधानें त्या वृक्षावरचा अभाव या वृक्षावर घेतां येत होता. परंतु आतां प्रतियोगितावच्छेदक समवाय

१. 'अयं वृक्षः कपिसंयोगी न मूले' अशा प्रतीती वरून कपिसंयोग व त्याचा अभाव हे दोन्ही एके ठिकाणीं (झाड वगैरे वर) राहतात.

संबंधानें प्रतियोगीच येथें असल्यानें तो अभाव घेतां येत नाहीं. म्हणून वृक्ष अशा अभावानें युक्त होत नाहीं. त्यामुळें हेतुला जरी वृत्तित्व असलें तरी त्या वृक्षावर लक्षणाची अव्याप्ति नाहीं, आतां साध्यतावच्छेदक संबंधानें अवच्छिन्न व साध्यतावच्छेदकानें अवच्छिन्न ज्याची प्रतियोगिता आहे असा व प्रतियोगितावच्छेदक (समवाय) संबंधानें अवच्छिन्न ज्याची प्रतियोगिता आहे असा व वैयधिकरण्यानें अवच्छिन्न असा अभाव घटला तरी त्या वृक्षावर असणारा संयोग या वृक्षावर नसल्यानें यावर त्याचा अभाव आहे व अभाववान् अशा एतद्वृक्षावर एतद्वृक्षत्वहेतूचें अवृत्तित्व नाहीं, तर वृत्तित्वच आहे म्हणून अव्याप्तिदोष येतो. वरील सर्व विशेषणें अभावाला अशी लागतात की—समवायसंबंधानें अवच्छिन्न व संयोगत्वानें अवच्छिन्न अशा संयोगावर ज्याची प्रतियोगिता आहे असा संयोगाभाव व प्रतियोगितावच्छेदक अशा समवायसंबंधानें ( कारण त्या वृक्षावरील संयोग हा समवायसंबंधानें राहतो. ) अवच्छिन्न ज्याची प्रतियोगिता आहे, असा आणि वैयधिकरण्यानें युक्त ( त्या वृक्षावरील संयोगाशीं या वृक्षावरील असणाऱ्या संयोगाभावाचें वैयधिकरण्य आहेच. कारणे तो संयोग येथें नसल्यानें येथें त्या संयोगाचा अभाव आहे, म्हणून वैयधिकरण्य ) आहे अशा अभावाचें एतद्वृक्ष अधिकरण होत असून एतद्वृक्षत्व येथें आहेच. तेव्हां या हेतूचें अवृत्तित्व नाहीं. म्हणुन अव्याप्तिही न यावी यासाठीं ज्याची प्रतियोगिता प्रतियोगितावच्छेदकानें अवच्छिन्न आहे असा अभाव घ्यावा म्हणजे अव्याप्ति येत नाहीं. कारण, मग प्रतियोगितावच्छेदक म्हणजे संयोगत्व होय. तेव्हां संयोगत्वानें अवच्छिन्न जेवढे म्हणून संयोग आहेत, त्या सर्वांवर ज्याची प्रतियोगिता आहे असा संयोगाभाव येथें घेतां येत नाहीं. कारण, या वृक्षावर संयोग आहे. तेव्हां अशा संयोगाभावाचें अधिकरण दुसरा वृक्ष होईल व तेथें एतद्वृक्षाचें अवृत्तित्व आहेच म्हणून लक्षणाची अव्याप्ति नाहीं. आतां 'अशा अभावयुक्तावर हेतूचें अवृत्तित्व ( नसणें )' असें म्हटल्यास अव्याप्ति येते. ती अशी कीं 'वन्हिमान् धूमात्' या ठिकाणीं अभावा वरील विशेषणांनीं युक्त असा वन्हीचा अभाव धूमाच्या अवयवावर राहतो. तेथें धूमाला वृत्तित्व

आहे. अवृत्तित्व नाहीं; त्यामुळें अव्याप्ति येते. ती न यावी यासाठीं ' ज्याची प्रतियोगिता हेतुतावच्छेदकसंबंधानें अवच्छिन्न आहे असा हेतूचा अभाव ' घ्यावा. म्हणजे अव्याप्ति येत नाहीं. कारण, येथें हेतुतावच्छेदक संबंध म्हणजे संयोगसंबंध आहे. कारण, पक्षावर हेतु संयोगसंबंधानें राहतो. तेव्हां या संबंधानें धूमाचें आपल्या ' अवयव-[1]रूपी साध्याभावाधिकरणावर ' अवृत्तित्वच आहे. समवायानें वृत्तित्व असलें तरी संयोगसंबंधानें अवृत्तित्व आहे. त्यामुळें अव्याप्ति येत नाहीं, व लक्षण जुळतें. आतां ' हेतुतावच्छेदकसंबंधानें हेतूचें अवृत्तित्व ' असें जरी म्हटलें तरी अतिव्याप्ति येते. ती अशी कीं ' धूमवान् वन्हेः ' अशा असद्धेतुस्थलीं वरील विशेषणानीं युक्त असा धूमरूपी साध्याचा अभाव न्हदावर आहे व तेथें वन्हिरूपी हेतूचें हेतुतावच्छेदक संयोगसंबंधानें अवृत्तित्वच आहे. म्हणून अतिव्याप्ति येते. तिचें निवारण करण्यासाठीं ' सर्ववृत्तियावर ज्याची प्रतियोगिता आहे असा हेतूचा अभाव ' घ्यावा, म्हणजे अतिव्याप्ति होणार नाहीं. कारण साध्याभाववान् जसा न्हद आहे तसा अयोगोलक-( तापलेला लोखंडाचा गोळा— ) ही आहे. त्यामुळें तेथें वन्हिरूपी हेतूचें वृत्तित्वच असतें, अवृत्तित्व नसतें, म्हणून अतिव्याप्ति नाहीं. असा एकंदरींत साध्याभाववानावर हेतूनें न राहणें या पूर्वपक्षव्याप्तीचा निष्कर्ष आहे. पण, इतकें करूनही ' इदं वाच्यं ज्ञेयत्वात् ' या केवलान्वयी हेतूमध्यें हें व्याप्तीचें लक्षण नसतें म्हणून त्याची अव्याप्ति होते. म्हणूनच पुढें सिद्धान्तव्याप्ति सांगितली आहे. अव्याप्ति येण्याचें कारण वाच्यरूपीसाध्याचा सर्वत्र अभावच नसल्यानें पक्षाचें साध्याभाववान् होणें वगैरे सर्व दूरच राहिलें म्हणून अव्याप्ति होते.

( ५० ) यत्र यत्रेति । यत्र यत्र धूमस्तत्र तत्राग्निरिति व्याप्तेरभिनयः । तत्र साहचर्यनियम इति लक्षणम् । सह चरतीति सहचारस्तस्य भावः साहचर्यं सामानाधिकरण्यमिति यावत् । तस्य नियमो व्याप्तिरित्यर्थः । स चाव्यभिचरितत्वम् । तच्च व्यभिचाराभावः । व्यभिचारश्च साध्याभाववद्वृत्तित्वम् । तथा च साध्याभाववदवृत्तित्वं व्याप्तिरिति पर्यवसन्नम् । महानसे वह्निमत्, धूमादित्यादौ

---

१ धूम व धूमाचा अवयव यांचा परस्पर अवयवावयवीभाव असल्यानें त्यांचा समवाय संबंध हा आहे संयोग नव्हे.

साध्यो वह्निस्तदभाववान् जलह्रदादिस्तद्वृत्तित्वं नौकादाववृत्तित्वं प्रकृते हेतुभूते धूमे इति कृत्वा लक्षणसमन्वयः। धूमवान् वह्नेरित्यादौ साध्यो धूमस्तदभाववदयोगोलकं तद्वृत्तित्वमेव वह्न्यादाविति नातिव्याप्तिः॥

(प०भा०)–ज्या ज्या ठिकाणीं धूम असतो त्या त्या ठिकाणीं अग्नि असतो, हा व्याप्तीचा अभिनय आहे व 'साहचर्यनियम' हें तिचें लक्षण आहे. जो बरोबर चालतो तो सहचर व त्याच्या भावास (धर्मास) साहचर्य म्हणतात. साहचर्य म्हणजे सामानाधिकरण्य व त्याचा जो नियम ती व्याप्ति होय आणि तो नियम म्हणजेच अव्यभिचरितत्व. अव्यभिचरितत्व म्हणजे व्यभिचाराचा अभाव व व्यभिचार म्हणजे साध्याभाववानावर हेतूनें राहणें यावरून साध्याभाववानावर हेतूनें न राहणें ही व्याप्ति असें सिद्ध झालें. 'महानस हें वन्हिमान् आहे. कांकीं त्याचे ठायीं धूम आहे म्हणून' इत्यादि ठिकाणीं वन्हि हें साध्य आहे व त्याचा अभाव जळाचा डोह इत्यादि ठिकाणीं आहे. या अभाववान् डोहादिकांवर नांववगैरे पदार्थ राहतात. पण प्रकृत हेतु 'धूम' रहात नाहीं. यासाठीं हें लक्षण सुसंगत होतें. आतां 'तो' धूमवान् आहे, का कीं अग्नि आहे म्हणून' इत्यादि ठिकाणीं धूम साध्य आहे. व तापलेला लोखंडाचा गोळा त्याच्या अभावानें युक्त आहे त्यावर वन्हि हा हेतु राहतो. म्हणजे हा हेतु साध्याभाववानावरही राहतो. त्यामुळें त्यावेर अवृत्तित्व हा धर्म रहात नसल्यामुळें अतिव्याप्तिही नाहीं.

व्याप्यस्य पर्वतादिवृत्तित्वं पक्षधर्मता॥

(त० भा०)–व्याप्यानें पर्वतादिकांवर असणें ही पक्षधर्मता होय.

(प०) ननु ज्ञातेयं व्याप्तिः पक्षधर्मताज्ञानमित्यत्र का नाम पक्षधर्मता इत्यपेक्षमाणं प्रति तत्स्वरूपं निरूपयति–व्याप्यस्येति। व्याप्यो नाम व्याप्त्याश्रयः। स च धूमादिरेव तस्य पर्वतादिवृत्तित्वं पक्षधर्मतेत्यर्थः॥

(प० भा०)–अहो ही व्याप्ति समजली, पण 'पक्षधर्मताज्ञान' याठिकाणीं म्हटलेल्या पक्षधर्मतेचें स्वरूप कोणतें आहे! हें जाणण्याची इच्छा करणाऱ्या मनुष्याला 'व्याप्यस्य०' यानें तिचें स्वरूप दाखवितात. व्याप्य म्हणजे व्याप्तीचा आश्रय. तो म्हणजे धूमादिकच होय. त्यानें पर्वतादि पक्षावर राहणें हीच पक्षधर्मता होय.

अनुमानं द्विविधं। स्वार्थं परार्थं च॥

(त० भा०)—स्वार्थ व परार्थ असें दोन प्रकारचें अनुमान आहे.

( न्या० ) अनुमानं विभजते—स्वार्थमिति ॥

(न्या०भा०)—'स्वार्थ०' या वाक्यानें अनुमानाचा विभाग करितात.

( प० ) अथ कथमनुमानमनुमितिकरणं कथं वा तस्मादनुमितेर्जनिरीति जिज्ञासमानं प्रति लाघवादनुमानं विभागमुखेनैव बुबोधयिषुरनुमानं विभजते—अनुमानमिति । द्वैविध्यं दर्शयति—स्वार्थं परार्थं चेति ॥

( प० भा० )—आतां अनुमान हें अनुमितीचें करण कसें किंवा त्यापासून अनुमिति कशी उत्पन्न होते ? हें जाणण्याची इच्छा करणाऱ्या मनुष्यास लाघवानें अनुमानाचा विभाग करून, ज्ञान करून देण्याची इच्छा करणारे ग्रंथकार ' अनुमानं० ' यानें त्याचा विभाग करितात. ' स्वार्थं परार्थं च' यानें तें दोन प्रकारचें आहे असें दाखवितात.

स्वार्थं स्वानुमितिहेतुः । तथाहि—स्वयमेव भूयोदर्शनेन यत्र यत्र धूमस्तत्र तत्राग्निरिति महानसादौ व्याप्तिं गृहीत्वा पर्वतसमीपं गतस्तद्गते चाग्नौ संदिहानः पर्वते धूमं पश्यन् व्याप्तिं स्मरति ' यत्र यत्र धूमस्तत्राग्निः ' इति । तदनन्तरं वह्निव्याप्यधूमवानयं पर्वत इति ज्ञानमुत्पद्यते । अयमेव लिङ्गपरामर्श इत्युच्यते । तस्मात्पर्वतो वह्निमानिति ज्ञानमनुमितिरुत्पद्यते । तदेतत्स्वार्थानुमानम् ॥

( त० भा० )—आपल्या स्वतःला अनुमितिज्ञान व्हावें म्हणून आपण जें अनुमान करितों, तें स्वार्थानुमान होय. उदाहरणार्थ 'जेथें धूम असतो तेथें अग्नि असतो जसें महानस 'इत्यादि ठिकाणीं अनेक वेळां त्यांचें साहचर्य पाहून धूम आणि अग्नि यांची व्याप्ति आहे असें समजून—असें व्याप्तीचें ग्रहण करून तो मनुष्य एका पर्वताजवळ गेला असतां, या पर्वतावर अग्नि आहे किंवा नाहीं, याबद्दल त्याला संशय उत्पन्न होतो. परंतु इतक्यांत पर्वतावर धूम आहे असें तो पहातो व ' जेथें धूम असतो तेथें अग्नि असतो ' या व्याप्तीचें त्याला स्मरण होतें. त्यानंतर 'हा पर्वत वन्हिव्याप्यधूमवान् आहे' असें ज्ञान उत्पन्न होतें. यालाच लिंगपरामर्श असें म्हणतात. ह्या लिंगपरामर्शापासुन ' पर्वत वन्हिमान् आहे ' असें अनुमितिज्ञान उत्पन्न होतें. हें जें वर सांगितलेलें अनुमान तें स्वार्थानुमान होय.

( न्या० ) स्वार्थानुमानं नाम न्यायाप्रयोज्यानुमानम् ॥

( न्या० भा० )—जें न्यायानें प्रयोज्य होत नाहीं, म्हणजे जें प्रतिज्ञा, हेतु इत्यादि पंचावयववाक्यानें मांडून दाखविलें जात नाहीं, तें स्वार्थानुमान होय.

( प० ) स्वस्यार्थः प्रयोजनं यस्मात् तत्स्वार्थमिति समासः । स्वप्रयोजनं च स्वस्यानुमेयप्रतिपत्तिः । एवं परार्थमित्यत्रापि । अर्थमिति । व्याप्तिबलेन लीनमर्थं गमयतीति लिङ्गम् । तच्च धूमादिः, तस्य परामर्शो ज्ञानविशेष इत्यर्थः । तस्मादिति । .लिङ्गपरामर्शादित्यर्थः । स्वार्थानुमानमुपसंहरति–तदेतदिति । यस्मादिदं स्वप्रतिपत्तिहेतुस्तस्मादेतत्स्वार्थानुमानमित्यर्थः ॥

( प० भा० )—आपलें प्रयोजन—आपला अर्थ ज्यापासून होतो तें स्वार्थ असा समास. स्वप्रयोजन म्हणजे स्वतःला अनुमेयाची प्रतिपत्ति—ज्ञान होणें. अनुमेय म्हणजे अनुमानाचा विषय. अशाच रीतीनें 'परार्थ' याचाही अर्थ करावा. व्याप्तीच्या बळानें गुप्त असलेल्या अर्थाचें जें ज्ञान करून देतें तें लिंग होय. तें लिंग म्हणजे धूमादिक होय व त्याचा परामर्श म्हणजे एक विशेष प्रकारचें ज्ञान असा इत्यर्थ आहे. तस्मात् म्हणजे लिंगपरामर्शापासून. 'तदेतत्' यानें स्वार्थानुमानाचा उपसंहार करितात. ज्याअर्थी हें स्वतःच्या ज्ञानाला कारण होतें त्याअर्थी हें स्वार्थानुमान होय, असा भावार्थ.

> यत्तु स्वयं धूमादग्निमनुमाय परं प्रति बोधयितुं पञ्चावयववाक्यं प्रयुज्यते तत्परार्थानुमानम् । यथा पर्वतो वह्निमान् । धूमवत्त्वात् । यो यो धूमवान्स स वह्निमान् यथा महानसम् । तथा चायम् । तस्मात्तथेति । अनेन प्रतिपादिताल्लिङ्गात्परोऽप्यग्निं प्रतिपद्यते ॥

( त० भा० )—परंतु स्वतः धूमावरून अग्नीविषयीं अनुमान करून नंतर दुसऱ्याची समजूत घालून देण्यासाठीं कोणी पंचावयवयुक्त वाक्याचा जो प्रयोग करितो तें परार्थानुमान होय. जसें हा पर्वत वान्हिमान् आहे. कारण कीं तो धूमवान् आहे. जो जो धूमवान् असतो तो तो वन्हिमान् असतो. जसें महानस, हा पर्वत तसा म्हणजे धूमवान् आहे. तेव्हां हा तसा म्हणजे वन्हिमानहि असला पाहिजे. अशा रीतीनें प्रतिपादन केलेल्या लिंगावरून पर्व-

त्यावर अग्नि आहे असें दुसराही जाणतो. म्हणून हें परार्थानुमान होय.

( न्या० ) न्यायप्रयोज्यानुमानं परार्थानुमानम् । न्यायत्वं च प्रतिज्ञाद्यवयवपञ्चकसमुदायत्वम् । अवयवत्वं च प्रतिज्ञाद्यन्यतमत्वम् ॥

( न्या० भा० )–ज्यांत न्यायाचा प्रयोग केला जातो तें परार्थानुमान होय. प्रतिज्ञादिक पांच अवयवांच्या समुदायाला न्याय असें म्हणतात. प्रतिज्ञा, हेतु इत्यादिकांतील प्रत्येकाला अवयव असें म्हणतात.

( प० ) क्रमप्राप्तं परार्थानुमानमाह–यत्त्विति । यत्पञ्चावयववाक्यं प्रयुज्यते तत्परार्थानुमानमिति सम्बन्धः । पञ्चावयवेति । अथावयवत्वं नाम द्रव्यसमवायिकारणत्वम् । प्रतिज्ञादिषु तदसम्भवात्कथमेतेऽवयवाः स्युरिति चेदनुमानवाक्यैकदेशत्वात्तु अवयवा इत्युपचर्यत इति गृहाण । नन्वेवमपि पञ्चावयववाक्यस्यानुमानत्वमेव न विचारसहं तस्य लिङ्गपरामर्शत्वाभावादिति चेन्नैवम् । लिङ्गपरामर्शप्रयोजकलिङ्गप्रतिपादकत्वेनानुमानमित्युपचारमात्रत्वात् । तदुदाहरति–यथेति । तथा चायमिति । अयं पर्वतस्तथा वह्निव्याप्यधूमवानित्यर्थः । तस्मात्तथेति । वह्निव्याप्यधूमवत्त्वाद्वह्निमानित्यर्थः । अनेनेति । अनेन पञ्चावयववाक्येनेत्यर्थः ॥

( प० भा० )–आतां क्रमानें प्राप्त झालेलें परार्थानुमान 'यत्तु०' इत्यादि ग्रंथानें सांगतात. जें पांच अवयवांनीं युक्त असें वाक्य योजिलें जातें तें परार्थानुमान होय, असा संबंध लावावा. अहो पण, अवयव म्हणजे द्रव्याचें समवायिकारण. पण प्रतिज्ञादिक द्रव्याचें समवायिकारण नसल्यानें हे अवयव कसे होतील ? अशी जर शंका असेल तर अनुमानवाक्याचे हे एकदेश असल्यानें अवयव आहेत, असें उपचारानें म्हटलें जातें असें समज. अहो असें जरी झटलें तरी सुद्धां पंचावयववाक्याला अनुमानत्व आहे हेंच विचाराच्या कसोटीस उतरणारें नाहीं. कारण, तो लिंगपरामर्श नव्हे. असें जर म्हणाल तर असें म्हणूं नका. कारण, लिंगपरामर्शाला कारण होणारें जें लिंग त्याचें प्रतिपादक पंचावयव वाक्य असल्यामुळें त्याला उपचारानें अनुमान असें म्हटलें आहे. 'यथा' येथून 'तथा चायं' येथपर्यंच्या वाक्यानें त्याचें उदाहरण देतात. हा पर्वत तसा म्हणजे वन्हीचा व्याप्य जो धूम तद्वान् आहे. 'तस्मात्तथा इति' म्हणजे

व्यतिरेकि । यथा वह्नौ साध्ये धूमवत्त्वम् । यत्र धूमस्तत्राग्निर्यथा महानसमित्यन्वयव्याप्तिः यत्र वह्निर्नास्ति तत्र धूमोऽपि नास्ति यथा ह्रद इति व्यतिरेकव्याप्तिः ॥

( त० भा० )—अन्वयव्यतिरेकी, केवलान्वयी, आणि केवलव्यतिरेकी असें तीन प्रकारचें लिंग ( हेतु ) आहे. अन्वयानें आणि व्यतिरेकानेंही जें लिंग व्याप्तिमत्—व्याप्तियुक्त असतें तें अन्वयव्यतिरेकी लिंग होय. उदाहरणार्थ—वन्हि साध्य असतांना धूमवत्व हें अन्वयव्यतिरेकी लिंग आहे. जेथें जेथें धूम असतो तेथें तेथें वन्हि असतो. जसें महानस. ही अन्वयव्याप्ति व जेथें वान्हि नसतो तेथें धूमही नसतो. जसा महान्हद. ही व्यतिरेकव्याप्ति होय.

( न्या० ) अन्वयेति । व्यापकसामानाधिकरण्यरूपव्याप्तिमानित्यर्थः । व्यतिरेकेणेति । व्यतिरेको नामाभावः । तथा च साध्याभावहेत्वभावयोर्व्याप्तिर्व्यतिरेकव्याप्तिः । इयं च व्याप्तिर्यत्र यत्र वह्न्यभावस्तत्र तत्र धूमाभाव इति । यत्रपदवीप्सया वह्न्यभाववति यावति धूमाभावग्रहणे यावत्पदस्य व्यापकत्वपरतया धूमाभावे वह्न्यभावव्यापकत्वं लभ्यते । एवंच वन्ह्यभावनिष्ठव्याप्यत्वस्य स्वाश्रयीभूतवन्ह्यभावव्यापकीभूताभावप्रतियोगित्वसंबन्धेन धूमनिष्ठतया गृहीतव्यतिरेकव्याप्तिमत्त्वेन व्यतिरेकित्वेन धूमव्यापकवह्निसामानाधिकरण्यरूपान्वयव्याप्तिमत्त्वेनान्वयित्वेन च गृह्यते । व्यतिरेकपरामर्शस्तु वह्न्यभावव्यापकीभूताभावप्रतियोगिधूमवान्पर्वत इत्याकारकः ॥

( न्या० भा० )—अन्वयानें व्याप्तिमत् म्हणजे व्यापकासह हेतूनें—व्याप्यानें एका अधिकरणावर राहणें, या अन्वयव्याप्तीनें युक्त असा अर्थ व व्यतिरेक म्हणजे अभाव. अर्थात् साध्याचा अभाव व हेतूचा अभाव यांची जी व्याप्ति तिला व्यतिरेकव्याप्ति म्हणतात. ज्या ज्या ठिकाणीं वन्हीचा अभाव असतो त्या त्या ठिकाणीं धूमाचा अभाव असतो अशी ही व्यतिरेकव्याप्ति आहे. 'येथें' यत्र या पदाच्या द्विरुक्तीमुळें जेवढ्या ठिकाणीं वन्हीचा अभाव असतो तेवढ्या सर्व ठिकाणीं धूमाचा अभाव आहे असें समजलें असतां, 'यावत्' हें पद व्यापक अशा अर्थी असल्यानें धूमाचा अभाव हा वन्हीच्या अभावाचा व्यापक आहे असें प्राप्त होतें. त्यामुळें वन्हीच्या अभावावर असणारें जें व्याप्यत्व तें आपल्याला आश्रय असणारा जो वन्हीचा अभाव, त्याला व्यापक असणारा जो धूमाचा अभाव, त्या धूमा-

भावाचा प्रतियोगी धूम आहे. ह्मणून त्याच्यावर त्या अभावाचें (धूमाभावाचें ) प्रतियोगित्व येतें. याच सबघानें वन्ह्यभावावरचें व्याप्यत्व धूमावर येत असल्यानें व अशा रीतीनें व्यतिरेकव्याप्तीचें ग्रहण केल्यानें धूम हा हेतु व्यतिरेकी होतो. धूमाचा व्यापक जो वन्हि त्याच्या अधिकरणावर धूमानें राहणें एतद्रूप अन्वयव्याप्ती ती या हेतूवर असल्यानें तो ' अन्वयि हेतु ' म्हणूनही समजला जातो. व्यतिरेकपरामर्श हा असा होतो -वन्हीच्या अभावाचा व्यापक धूमाचा अभाव, त्याचा प्रतियोगी जो धूम, तद्वान् हा पर्वत आहे.

( प० ) अन्वयव्यतिरेकिणो लक्षणमाह–अन्वयेति । तृतीयाया प्रयोज्यत्व मर्थ । साध्यसाधनयो साहचर्यमन्वय । तदभावयो साहचर्यं व्यतिरेक । तथा चान्वयप्रयोज्यव्याप्तिमद्व्यतिरेकप्रयोज्य व्याप्तिमदन्वयव्यतिरेकीत्यर्थ । केवल व्यतिरेकिन्यतिव्याप्तिवारणाय अन्वयेनेति । केवला वयिनि व्यभिचारवारणाय व्यतिरेकेणेति । तथा चान्वयव्याप्तिरुपदर्शितैव । व्यतिरेकव्याप्तिश्च साध्याभावव्यापकीभूताभावप्रतियोगित्वमित्यर्थ । तदुक्त–व्याप्यव्यापकभावो हि भावयार्यादृगिष्यते । तयोरभावयोस्तस्माद्विपरीत प्रतीयते ॥ अन्वये साधनं व्याप्य साध्य व्यापकमिष्यते । साध्याभावोऽन्यथा व्याप्यो व्यापक साधनात्यय इति ॥

(प० भा०)–'अन्वय०' यावाक्यानें अन्वयव्यतिरेकी हेतूचें लक्षण सांगतात. तृतीयेचा ' प्रयोज्यत्व ' हा अर्थ आहे. ( अन्वयानें प्रयोज्य व व्यतिरेकानें प्रयोज्य ) साध्य व साधन यांच्या साहचर्याला अन्वय असें म्हणतात व त्यांच्या अभावांच्या साहचर्याला व्यतिरेक असें म्हणतात. म्हणून अन्वयामुळें होणारी व्याप्ति ज्यावर आहे व व्यतिरेकानें होणारी व्याप्ति ज्यावर आहे अशा हेतूस अन्वयव्यतिरेकी असें म्हणतात. केवलव्यतिरेकीवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'अन्वयानें व्याप्तिमान्' असें म्हटलें आहे. नाहींतर व्यतिरेकानें व्याप्तिमान् केवळ व्यतिरेकीही असतो. पण तो हेतू अन्वयानें व्याप्तिमान् नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. आतां, जो अन्वयानें व्याप्तिमान् असतो त्यास अन्वयव्यतिरेकी असें म्हटल्यास केवलान्वयी हेतु देखील अन्वयानें व्याप्तिमान् असल्यानें त्यावर अन्वयव्यतिरेकी हेतूच्या लक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं ' व्यतिरेकानें व्याप्तिमान् ' असें म्हटलें पाहिजे. म्हणजे केवलान्वयी हा व्यतिरेकानें व्याप्तिमान् नसल्यानें त्यावर

अतिव्याप्ति जाणार नाहीं. अन्वयव्याप्ति वर दाखविलीच आहे, व व्यतिरेकव्याप्ति म्हणजे साध्याभावाला व्यापणारा जो अभाव त्या अभावाचें प्रतियोगित्व ही होय. ह्मणजे हें प्रतियोगित्व ज्या ठिकाणीं येतें तेथें व्यतिरेकव्याप्ति आहे असें समजावयाचें, त्याविषयीं असें म्हटलें आहे. दोन भाव पदार्थांचा व्याप्यव्यापक भाव जशा रीतीचा मानलेला असतो त्याच्या उलट त्यांच्या अभावाचा व्याप्यव्यापकभाव मानला जातो. म्हणजे अन्वयामध्यें साधन व्याप्य असतें व साध्य व्यापक असतें. पण व्यतिरेकामध्यें याच्या उलट म्हणजे साध्याभाव व्याप्य असतो व हेतूचा अभाव व्यापक असतो.

अन्वयमात्रव्याप्तिकं केवलान्वयि। यथा घटोऽभिधेयः प्रमेयत्वात्पटवत्। अत्र प्रमेयत्वाभिधेयत्वयोर्व्यतिरेकव्याप्तिर्नास्ति सर्वस्यापि प्रमेयत्वादभिधेयत्वाच्च ॥

( त० भा० )–ज्या लिंगाची केवळ अन्वयव्याप्तिच संभवते तें केवलान्वयी[1] लिंग होय. उदाहरणार्थ घट अभिधेय आहे, कारण, की तो प्रमेय आहे. जो प्रमेय असतो तो अभिधेय असतो, जसा पट. याठिकाणीं प्रमेयत्व आणि अभिधेयत्व यांच्यामध्यें व्यतिरेकव्याप्ति नाहीं. कारण, सर्वच पदार्थ अभिधेय आणि प्रमेय आहेत. ( ह्मणून त्यांचा अभाव कोठेंच नाहीं. त्यामुळें व्यतिरेकव्याप्तिही नाहीं. )

( न्या० ) केवलान्वयिनो लक्षणमाह–अन्वयेति। केवलान्वयिसाध्यकत्वं हेतोः केवलान्वयित्वम्। साध्ये केवलान्वयित्वं चात्यन्ताभावाप्रतियोगित्वम्। तथाच अभावाप्रतियोगिसाध्यकत्वं केवलान्वयिहेतोर्लक्षणम्।[1] एतच्च लक्षणं हेतोर्व्यतिरेकित्वेऽपि संगच्छते। साध्यस्य केवलान्वयित्वादेव व्यतिरेकव्याप्तेरभावादन्वयमात्रव्याप्तिकं केवलान्वयीति मूलकारोक्तं लक्षणमुपपन्नम्। नचात्यन्ताभावाप्रतियोगित्वरूपकेवलान्वयित्वमाकाशाभावे संयोगाभावे चाव्याप्तमिति वा-

---

१ जें सर्वत्र असून ज्याचा अभाव सर्वथा नाहीं तें केवलान्वयी होय. ज्ञेयत्व, वाच्यत्व व प्रमेयत्व हे धर्म केवलान्वयी आहेत. ते असे–जगांतील सर्व विषयांचें ज्ञान आम्हांसारख्या अल्पज्ञ प्राण्यांना जरी होत नाहीं तरी तें ज्ञान परमेश्वराला होतें म्हणून त्या ज्ञानाचा विषयपणा ( ज्ञेयत्व ) सर्व पदार्थांचे ठायीं आहे. म्हणून ज्ञेयत्व केवलान्वयी होय. तसेंच वाच्यत्व व प्रमेयत्वही केवलान्वयी आहेत.

१ अत्यन्ताभावप्रतियोगित्वेऽपीत्यर्थः।

च्यम् । स्वविरोधिवृत्तिमदत्यन्ताभावाप्रतियोगित्वस्यैव तदर्थत्वात् । एकजातीयसम्बन्धेन सर्वत्र विद्यमानत्वं केवलान्वयित्वमिति नव्याः ॥

( न्या०भा० )–' अन्वय० ' यानें केवलान्वयीचें लक्षण सांगतात. हेतुचें केवलान्वयित्व म्हणजे त्याचें साध्य केवलान्वयी असणें. साध्य केवलान्वयी असणें म्हणजे तें अत्यन्ताभावाचें प्रतियोगी नसणें. म्हणजे त्याचा अत्यन्ताभावच नसणें. तो नसल्यामुळें तें अत्यन्ताभावाचें प्रतियोगी होत नाहीं. अर्थात् ज्याचें साध्य अभावाचें अप्रतियोगी असतें हेंच केवलान्वयी हेतुचें लक्षण आहे. हें लक्षण, हेतु जरी व्यतिरेकि असला ( अत्यन्ताभावाचा प्रतियोगि जरी असला ) तरी सुद्धां त्याच्यावर येतें. साध्य केवलान्वयी असल्यानेंच व्यतिरेकव्याप्तीचा अभाव होतो. त्यामुळें ' ज्याची केवल अन्वयव्याप्तीच असते तें लिंग केवलान्वयी ' असें जें मूलकारांनीं लक्षण केलें आहे तें योग्य आहे. अहो पण, 'अत्यन्ताभावाचें अप्रतियोगी असणें' हें जें केवलान्वयीचें लक्षण तें आकाशाभाव व संयोगाभाव वास्तविक केवलान्वयी असतां त्यांचेवर येत नाहीं, म्हणजे तें अव्याप्त होतें म्हणून म्हणाल तर तसें म्हणूं नये कारण स्वविरोधी व वृत्तिमान् अशा अत्यंताभावाचें जें अप्रतियोगी त्यास केवलान्वयि म्हणावयाचें, असा त्याचा अर्थ आहे. आतां, आकाशाभावाचा अत्यन्ताभाव म्हणजे आकाशाभावाभाव ( अर्थात् आकाश ). पण हा वृत्तिमान् पदार्थ नसल्यानें असा अत्यन्ताभाव घ्यावयाचा नाहीं तर वृत्तिमान् होणारा असा अत्यन्ताभाव म्हणजे घटाचा अत्यन्ताभाव घ्यावयाचा आहे व त्याचा प्रतियोगी घट आहे, व आकाशाभाव हा अत्यन्ताभावाचा अप्रतियोगीच आहे. म्हणून त्याचेवर केवलान्वयीच्या लक्षणाची अव्याप्ति येत नाहीं. अशीच वरील लक्षणाप्रमाणें संयोगाभावावर सुद्धां अव्याप्ति येते. ती अशी कीं संयोगाभावाचा अत्यन्ताभाव म्हणजे संयोगाभावाभाव ( संयोग ) याचें प्रतियोगित्व संयोगाभावाला येतें. अप्रतियोगी असणें हें केवलान्वयीचें लक्षण त्यांत नाहीं त्यामुळें अव्याप्ति येते, ती न यावी यासाठीं ' स्वविरोधि

१ तेन संयोगाभावस्य स्वाविरोधिसंयोगात्मकत्वात्यन्ताभावप्रतियोगित्वेऽपि, आकाशाभावस्य चावृत्याकाशरूपत्वात्यन्ताभावप्रतियोगित्वेऽपि न क्षतिरिति नव्याः ॥

अत्यन्ताभाव ' घ्यावा. ह्मणजे संयोगाभावाभाव ( अर्थात् संयोग ) हा संयोगाभावाशीं विरोधी नसल्यानें ह्मणजे संयोग व त्या संयोगाचाअभाव हे एखाद्या वृक्षरूपी अधिकरणावर राहत असल्यानें, तो स्वविरोधी अत्यन्ताभाव होत नाहीं. घटाभाव हा स्वविरोधी अत्यन्ताभाव आहे व त्या अभावाचा प्रतियोगी घट आहे आणि अप्रतियोगी हा संयोगाभाव आहे. ह्मणून याचेवर ' अप्रतियोगी होणें ' हें केवलान्वयीचें लक्षण येत असल्यानें अव्याप्ति नाहीं. नवीन नैयायिक एकजातीयसंबंधानें सर्व ठिकाणीं असणें यास केवलान्वयी असें ह्मणतात. एकजातीयसंबंध ह्मणजे स्वरूपसंबंध होय.

( ५० ) केवलान्वयिनो लक्षणमाह–अन्वयेति । अन्वयेनैव व्याप्तिर्यस्मिन् स तथा । प्रमेयत्वाभिधेयत्वयोर्व्यतिरेकव्याप्तिं निराकरोति–अत्रेति । अभिधेयत्वासाध्यकानुमान इत्यर्थः । ननु कुतस्तन्निषेधोऽतस्तत्र हेतुमाह–सर्वस्येति। पदार्थमात्रस्येत्यर्थः, तथा च सकलपदाभिधेयत्वस्येश्वरप्रमाविषयत्वस्य चात्यन्ताभावाप्रतियोगित्वरूपकेवलान्वयित्वेन तदभावाप्रसिद्ध्या तद्घटितव्यतिरेकव्याप्तिर्न संभवत्येवेति भावः ॥

( ५० भा० )–' अन्वय० ' यानें केवलान्वयीचें लक्षण सांगतात. ज्याच्यावर अन्वयानेंच व्याप्ति आहे तो केवलान्वयी 'अत्र०' इत्यादि वाक्यानें प्रमेयत्व व अभिधेयत्व यांची व्यतिरेकव्याप्ति नाहीं असें सांगतात. 'अत्र' ह्मणजे जेथें अभिधेयत्व साध्य आहे अशा अनुमानांत असा अर्थ आहे. अहो पण, प्रमेयत्व व अभिधेयत्व यांच्या व्यतिरेकव्याप्तीचा निषेध कां केला आहे ह्मणून विचाराल तर त्याविषयीं ' सर्वस्य ' हा हेतु दिला आहे. सर्वस्य ह्मणजे पदार्थमात्राचा असा अर्थ आहे. त्यामुळें सर्वपदाचें अभिधेयत्व व ईश्वराच्या ज्ञानाचा विषय होणें, यांचा कोठेंही अत्यन्ताभाव नसल्यानें हे अत्यन्ताभावाचे अप्रतियोगिरूपी केवलान्वयी आहेत. म्हणून त्यांचा अभाव प्रसिद्ध नसल्यानें त्या अभावानें घटित अशी त्यांची व्यतिरेकव्याप्ति संभवत नाहीं. असा भावार्थ.

> व्यतिरेकमात्रव्याप्तिकं केवलव्यतिरेकि । यथा पृथिवीतरेभ्यो भिद्यते गन्धवत्त्वात्। यदितरेभ्यो न भिद्यते न तद्गन्धवत् । यथा जलम् । न चेयं तथा । तस्माच्च तथेति। अत्र यद्गन्धवत् तदितरभिन्नमित्यन्वयदृष्टान्तो नास्ति। पृथिवीमात्रस्य पक्षत्वात् ।

दृष्टान्त नसल्यामुळें गंधाचा व्यापक जो इतरभेद याच्याशी सामानाधिकरण्यरूपी अन्वयव्याप्तीचें ज्ञान संभवत नाहीं. तर ज्या ज्या ठिकाणीं पृथ्वीहून इतरांच्या भेदाचा अभाव असतो. त्या त्या ठिकाणीं गंधाचा अभाव असतो; जसें, 'जलादिक' या व्यतिरेक दृष्टान्तांत जलादिकांमधील इतरभेदाभावरूप जी साध्याभावाची व्यापकता ती गंधाच्या अभावावरून कळते. हाच अर्थ मनांत ठेवून ' जें इतरांपासून भिन्न नाहीं तें गंधवान् नाहीं, जसें जल ' या ग्रंथानें मूळकारांनीं व्यतिरेकव्याप्ति दाखविली आहे. अशा रीतीनें व्यतिरेकव्याप्तीचें ज्ञान झाल्यावर इतर भेदाभावाला व्यापक झालेला जो गंधाचा अभाव त्याचा प्रतियोगी जो गंध तो या पृथ्वीवर आहे, अशा प्रकारच्या व्यतिरेकीपरामर्शापासून पृथ्वीत्वानें अवच्छिन्न जी पृथ्वी हिच्यावर असणाऱ्या उद्देश्यतेनें दाखविलेला जो इतरभेद त्यानें अवच्छिन्न असलेली जी इतरभेदावर असणारी विधेयता ती जिच्यांत आहे अशी पृथ्वी इतरभेदवती आहे, ही अनुमिति उत्पन्न होते. हें यांतील तत्त्व आहे. 'यथा जलं ' या वर तर्कसंग्रहोक्त मूळाचा अर्थ वर सांगितलाच आहे. जलावर जलादि इतरांचा भेद नाहीं व इतरभेदाच्या अभावाला व्यापक जो गंधाचा अभाव ( गंध नसणें ) तोही याच्यावर आहे. अशा प्रकारें गंधाभावावरून निरूपित झालेली व्याप्यता इतरभेदाच्या अभावावर जाणली जाते, असा याचा निष्कर्ष. ' न चेयं तथा ' ही पृथ्वी तशी; म्हणजे इतरभेदाभावाला व्यापक जो गंधाभाव त्यानें युक्त नाहीं, तर गंधाभावाचा अभावरूपी जो गंध तद्वती ही आहे. ' तस्मात् न तथा ' येथील ' तत् ' या शब्दानें गंधाभावाच्या अभावरूपी गंधाचें ज्ञान होत असल्यानें ' तस्मात् ' या पंचम्यंत पदानें गंधाभावाभाववत्त्व म्हणजे गंधवत्त्व हा अर्थ उपलब्ध होतो. ' तथा ' म्हणजे हिच्यावर इतरभेदाचा अभाव नाहीं, ' न ' याचा अर्थ अभाव असा आहे. त्यामुळें इतर भेदाभावाभाववती म्हणजे इतरभेदवती–इतरांचा भेद जिच्यावर आहे अशी असा इत्यर्थ.

( ५० ) केवलव्यतिरेकिणो लक्षणमाह–व्यतिरेकेति । व्यतिरेकेणैव व्याप्तिर्निरस्तत्तथा । अन्वयव्यतिरेकिण्यतिव्याप्तिवारणाय मात्रेति । न चेयं तथेति

इयं पृथिवी न तथा न गन्धाभाववतीत्यर्थः ॥ तस्मान्न तथेति । गन्धाभाववत्त्वाभावादितरभेदाभाववती नेत्यर्थः । नन्वत्र किमिति नान्वयव्याप्तिरित्याशङ्क्य परिहरति–अत्रेति । इतरभेदसाधकानुमान इत्यर्थः । इदमुपलक्षणम् । जीवत् शरीरं सात्मकं प्राणादिमत्त्वात् यन्नैवं तन्नैवम् यथा घटः। प्रत्यक्षादिकं प्रमाणमिति व्यवहर्तव्यं प्रमाकरणत्वात् । यन्नैवं तन्नैवम् । यथा प्रत्यक्षाभासः । विवादास्पदम् आकाशमिति व्यवहर्तव्यं शब्दवत्त्वादित्यादिकमपि केवलव्यतिरेकीति द्रष्टव्यम् ॥

(प० भा०)–'व्यतिरेक०' ग्रंथानें इत्यादि यानें केवलव्यतिरेकीचें लक्षण सांगतात. ज्यामध्यें व्यतिरेकानेंच व्याप्ति असते त्याला केवलव्यतिरेकी म्हणतात. अन्वयव्यतिरेकी हेतूवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठी 'मात्र' असें पद घातलें आहे. हें घातल्यानें अन्वयव्यतिरेकीमध्यें व्यतिरेकानेंच व्याप्ति नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाही. 'ही पृथ्वी तशी नाहीं' म्हणजे हिच्यावर गंधाभाव रहात नाहीं. हिच्यावर गंधाभाववत्त्वाचा अभाव असल्यामुळें ही 'इतरभेदाभाववती' नाहीं म्हणजे हिच्यावर गंध असल्यामुळें इतरांचा ( जलादिकांचा ) भेदच राहतो. अहो पण, याठिकाणीं अन्वयव्याप्ति कां नाहीं अशी शंका घेऊन 'अत्र-' या ग्रंथानें त्या शंकेचा निरास करितात. 'अत्र' म्हणजे इतरांचा भेद साधणाऱ्या अनुमानामध्यें असा इत्यर्थ. हें उपलक्षण आहे. जिवंत शरीर आत्म्यानें सहित–आत्मयुक्त आहे. कारण त्याचे ठायीं प्राण आहेत; जें आत्म्यानें युक्त नसतें त्याचे ठिकाणीं प्राणही नसतात. जसा घट. या घटांत आत्मा नसल्यामुळें प्राणही नाहींत.

प्रत्यक्षादिक प्रमाणें आहेत, असें म्हणावें. कारण, तीं प्रमेचीं करणें आहेत. ज्यांना प्रमाणें असें म्हणत नाहींत तीं प्रमेचीं करणेंही नसतात. जसा प्रत्यक्षाचा आभास. तसेंच जें विवादास्पद आहे त्यास आकाश म्हणावें. कारण, त्याचेवर शब्द आहे. ज्याला आकाश म्हणत नाहींत तेथें शब्दही असत नाहीं. इत्यादिक उदाहरणेंही केवलव्यतिरेकीचीं आहेत असें जाणावें.

संदिग्धसाध्यवान् पक्षः यथा धूमवत्त्वे हेतौ पर्वतः ॥

( प० भा० )–ज्याच्यावर साध्य आहे किंवा नाहीं याबद्दल

संशय असतो तो पक्ष होय. उदाहरणार्थ, धुमावरून वन्हीचें अनुमान करावयाचें असेल तेव्हां पर्वत हा पक्ष होय.

( न्या० ) पक्षलक्षणमाह–संदिग्धेति। साध्यप्रकारकसंदेहविशेष्यत्वं पक्षत्वम्। इदं च लक्षणमनुमितेः पूर्वं साध्यसंदेहो नियमेन जायत इत्यभिप्रायेण प्राचीनैः कृतम्। गगनविशेष्यकमेघप्रकारकसंदेहाभावदशायामपि गृहमध्यस्थपुरुषस्य घनगर्जितश्रवणेन गगनं मेघवदित्याकारिकाया गगनत्वावच्छिन्नोद्देश्यतानिरूपितमेघत्वावच्छिन्नविधेयताकाया अनुमितेर्दर्शनात्प्राचीनलक्षणं विहाय नवीनैरनुमित्युद्देश्यत्वं पक्षत्वमिति स्थिरीकृतम् ॥

( *न्या० भा०–* )–'संदिग्ध०' या खंडानें पक्षाचें लक्षण सांगतात. साध्य ज्यांत प्रकार म्हणजे विशेषण आहे ! अशा संशयामध्यें जो विशेष्य होतो त्यास पक्ष म्हणतात. हें लक्षण अनुमितीच्या पूर्वी साध्याविषयीं संशय नियमानें येतो, अशा अभिप्रायानें पूर्वीच्या लोकांनीं केलें आहे. आकाश ज्यामध्यें विशेष्य आहे व मेघ हा ज्यामध्यें विशेषण आहे असा संशय नसतांना देखील घरांत असणाऱ्या पुरुषाला मेघाचें गडगडणें ऐकून आकाश हें मेघवत् आहे अशा रीतीची अनुमिति होत असते. या अनुमितीत गगनत्वानें अवच्छिन्न अशा गगनावर असणारी जी उद्देश्यता तिनें दाखविलेली मेघत्वानें अवच्छिन्न अशा मेघावर असणारी जी विधेयता ती जिच्यामध्यें आहे अशी अनुमिति होते. म्हणून प्राचीन लक्षण सोडून नवीन नैयायिकांनीं अनुमितीमध्यें जो उद्देश्य असतो त्यास पक्ष म्हणावें असें पक्षाचें लक्षण केलें आहे.

( प० ) अथ पृथिवीमात्रस्य पक्षत्वादित्यत्र किं नाम पक्षतेत्यपेक्षायां तां निर्वक्ति–संदिग्धेति। सपक्षवारणाय संदिग्धेति ॥

( प० भा० )–अहो पण, वर ' पृथ्वीमात्रस्य पक्षत्वात् ' असें जें म्हटलें आहे त्यांतील पक्षता म्हणजे काय ! हें जाणण्याची इच्छा झाली असतां ' संदिग्ध० ' या वाक्यानें ती पक्षता सांगतात. ' जो साध्यवान् असतो तो पक्ष ' असें म्हटल्यास सपक्ष देखील साध्यवान् असल्यानें त्याचेवर पक्षाचें लक्षण जाऊं लागेल तें न जावें यासाठीं ' संदिग्ध ' असें म्हटलें आहे. सपक्षावरील साध्याविषयीं संशय नसल्यानें त्याचेवर पक्षलक्षणाची अतिव्याप्ति जात नाहीं.

निश्चितसाध्यवान् सपक्षः। यथा तत्रैव महानसम् ॥

( त० भा० )-ज्याच्यावर साध्य निश्चयानें रहात आहे असें माहीत असतें तो सपक्ष होय. उदाहरणार्थ त्याच अनुमानांत महानस हा सपक्ष आहे.

( न्या० ) सपक्षलक्षणमाह-निश्चितेति । साध्यप्रकारकनिश्चयविशेष्यत्वं सपक्षत्वम् । निश्चयश्च महानसं वह्निमदित्याकारकः ॥

( न्या० भा० )-' निश्चित० ' यानें सपक्षाचें लक्षण सांगतात. साध्य ज्यांत विशेषण आहे अशा निश्चयांत जो विशेष्य असतो तो सपक्ष होय. ' महानस वन्हिमान् ' आहे अशा प्रकारचा निश्चय समजावा. येथें वन्हि हें साध्य विशेषण असून महानस हें निश्चयाचें विशेष्य आहे. म्हणून महानस सपक्ष होय.

( प० ) निश्चितेति । पक्षेऽतिव्याप्तिवारणाय निश्चितेति । तत्रैवेति । धूमवत्त्वे हेतावेवेत्यर्थः ॥

( प० भा० )-पक्षावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं निश्चित असें पद घातलें आहे. हें घातल्यानें पक्षावर जरी साध्य आहे तरी त्याचा निश्चय नसल्यामुळें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. ' तत्रैव ' म्हणजे धूमवत्त्व हाच हेतु असतांना असा भावार्थ.

निश्चितसाध्याभाववान् विपक्षः । यथा तत्रैव महाह्रदः ॥

( त० भा० )-ज्याच्यावर साध्याचा अभाव राहतो असें निश्चयानें माहीत असतें तो विपक्ष होय. उदाहरणार्थ, त्याच अनुमानांत महान्हद हा विपक्ष होय.

( न्या० ) विपक्षलक्षणमाह-निश्चितसाध्याभावेति । साध्याभावप्रकारकनिश्चयविशेष्यत्वं विपक्षत्वम् । निश्चयश्च ह्रदो वह्न्यभाववानित्याकारकः ॥

( न्या० भा० ) ' निश्चितसाध्याभाव० ' यानें विपक्षाचें लक्षण सांगतात. साध्याभाव हें ज्यांत विशेषण आहे, अशा निश्चयाचें विशेष्य होणाऱ्यास विपक्ष म्हणतात. तो निश्चय म्हणजे-न्हद वन्हयभाववान् आहे अशाप्रकारचा होय.

( प० ) निश्चितेति । सपक्षेऽतिव्याप्तिवारणाय साध्येति । पक्षेऽतिव्याप्तिवारणाय निश्चितेति । तत्रैव धूमवत्त्व एव ॥

( प०भा० )-' जो अभाववान् असतो तो विपक्ष ' असें म्हटल्यास सपक्षावर सुद्धां घटादिकाचा अभाव असल्यानें त्याचेवर

या विपक्षलक्षणाची अतिव्याप्ति जाते. तिचें निवारण करण्यासाठीं 'साध्य' असें पद घातलें आहे. तें घातल्यानें सपक्षावर साध्याचा अभाव नसल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. पक्षावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'निश्चित' असें पद घातलें आहे. म्हणजे पक्षावर साध्याभावाचा संशय असतो. निश्चय असत नाहीं. म्हणून त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. 'तत्रैव' म्हणजे, धूमवत्त्व ज्या अनुमानांत हेतु आहे अशा अनुमानांत.

सव्यभिचारविरुद्धसत्प्रतिपक्षासिद्धबाधिताः पञ्च हेत्वाभासाः ॥

(त० भा)–सव्यभिचार, विरुद्ध, सत्प्रतिपक्ष, असिद्ध, व बाधित हे पांच हेत्वाभास[1] आहेत.

(न्या०) एवं सद्धेतून्निरूप्य हेत्वाभासान्निरूपयति–सव्यभिचारेति। हेतुवदाभासन्त इति हेत्वाभासाः। दुष्टहेतव इत्यर्थः। दोषाश्च व्यभिचारविरोधसत्प्रतिपक्षासिद्धिबाधाः। एतद्विशिष्टा हेतवो दुष्टहेतव इत्यर्थः। यद्विषयत्वेन ज्ञानस्यानुमितितत्करणान्यतरप्रतिबन्धकत्वं तत्त्वं दोषसामान्यस्य लक्षणम्। हेतौ दोषज्ञाने सत्यनुमितिप्रतिबन्धो जायते व्याप्तिज्ञानप्रतिबन्धो वा। अतो वादिनिग्रहाय प्रतिवादिनोद्भाविते हेतौ दोषोद्भावनार्थं दुष्टहेतुनिरूपणमित्यर्थः। पर्वतो वह्निमान् प्रमेयत्वादित्यत्र प्रमेयत्वहेतौ वह्न्यभाववद्वृत्तित्वरूपव्यभिचारे ज्ञाते वह्न्यभाववद्वृत्तित्वरूपव्याप्तिज्ञानप्रतिबन्धः फलम् ॥

(न्या० भा०)–अशा रीतीनें सद्धेतूचें निरूपण करून आतां 'सव्यभिचार०' या खंडानें हेत्वाभासाचें निरूपण करितात. जे हेतूंसारखे भासतात पण खरे हेतु नसतात ते हेत्वाभास, म्हणजे दुष्ट हेतु असा इत्यर्थ. व्यभिचार, विरोध, सत्प्रतिपक्ष, असिद्धि व बाध हे दोष आहेत आणि यांनीं युक्त जे हेतु ते दुष्ट हेतु असा इत्यर्थ

[1] हेत्वाभास याचे–एक दुष्ट हेतु व दुसरा हेतूवरचा दोष असे दोन अर्थ आहेत. यास्तव आधीं दोषाचें स्वरूप लक्षण समजल्यावाचून दुष्ट हेतूचें स्वरूप इत्यादि स्पष्ट समजत नाहीं. म्हणून प्रथम दोषाचें लक्षण सांगतात. नंतर दोष ज्यावर असेल तो दुष्ट हेतु असें अर्थात् समजतें. आतां ज्या विषयाचें ज्ञान झाल्यानें त्यावेळीं होणारी अनुमिति किंवा तिचा कारण होणारा परामर्श वगैरे होत नाहीं तो विषय हेत्वाभास होय. व हाच दोष आहे एक हेतूसारखा भासणारा व दुसरा हेतूचा आभास म्हणजे दोष, हेच हेत्वाभासशब्दाचे दोन अर्थ आहेत.

आहे. जो ज्ञानाचा विषय झाल्यामुळें जें ज्ञान अनुमिति किंवा तिचें करण ह्यापैकीं एकाला प्रतिबंध करितें ( त्या ज्ञानातील विषय ) तो विषय दोष होय. हें दोषसामान्याचें म्हणजे दोषाच्या सामान्याचें दोषाच्या जातीचें लक्षण आहे. हेतूंतील दोषाचें ज्ञान झालें असतां म्हणजे हेतूवर दोष आहे असें कळलें असता अनुमिति ज्ञानाला किंवा व्याप्तिज्ञानाला प्रतिबंध होतो. याकरितां बाधाचा निग्रह करण्याकरितां त्या दिलेल्या हेतूमध्यें दोष दाखवितां यावेत म्हणून दुष्ट हेतूंचें निरूपण केलें आहे. ' पर्वत वन्हिमान् आहे, कारण त्याचे ठिकाणीं प्रमेयत्व आहे ' याठिकाणीं प्रमेयत्व या हेतूचा–वन्हीचा अभाव ज्या ठिकाणीं आहे त्या ठिकाणीं प्रमेयत्व या हेतूनें राहणें –हा जो व्यभिचार तो जाणला असतां ' वन्हीचा अभाव ज्या ठिकाणीं आहे त्याठिकाणीं हेतूनें प्रमेयत्व न राहणें ' अशा रूपाच्या व्याप्तीच्या ज्ञानाचा प्रतिबंध होणें हें फल होय.

( प० ) हेतून्निरूप्य प्रसङ्गाद्धेत्वाभासानाह–सव्यभिचारेति। अनेदं बोध्यम्–अन्वयव्यतिरेकि तु पञ्चरूपोपपन्नं स्वसाध्यं साधयितुं क्षमते तानि कानीति चेदुच्यताम्। पक्षधर्मत्वं सपक्षसत्त्वं विपक्षाद्व्यावृत्तिरबाधितविषयत्वमसत्प्रतिपक्षत्वं चेति। अबाधितः साध्यरूपो विषयो यस्य तत्तथोक्तम्। तस्य भावस्तत्त्वम्। एवं साध्याभावसाधकं हेत्वन्तरं यस्य स सत्प्रतिपक्ष इत्युच्यते। स नास्ति यस्य सोऽसत्प्रतिपक्षः, तस्य भावस्तत्त्वमिति। बोध्यम् केवलान्वयि तु चतूरूपोपपन्नमेव स्वसाध्यं साधयितुं क्षमते तस्य विपक्षाविपर्ययेण तद्व्यावृत्तिविपर्ययात्। केवलव्यतिरेक्यपि तथा तस्य सपक्षविपर्ययेण तत्सत्वविपर्ययादिति। उपदर्शितरूपाणां मध्ये कतिपयरूपोपपन्नत्वाद्धेतुवदाभासन्त इति हेत्वाभासाः। तत्त्वं चानुमितितत्करणान्यतरप्रतिबन्धकयथार्थज्ञानविषयत्वम्। बाधस्थले वह्निरनुष्ण इत्यनुमितिप्रतिबन्धकं यज्ज्ञानमुष्णत्ववद्वह्निरनुष्णत्वबाधकं द्रव्यत्वमित्याकारकं तद्विषयत्वस्य विषयतासम्बन्धेन द्रव्यत्वरूपहेत्वाभासे सत्त्वाल्लक्षणसमन्वयः। सद्धेतुवारणाय यथार्थेति। घटादिवारणाय अनुमितितत्करणप्रतिबन्धकेति। व्यभिचारादि अव्याप्तिवारणाय तत्करणान्यतरेति ॥

( प० भा० )–हेतूचें निरूपण करून प्रसंगानें 'सव्यभिचार०' इत्यादि खंडानें हेत्वाभासाचें निरूपण करितात. याठिकाणीं असें समजावें–अन्वयव्यतिरेकी हेतु पांच रूपांनीं युक्त होऊन आपलें साध्य साधण्याला समर्थ होतो. ' तीं पांच रूपें कोणतीं ?' म्हणून म्हणाल तर ऐका–पक्षधर्मत्व, सपक्षसत्व, विपक्षावर नसणें,

विपयत्व व असत्प्रतिपक्षत्व, हीं पांच रूपें होत. ज्याचा साध्यरूपी विषय अबाधित असतो तो अबाधित विषय हेतु होय. त्याचा जो भाव तें अबाधितविषयत्व. तसेंच साध्याचा अभाव साधणारा दुसरा हेतु ज्याला आहे तो सत्प्रतिपक्ष, तो ज्याला नाहीं तो असत्प्रतिपक्ष त्याच्या भावाला ( धर्माला ) असत्प्रतिपक्षत्व म्हणतात. त्यांतील केवलान्वयी हेतु चार रूपांनीं युक्त होऊन आपलें साध्य साधण्यास समर्थ होतो. कारण, त्याला विपक्षच नसल्याकारणानें त्याच्यापासून व्यावृत्ति हें त्याचें एकरूप नसतें. तसाच केवलव्यतिरेकीसुद्धां चारच रूपानीं युक्त होऊन आपलें साध्य साधतो. कारण त्याला सपक्षच नसल्यानें त्यावर असणें हें त्याचें एकरूप नसतें. वर दाखविलेल्या रूपापैकीं कांहीं रूपानीं युक्त असल्यामुळें जे हेतूसारखे भासतात ते हेत्वाभास होत. अनुमिति व तिचें करणत्व यापैकीं एकाला प्रतिबंधक होणाऱ्या यथार्थ ज्ञानाचें विषयत्व हेंच हेत्वाभासत्व आहे. बाधस्थळीं वन्हि अनुष्ण आहे अशा अनुमितीला प्रतिबंध करणारें जें ज्ञान, म्हणजे वन्हीच्यावर उष्णत्व आहे त्या वन्हीवर अनुष्णत्व साधणारें 'द्रव्यत्व' अशा प्रकारचें ज्ञान, या ज्ञानाचें विषयत्व विषयतासंबंधानें द्रव्यरूपी हेत्वाभासावर असल्यामुळें म्हणजे त्या ज्ञानाचा द्रव्यत्वरूपी हेत्वाभास विषय होत असल्यानें त्याचेवर लक्षण संबद्ध होतें. सद्धेतूवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'यथार्थ' असें म्हटलें आहे. नाहींतर 'पर्वतो वन्हिमान्' अशा अनुमितीला 'पर्वतो वन्ह्यभाववान् धूमश्च' हा समूहालंबन भ्रम सुद्धां प्रतिबंधक होत असल्यानें या भ्रमज्ञानांत धूम हा सद्धेतूही विषय झाल्यानें त्याच्यावर हेत्वाभासाचें लक्षण जातें. तें न जावें यासाठीं 'यथार्थ' असें म्हटलें. धूम यथार्थ ज्ञानांत विषय होत नसल्यानें अतिव्याप्ति नाहीं. घटादिकावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'अनुमिति किंवा तिचें करण ह्यांना प्रतिबंधक अशा यथार्थ ज्ञानाचा विषय' असें म्हटलें आहे. म्हणजे घट जरी केवळ यथार्थ ज्ञानाचा विषय झाला तरी सुद्धां वरील विशेषणांनीं युक्त अशा ज्ञानांत तो विषय होत नसल्यानें त्याचेवर हेत्वाभासाचें लक्षण येत नाहीं. व्यभिचारी हेतूवरील अव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं

मिति व तिचें करण यांतील एकाला प्रतिबंधक ' असें म्हटलें आहे. तें जर म्हटलें नसतें तर व्यभिचार हा अनुमितीला साक्षात् प्रतिबंधक होत नसल्यानें हा हेत्वाभास असून सुद्धां याचेवर हेत्वाभासाचें लक्षण आलें नसतें. म्हणजे अव्याप्तिदोष आला असता. तो न यावा यासाठीं अनुमिति व तिचें करण यांतील एकाला प्रतिबंधक असें म्हटलें आहे. असें म्हटल्यानें व्यभिचार अनुमितीच्या व्याप्तिज्ञानरूपी करणास प्रतिबंध करीत असल्यामुळें त्याचेवर आतां हेत्वाभासाचें लक्षण येतें.

सव्यभिचारोऽनैकान्तिकः । स त्रिविधः । साधारणासाधारणानुपसंहारिभेदात् । तत्र साध्याभाववद्वृत्तिः साधारणोऽनैकान्तिकः । यथा पर्वतो वह्निमान् प्रमेयत्वादिति । प्रमेयत्वस्य वह्न्यभाववति ह्रदे विद्यमानत्वात् ॥

( त० भा० ) यापैकीं जो अनैकान्तिक असतो तो सव्यभिचार होय. तो साधारण, असाधारण व अनुपसंहारी असा तीन प्रकारचा आहे. या तिहींपैकीं साध्याचा अभाव जेथें राहतो तेथें राहणारा जो हेतु तो साधारण अनैकान्तिक होय. उदाहरणार्थ-पर्वत वह्निमान् आहे कारण की त्याजवर प्रमेयत्व आहे. या अनुमानांतील प्रमेयत्व हा हेतु साधारण होय. कारण, त्यातील साध्य वह्नि, त्याचा अभाव ऱ्हदाच्या ठिकाणीं आहे व तेथें प्रमेयत्व हा हेतु आढळतो. कारण, ऱ्हद हा जाणण्याला योग्य म्हणजे प्रमेय आहे.

( प० ) तत्रेति । साधारणादित्रितयमध्य इत्यर्थः । अथ विरुद्धेऽतिप्रसक्तिरिति मा स्म दूष्य· सपक्षवृत्तित्वस्यापि निवेशात् । अथैवमपि स्वरूपासिद्धे दूषणं जागर्तीति मा वह गर्वं पक्षवृत्तित्वस्यापि तथात्वात् ॥

( प० भा० )-' तत्र ' म्हणजे साधारणादि तीनहें तूंमध्यें असा अर्थ. पण विरुद्ध हेतूवर हें लक्षण जातें असें समजून उगीच उच्छृंखल होऊं नको. कारण 'तो हेतु सपक्षवृत्ति असला पाहिजे' असा आम्ही साधारण अनैकान्तिकाच्या लक्षणांत निवेश करणार आहोंत. म्हणजे विरुद्धहेतु जरी साध्याभाव जेथें राहतो तेथें राहणारा असला तरी सपक्षावर रहात नसल्यानें त्याचेवर साधारण अनैकान्तिकाच्या लक्षणाची अतिव्याप्ति जात नाहीं. पण असें जरी केलें तरी स्वरूपासिद्ध या हेत्वाभासावर या साधारणाचें लक्षण जातें म्हणून म्हणशील तर 'तो पक्ष-

वृत्ति असली पाहिजे ' असा आम्ही साधारणाच्या लक्षणांत निवेश करतों. म्हणजे स्वरूपासिद्ध हा जरी साध्याभाववानावर राहणारा असून सपक्षावरही राहणारा आहे तरी सुद्धां तो पक्षावर रहात नसल्यानें त्याचेवर साधारण हेत्वाभासाचें लक्षण जात नाहीं.

**सर्वसपक्षविपक्षव्यावृत्तः पक्षमात्रवृत्तिरसाधारणः। यथा शब्दो नित्यः शब्दत्वादिति। शब्दत्वं सर्वेभ्यो नित्येभ्यो-ऽनित्येभ्यश्च व्यावृत्तं शब्दमात्रवृत्ति॥**

( त०भा० ) सर्व सपक्ष आणि विपक्ष यांपासून व्यावृत्त झालेला व केवळ पक्षावर राहणारा जो हेतु तो असाधारण होय. जसें शब्द नित्य आहे. कारण कीं त्याच्याठिकाणीं शब्दत्व राहतें. याठिकाणीं नित्यत्व हें साध्य आहे. म्हणून सर्व नित्य वस्तु सपक्ष होत व सर्व अनित्य वस्तु विपक्ष होत. आतां शब्दत्व हा हेतु असा आहे कीं, तो नित्य किंवा अनित्य यांपैकीं कोणत्याच वस्तूचे ठिकाणीं रहात नाहीं. तर फक्त शब्दाचे ठिकाणीं मात्र रहातो. म्हणून सर्व सपक्ष आणि विपक्ष यांच्यापासून व्यावृत्त होणारा शब्दत्व हा हेतु असाधारण अनैकान्तिक होय.

( न्या० ) असाधारण इति। सर्वसपक्षव्यावृत्तत्वं निश्चितसाध्यवदवृत्तित्वम्। साध्यवदवृत्तित्वं च साध्यसामानाधिकरण्यम्। हेतौ साध्यासामानाधिकरण्ये निश्चिते साध्यसामानाधिकरण्यरूपव्याप्तिज्ञानप्रतिबन्धः फलम्॥

( न्या० भा० )–सर्व सपक्षव्यावृत्तत्व म्हणजे ज्यावर साध्याचा निश्चय आहे अशा ठिकाणीं न राहणें व साध्यवन्तावर न राहणें म्हणजे साध्यासह एका अधिकरणावर न राहणें. हेतु हा साध्याच्या अधिकरणावर राहत नाहीं असा निश्चय झाला असतां 'साध्याशीं सामानाधिकरण्य' एतद्रूप व्याप्तीचें ज्ञान होऊं शकत नाहीं व्याप्ति-ज्ञानाला प्रतिबंध होणें हेंच या असद्धेतूचें फळ आहे.

( प० ) पक्षमात्रेति। सर्वे ये सपक्षा विपक्षास्तेभ्यो व्यावर्तत इति सपक्ष-विपक्षव्यावृत्तः। केवलव्यतिरेकिवारणाय तद्भिन्न इत्यपि देयम्॥

( प०भा० )–सर्व सपक्ष आणि विपक्ष यांच्यापासून जो परावृत्त तो सपक्षविपक्षव्यावृत्त होय. केवलव्यतिरेकीवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' त्याहून निराळा ' असेंही पद द्यावें. कारण

तो केवलव्यतिरेकी हेतुही सपक्ष व विपक्ष यांच्यापासून व्यावृत्त होतच असतो.

अन्वयव्यतिरेकदृष्टान्तरहितोऽनुपसंहारी । यथा सर्वमनित्यं प्रमेयत्वादिति । अत्र सर्वस्यापि पक्षत्वाद्दृष्टान्तो नास्ति ॥

( त० भा० )–ज्याच्या अन्वयव्याप्तीला आणि व्यतिरेकव्याप्तीला दृष्टान्त सापडत् नाहीं अशा हेतूस अनुपसंहारी हेतु असें म्हणतात. जसें सर्व अनित्य आहे. कारण कीं तें प्रमेय आहे. येथें सर्व म्हणजे यच्चयावत् वस्तु पक्ष झाल्याकारणानें दृष्टान्तच सापडत नाहीं. म्हणून येथील हेतु अनुपसंहारी आहे.

( न्या० ) अनुपसंहारिणं लक्षयति–अन्वयेति । उभयत्र दृष्टान्ताभावादन्वयव्याप्तिज्ञानव्यतिरेकव्याप्तिज्ञानोभयसामग्री नास्तीत्यर्थः । सर्वस्यैव पक्षत्वात्पक्षातिरिक्तायसिद्धेरिति भावः ॥

( न्या० भा० )–' अन्वयव्यतिरेक० ' इत्यादि वाक्यानें अनुपसंहारीचें लक्षण करितात. दोन्ही ठिकाणीं ( दोन्ही व्याप्तींविषयीं ) दृष्टान्त नसल्यामुळें अन्वयव्याप्तिज्ञानाची व व्यतिरेकव्याप्तिज्ञानाची सामग्री नाहीं, असा इत्यर्थ. येथें सर्वच पक्ष झाल्यानें पक्षाहून वेगळ्या वस्तूची प्रसिद्धीच नाहीं म्हणून दृष्टान्त नाहीं. असा भावार्थ.

( प० ) अन्वयेति । केवलान्वयिन्यतिव्याप्तिवारणाय अन्वयेति । केवलव्यतिरेकिण्यतिव्याप्तिवारणाय व्यतिरेकेति । अत्रेति । उपदर्शितानुमान इत्यर्थः ॥

( प० भा० )–केवलान्वयी हेतूवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं अन्वयदृष्टान्तानें रहित असें म्हटलें आहे. केवलान्वयी हेतु व्यतिरेकदृष्टान्तानें जरी रहित असला तरी अन्वयदृष्टान्तानें युक्त असल्यामुळें त्याचेवर आतां अतिव्याप्ति जात नाहीं. अन्वयदृष्टान्तानें जो रहित तो अनुपसंहारी एवढेंच म्हटल्यास केवलव्यतिरेकी हेतूला सुद्धां अन्वयदृष्टान्त नसल्यानें त्याचेवर अनुपसंहारीचें लक्षण जाऊं लागेल. यासाठीं व्यतिरेकदृष्टान्तानें रहित असें म्हटलें आहे. केवलव्यतिरेकी हेतु व्यतिरेकदृष्टान्तानें रहित असा केव्हांही नसतो. त्यामुळें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं ' अत्र ' म्हणजे वर दाखविलेल्या अनुमानामध्यें असा अर्थ आहे.

साध्याभावव्याप्तो हेतुर्विरुद्धः । यथा शब्दो नित्यः कृतकत्वादिति । कृतकत्वं हि नित्यत्वाभावेनानित्यत्वेन व्याप्तम् ॥

( त० भा० )–जो हेतु साध्याभावानें व्याप्त असतो तो विरुद्ध होय. जसें शब्द नित्य आहे. कारण कीं तो कृत्रिम आहे. येथें नित्यत्व हें साध्य आहे व त्याचा अभाव म्हणजे अनित्यत्व यानें कृतकत्व हा हेतु व्याप्त आहे. कारण जेथें जेथें कृतकत्व असतें तेथें तेथें अनित्यत्व असतें असा अनुभव आहे. याच्या उलट जें कृतक असतें तें नित्य असतें असें कोठेंही आढळत नाहीं म्हणून कृतकत्व हा हेतु विरुद्ध आहे.

( न्या० ) विरुद्धं लक्षयति–साध्याभावव्याप्त इति ॥ साध्याभावव्याप्तिः साध्याभावनिरूपितव्यतिरेकव्याप्तिः साध्यव्यापकीभूताभावप्रतियोगित्वम् । तथाच पक्षविशेष्यकसाध्याभावव्याप्यहेतुप्रकारकज्ञानात् पक्षविशेष्यकसाध्यप्रकारकानुमितिप्रतिबन्धः फलम् । एवं सत्प्रतिपक्षेऽपि । विरुद्धसत्प्रतिपक्षयोर्विशेषस्तु विरुद्धहेतोरेकत्वेन सत्प्रतिपक्षहेतोर्द्वित्वेन च ज्ञातव्यः । सत्प्रतिपक्षे द्वौ हेतू विरुद्ध एको हेतुरिति यावत् । साध्याभावसाधकहेतुः साध्यसाधकत्वेनोपन्यस्त इत्यसामर्थ्यसूचनमपि ॥

( न्या० भा० )–' साध्याभावव्याप्त० ' या ग्रंथानें विरुद्धाचें लक्षण सांगतात. साध्याभावाची व्याप्ति म्हणजे साध्याभावानें दाखविलेली व्यतिरेकव्याप्तिच होय. साध्याला व्यापक अशा अभावाचें प्रतियोगित्व ज्याठिकाणीं येतें त्याठिकाणीं साध्याभावाची व्याप्ति आली असें समजावें. वरील उदाहरणांतील कृतकत्व हा हेतु साध्याभाव जें अनित्यत्व त्यानें व्याप्त आहे. त्यामुळें ज्यामध्यें पक्ष विशेष्य आहे, अशा साध्याच्या अभावानें व्याप्त जो हेतु तो ज्यांत विशेषण आहे असें ज्ञान झालें असता, पक्ष हें ज्यांत विशेष्य आहे व साध्य हें ज्यांत विशेषण आहे अशा अनुमितिज्ञानाला प्रतिबंध होणें, हें फल आहे. सत्प्रतिपक्षामध्यें देखील अशीच स्थिति असते. विरुद्ध आणि सत्प्रतिपक्ष यांत विशेष एवढाच आहे कीं, विरुद्ध हेतु एक असतो व सत्प्रतिपक्ष दोन असतात. म्हणजे सत्प्रतिपक्षांत दोन हेतु आणि विरुद्धांत एक हेतु असतो. असा भावार्थ. साध्याच्या अभावाची सिद्धि करणारा हेतु साध्याची सिद्धि करण्यासाठीं म्हणून दिलेला असतो. त्यामुळें त्यात साध्याची सिद्धि करण्याचें सामर्थ्य नसतें हेंही सूचित होतें.

( प० ) विरुद्ध लक्षयति–साध्येति । सद्धेतुवारणाय साध्याभावव्याप्त इति । सत्प्रतिपक्षवारणाय सत्प्रतिपक्षभिन्न इत्यपि बोध्यम् । कृतेति । कार्यत्वादिलर्थः । कृतकत्वमिति । अनित्यत्वेन व्याप्तमिति । यद्यत्कृतकं तत्तदनित्यमिति व्याप्तिर्भवत्येव तथेति भावः ॥

( प० भा० )–' साध्य० ' इत्यादि वाक्यानें विरुद्धाचें लक्षण सांगतात. 'जो हेतु तो विरुद्ध' असें म्हटल्यास सद्धेतूवर या असद्धेतूचें लक्षण जाऊं लागेल. या करितां ' साध्याभावव्याप्त ' असें लक्षणांत त्यास विशेषण दिलें आहे. त्यामुळें सत्-हेतु साध्याभावव्याप्त नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति. जात नाहीं स-प्रतिपक्षावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' सत्प्रतिपक्षभिन्न ' असेंही लक्षणांत म्हणावें म्हणजे सत्प्रतिपक्ष हेतु जरी साध्याभावव्याप्त असला तरी सत्प्रतिपक्षभिन्न नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. कृतकत्व म्हणजे कार्यत्व. जें जें कृतीनें केलेलें तें तें अनित्य अशी व्याप्ति असतेच. म्हणून ' कृतकत्वं हि० ' इत्यादि म्हटलें आहे.

साध्याभावसाधकं हेत्वन्तरं यस्यविद्यते स सत्प्रतिपक्षः यथा शब्दो नित्यः श्रावणत्वाच्छब्दत्ववत्। शब्दोऽनित्य कार्यत्वाद्घटवत् ॥

( त० भा० )–ज्या हेतूच्या साध्याचा अभाव सिद्ध करणारा, दुसरा हेतु असतो तो सत्प्रतिपक्ष होय. जसें शब्द नित्य आहे. कारण कीं, तो श्रावण म्हणजे श्रवणेंद्रियानें ग्रहण करण्यास योग्य आहे. जसें शब्दत्व आणि शब्द अनित्य आहे. कारण कीं तो कार्य म्हणजे उत्पन्न झालेला कृतक आहे. जसा घट. ( उत्पन्न झाल्यामुळें अनित्य आहे ). या दोन अनुमानापैकीं पहिल्या अनुमानांत श्रावणत्व हा हेतु नित्यत्व हें साध्य सिद्ध करीत आहे; परंतु दुसऱ्या अनुमानांतील नित्यत्व या साध्याचा अभाव म्हणजे अनित्यत्व सिद्ध करून देणारा कार्यत्व हा हेतु वर दिलेल्या अनुमानांत आढळून येतो. म्हणून हा श्रावणत्व हा सत्प्रतिपक्ष हेतु झाला.

( प० ) सत्प्रतिपक्षं लक्षयति–साध्येति । यस्य हेतोः साध्याभावसाधकं साध्याभावस्यानुमापकं हेत्वन्तरं प्रतिपक्षो हेतुःविद्यते स हेतुः सत्प्रतिपक्ष इत्यर्थः । अयमेव प्रकरणसम इत्युच्यते । विरुद्धवारणाय हेत्वन्तरं यस्येति । वह्न्यादिवारणाय साध्याभावेति ॥

( प०भा० )–' साध्याभाव० ' इत्यादि वाक्यानें सत्प्रतिपक्षाचें लक्षण करितात. ज्या हेतूच्या साध्याच्या अभावाला साधणारा म्हणजे साध्याभावाचें अनुमितिज्ञान करून देणारा असा वेगळा हेतु असतो, तो सत्प्रतिपक्ष हेतु होय. ह्यालाच 'प्रकरणसम' असें म्हणतात. विरुद्ध हेतूवर सत्प्रतिपक्षाचें लक्षण जाऊं नये म्हणून ' ज्याला दुसरा हेतु असतो ' असें म्हटलें आहे. नाहीतर विरुद्ध सुद्धां साध्याच्या अभावाला साधणारा असतोच. वन्हि वगैरे पदार्थांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' साध्याभाव ' असें म्हटलें आहे.

असिद्धस्त्रिविधः । आश्रयासिद्धः स्वरूपासिद्धो व्याप्यत्वासिद्धश्चेति ॥

( व० भा० )–असिद्ध तीन प्रकारचा आहे. आश्रयासिद्ध, स्वरूपासिद्ध, आणि व्याप्यत्वासिद्ध.

( प० ) असिद्धं विभजते–असिद्ध इति । आश्रयासिद्धाद्यन्यतमत्वमसिद्धत्वम् ॥

( प० भा० )–' असिद्ध० ' इत्यादिवाक्यानें असिद्धाचा विभाग करतात. जो आश्रयासिद्धादिकांपैकीं कोणता तरी एक तो असिद्ध होय.

आश्रयासिद्धो यथा । गगनारविन्दं सुरभि, अरविन्दत्वात् । सरोजारविन्दवत् । अत्र गगनारविन्दमाश्रयः स च नास्त्येव ॥

( त० भा० )–त्यापैकीं आश्रयासिद्धाचें उदाहरण येणेंप्रमाणें–आकाशांतील कमळ सुरभि ( सुगंधि ) आहे. कारण कीं त्याच्यावर कमलत्व–अरविंदत्व हा धर्म राहतो. जेथें अरविंदत्व असतें तेथें सुरभित्व असतें. जसें–सरोवरांत उत्पन्न झालेल्या सर्व अरविंदांच्या ठिकाणीं सुरभित्व असतें. याठिकाणीं गगनारविंद–आकाशांतील कमळ हा आश्रय आहे व त्यावर सुरभित्व रहातें, असें सिद्ध करावयाचें आहे. परंतु तो आश्रयच मुळीं अस्तित्वांत नाहीं. कारण कमळ जरी प्रसिद्ध असलें तरी आकाशांतील कमळ प्रसिद्ध नाहीं. म्हणून गगनारविंद हा आश्रयच नाहीं. यास्तव येथें आश्रयासिद्ध हेत्वाभास आहे असें जाणावें.

( न्यां० ) आश्रयासिद्ध इति। आश्रयासिद्धिर्नाम पक्षतावच्छेदकविशिष्टपक्षाप्रसिद्धिः । यथेति । अत्रारविन्दे गगनीयत्वाभावे निश्चिते गगनीयत्वविशिष्टारविन्दे सौरभ्यानुमितिप्रतिबन्धः फलम् ॥

( न्या० भा० )–आश्रयाची असिद्धि म्हणजे पक्षतावच्छेदकानें युक्त अशा पक्षाची प्रसिद्धि नसणें. या उदाहरणातील अरविंदावर गगनीयत्वाचा अभाव आहे असें निश्चित कळल्यावर गगनीयत्वानें विशिष्ट अशा अरविंदावर जी सुगंधाची अनुमिति होणार तिचा प्रतिबंध होतो. म्हणजे ती होऊं शकत नाहीं. हें आश्रयासिद्ध हेत्वाभासाचें फळ आहे.

( प० ) आश्रयासिद्धत्वं च पक्षतावच्छेदकाभाववत्पक्षकत्वम् । भवति हि अरविन्दत्वे गगनीयत्वरूपपक्षतावच्छेदकाभाववत्पक्षकत्वम्, अरविन्दरूपपक्षे गगनीयत्वविरहात् । ननु किमरविन्दे गगनीयत्वविरहोऽत आह–अत्रेति । उपदर्शितानुमान इत्यर्थः ॥

( प० भा० )–आश्रयासिद्ध म्हणजे पक्षतावच्छेदकाचा अभाव ज्या पक्षावर आहे असा पक्ष असणें. येथील अरविंदत्व या हेतूचा पक्ष, *गगनीयत्वरूप* पक्षतावच्छेदकाच्या अभावानें विशिष्ट आहे. कारण अरविंदरूपी पक्षावर गगनीयत्वरूपी पक्षतावच्छेदकाचा अभाव आहे. अहो अरविंदावर गगनीयत्व कां नाहीं ? याचें उत्तर ' अत्र ' यानें दिलें आहे. अत्र म्हणजे वर दाखविलेल्या अनुमानात असा अर्थ.

स्वरूपासिद्धो यथा । शब्दो गुणश्चाक्षुषत्वात्, रूपवत् ।
अत्र चाक्षुषत्वं शब्दे नास्ति शब्दस्य श्रावणत्वात् ॥

( त० भा० )–स्वरूपासिद्धाचें उदाहरण–शब्द गुण आहे. कारण, तो चक्षुरिंद्रियानें समजण्यास योग्य आहे. म्हणून रूपाप्रमाणें याठिकाणीं शब्दावर चाक्षुषत्व नाहीं. कारण, शब्दगुण श्रोत्रेंद्रियानें ग्राह्य आहे. तेव्हां शब्द या पक्षाचे ठिकाणीं चाक्षुष व या हेतूचा स्वरूपतःच अभाव आहे.

( न्या० ) स्वरूपासिद्ध इति। स्वरूपासिद्धिर्नाम पक्षे हेत्वभावः । तथाच हेत्वभावविशिष्टपक्षज्ञानात्पक्षविशेष्यकहेतुप्रकारकज्ञानरूपपरामर्शप्रतिबन्धः फलम् ॥

( न्या० भा० )–' स्वरूपासिद्धि' म्हणजे पक्षावर हेतूचा अभाव

असणें' अर्थात् हेतूच्या अभावानें विशिष्ट असा पक्षाच्या ज्ञानानें, पक्ष हें ज्यांत विशेष्य आहे व हेतु हें ज्यांत विशेषण आहे असा परामर्श होत नाहीं. यास्तव परामर्शाचा प्रतिबंध करणें हें स्वरूपासिद्धाचें फळ आहे.

( ५० ) पक्षे हेत्वभावः स्वरूपासिद्धिः । सद्धेत्वभावेऽतिव्याप्तिवारणाय पक्षे इति । घटाद्यभाववारणाय हेत्विति । सोऽयं स्वरूपासिद्धः शुद्धासिद्धभागासिद्धविशेषणासिद्धविशेष्यासिद्धभेदेन चतुर्विधः । तत्राद्यस्तूपदर्शित एव । द्वितीयो यथा–उद्भूतरूपादिचतुष्टयं गुणः, रूपत्वादित्यत्र रूपत्वहेतोः पक्षैकदेशाऽवृत्तित्वेन तस्य भागे स्वरूपासिद्धत्वम् । तृतीयो यथा–वायुः प्रत्यक्षः, रूपवत्त्वे सति स्पर्शवत्त्वादित्यत्र रूपवत्त्वविशेषणस्य वायावृत्तेस्तद्विशिष्टस्पर्शवत्त्वस्यापि तथात्वेन तस्य स्वरूपासिद्धत्वं निर्वहति विशेषणाभावे विशिष्टस्याप्यभावात् । तुरीयो यथा–अत्रैव विशेषणविशेष्यवैपरीत्येन हेतुः । तस्य स्वरूपासिद्धत्वं तु विशेष्याभावप्रयुक्तविशिष्टाभावादिति बोध्यम् ॥

( प० भा० )–पक्षावर हेतूचा अभाव असणें, याला स्वरूपसिद्धि ह्मणतात. सद्धेतूच्या अभावावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्याकरितां ' पक्षावर ' असें म्हटलें आहे ह्मणजे सद्धेतूचा अभाव हा पक्षावर रहात नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. पण पक्षावरील अभावास स्वरूपासिद्ध असें म्हटल्यास पक्षावर घटादिकांचाही अभाव असल्यानें त्यांचेवर स्वरूपासिद्ध लक्षणाची अतिव्याप्ति जाते. याकरितां 'हेतु' असें म्हटलें आहे. त्यामुळें घटादि हेतु नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. हा स्वरूपासिद्ध हेत्वाभास शुद्धासिद्ध, भागासिद्ध, विशेषणासिद्ध आणि विशेष्यासिद्ध असा चार प्रकारचा आहे. त्यापैकीं पहिला स्वरूपासिद्ध दाखविलाच आहे. दुसरा असा उद्भूतरूपादिचतुष्टय म्हणजे रूप, रस, गंध, व स्पर्श हे चार गुण आहेत. कारण यांचेवर रूपत्व आहे ह्मणून याठिकाणीं रूपत्व हा हेतु पक्षाचा एक देश ह्मणजे रस, गंध इत्यादिकांवर रहात नसल्यानें तो एका भागावर स्वरूपासिद्ध होतो. ह्मणून हा रूपत्वहेतु भागासिद्ध होय. तिसरा असा कीं–वायु हा प्रत्यक्ष आहे. कारण त्यावर रूप असून स्पर्श आहे. या ठिकाणीं रूप हें विशेषण वायूवर रहात नसल्यामुळें त्या विशेषणानें युक्त असा स्पर्शही रहात नाहीं. ह्मणून, या हेतुला स्वरूपासिद्ध म्हणतां येतें. विशेषणाचा अभाव

असतां त्या विशेषणानें जें विशिष्ट त्याचाही अभाव असतो. चवथा विशेष्यासिद्ध असा–वरील उदाहरणांतील विशेषणाला विशेष्य व विशेष्याला विशेषण केल्यानें तो हेत्वाभास होतो. जसें–वायु प्रत्यक्ष आहे, कारण त्यावर स्पर्श असून रूप आहे. याठिकाणीं स्पर्श हें विशेषण जरी वायुवर असलें तरी रूप हें विशेष्य नसल्यानें विशेष्याभावामुळें विशिष्टाचा अभाव होतो. म्हणून हा स्वरूपासिद्ध हेत्वाभास आहे.

सोपाधिको हेतुर्व्याप्यत्वासिद्धः। साध्यव्यापकत्वे सति साधनाव्यापकत्वमुपाधिः। साध्यसमानाधिकरणात्यन्ताभावाप्रतियोगित्वं साध्यव्यापकत्वम्। साधनवन्निष्ठात्यन्ताभावप्रतियोगित्वं साधनाव्यापकत्वम्। पर्वतो धूमवान् वह्निमत्वादित्यत्रार्द्रेन्धनसंयोग उपाधिः। यत्र धूमस्तत्रार्द्रेन्धनसंयोग इति साध्यव्यापकता। यत्र वह्निस्तत्रार्द्रेन्धनसंयोगो नास्ति अयोगोलके आर्द्रेन्धनसंयोगाभावादिति साधनाव्यापकता। एवं साध्यव्यापकत्वे सति साधनाव्यापकत्वादार्द्रेन्धनसंयोग उपाधिः। सोपाधिकत्वाद्वह्निमत्वं व्याप्यत्वासिद्धम्॥

(त० भा०)–जो सोपाधिक असतो तो व्याप्यत्वासिद्ध–साध्यव्यापकत्व असून साधनाव्यापकत्व हें उपाधीचें लक्षण आहे. साध्यव्यापकत्व म्हणजे 'साध्यसमानाधिकरणात्यन्ताभावाप्रतियोगित्व' होय. व साधनाव्यापकत्व म्हणजे 'साधनवन्निष्ठात्यन्ताभावप्रतियोगित्व' होय. पर्वत धूमवान् आहे, कारण, तो वह्निमान् आहे येथें आर्द्रेंधनसंयोग हा उपाधि आहे. जेथें धूम असतो तेथें आर्द्रेंधनसंयोग असतो. म्हणून तो साध्यव्यापक आहे. व जेथें वह्नि असतो, तेथें आर्द्रेंधनसंयोग नसतो. कारण तापलेल्या लोखंडाच्या गोळ्यांत वह्नि असतो. परंतु आर्द्रेंधनसंयोग नसतो. म्हणून आर्द्रेंधनसंयोगाला साधनाव्यापकता आहे. या रीतीनें आर्द्रेंधनसंयोग साधनाव्यापक असून साध्यव्यापक असल्यामुळें उपाधि आहे आणि सोपाधिकत्वामुळें वह्निमत्त्व हा हेतु व्याप्यत्वासिद्ध आहे.

(न्या०) व्याप्यत्वासिद्ध इति। प्रकृते धूमव्यापकत्वमार्द्रेन्धनसंयोगे गृहीत्वं चेद्वह्नौ आर्द्रेन्धनसंयोगव्याप्यत्वं गृहीतम्। एवं वह्नेरव्यापकत्वमार्द्रेन्धनसंयोगे

गृहीतं चेद्वह्नौ तद्व्याप्यत्वं गृहीतम् । तदेव व्यभिचरितत्वम् । तथा चोपाधिव्यभिचरितत्वं साधने गृहीतं चेदुपाधिभूतार्द्रेन्धनसंयोगव्याप्यधूमव्यभिचारित्वं गृहीतमेव । अनुमानप्रकारश्च पूर्वानुमानहेतुं पक्षीकृत्य वह्निर्धूमव्यभिचारी धूमव्यापकार्द्रेन्धनसंयोगव्यभिचारित्वात् घटत्वादिवत् । यो यत्साध्यव्यापकव्यभिचारी स सर्वोऽपि साध्यव्यभिचारीति । एवंप्रकारेण प्रकृतानुमानहेतुभूते पक्षे साध्यव्यभिचारोत्थापकतया दूषकत्वमुपाधेः फलम् । तथा च धूमाभाववद्वृत्तित्वरूपधूमव्यभिचारे गृहीते वह्नौ धूमाभाववदवृत्तित्वरूपव्याप्तिज्ञानप्रतिबन्धः फलम् ॥

( न्या० भा० )—या प्रकृतस्थलीं आर्द्रेधनसंयोग हा धूमाचा व्यापक आहे असें समजल्यास धूमावर आर्द्रेधनसंयोगाचें व्याप्यत्व आहे असें ज्ञान होतें. अशाच रीतीनें आर्द्रेधनसंयोग हा वन्हीचा व्यापक नाहीं असें समजल्यास वन्हि हाही त्याचा व्याप्य नाहीं असें समजतें; यालाच व्यभिचार असें ह्मणतात. तेंव्हां साधन हें उपाधीशीं व्यभिचरित होणारें आहे असें समजलें असतां उपाधिरूप जो आर्द्रेधनसंयोग त्याचा व्याप्य जो धूम याचेंही व्यभिचारित्व अग्निरूपी साधनावर ज्ञात होतें. अनुमानाचा प्रकार असा, पूर्वीच्या अनुमानांतील हेतु जो अग्नि त्याला पक्ष करून असें अनुमान मांडावें. वन्हि हा धूमाशीं व्यभिचारी आहे. कारण धूमाचा व्यापक जो आर्द्रेधनसंयोग याच्याशीं तो व्यभिचारी आहे ह्मणून, घटत्वादिकाप्रमाणें. जो ज्या साध्याच्या व्यापकाचा व्यभिचारी असतो तो सर्वही साध्याशीं व्यभिचारी असतो. अशा रीतीनें प्रकृत अनुमानांत हेतुभूत जो पक्ष याच्यावर साध्याचा व्यभिचार आहे असें उत्थापित करून हेतूला दूषित करणें हें उपाधीचें फल आहे. तात्पर्य, धूमाभाव ज्या ठिकाणीं आहे त्याठिकाणीं असणें अशा रूपाचा धूमाचा व्यभिचार अग्नीवर आहे, असें समजलें असतां धूमाभाव जेथें आहे तेथें नसणें या रूपाची जी व्याप्ति या व्याप्तिज्ञानाला प्रतिबंध होणें हें याचें फल आहे.

( प० ) व्याप्यत्वासिद्धं निरूपयति—सोपाधिक इति । ननु कोऽयमुपाधिरत आह—साध्येति । साधनाव्यापक उपाधिरित्युक्ते शब्दोऽनित्यः कृतकत्वादित्यत्र सामान्यवत्त्वे सत्यस्मदादिबाह्येन्द्रियग्रहणार्हत्वमप्युपाधिः स्यात्तदर्थं साध्यव्यापकत्वमुक्तम् । तावत्युक्ते सामान्यवत्त्वादिनाऽनित्यत्वसाधने कृतकत्वमुपाधिः स्यात्तदर्थं साधनाव्यापकत्वमुक्तम् । उपाधिभेदमादायासंभववारणाय व्यापकत्व-

शरीरेऽप्यत्यन्तपदमादेयम् । साधनभेदमादाय साधनस्योपाधित्ववारणायाव्यापकशरीरेऽप्यत्यन्तपदमावश्यकं देयम् । सोऽयमुपाधिस्त्रिविधः–केवलसाध्यव्यापकः पक्षधर्मावच्छिन्नसाध्यव्यापकः साधनावच्छिन्नसाध्यव्यापकश्चेति । तत्राद्य उपदर्शितः । एवं क्रत्वन्तर्वर्तिनी हिंसा अधर्मजनिका हिंसात्वात्, क्रतुबाह्यहिंसावदित्यत्र निषिद्धत्वमुपाधिः । तस्य यत्राधर्मजनकत्वं तत्र निषिद्धत्वमिति साध्यव्यापकता । यत्र हिंसात्वं तत्र न निषिद्धत्वमिति निषिद्धत्वमुपाधिः साधनाव्यापकः । क्रतुहिंसाया निषिद्धत्वस्याभावात् । ' न हिंस्यात्सर्वा भूतानि ' इति सामान्यवाक्यतः ' पशुना यजेत ' इत्यादिविशेषवाक्यस्य बलीयस्त्वात् । अतो हिंसात्वं नाधर्मजनकत्वे प्रयोजकमपि तु निषिद्धत्वमेवेत्यादिकमपि द्रष्टव्यम् । द्वितीयो यथा–वायुः प्रत्यक्षः प्रत्यक्षस्पर्शाश्रयत्वादित्यत्रोद्भूतरूपवत्त्वमुपाधिः । तस्य यत्र प्रत्यक्षत्वं तत्रोद्भूतरूपवत्त्वमिति न केवलसाध्यव्यापकत्वं रूपे व्यभिचारात् । किंतु द्रव्यत्वलक्षणो यः पक्षधर्मस्तदवच्छिन्नं यद्द्रव्यप्रत्यक्षत्वं यत्र तत्रोद्भूतरूपवत्त्वमिति पक्षधर्मावच्छिन्नसाध्यव्यापकत्वमेव । आत्मनि व्यभिचारवारणाय बहिःपदम् । यत्र प्रत्यक्षस्पर्शाश्रयत्वं तत्र नोद्भूतरूपवत्त्वमिति साधनाव्यापकत्वं च वायावुद्भूतरूपविरहात् । तृतीयो यथा–प्रागभावो विनाशी जन्यत्वादित्यत्र भावत्वमुपाधिः । तस्य यत्र विनाशित्वं तत्र भावत्वमिति न केवलसाध्यव्यापकत्वं प्रागभावे भावत्वविरहात् । किं तु जन्यत्वरूपसाधनावच्छिन्नविनाशित्वं यत्र तत्र भावत्वमिति साधनावच्छिन्नसाध्यव्यापकत्वमेव । यत्र जन्यत्वं तत्र न भावत्वमिति साधनाव्यापकत्वं च ध्वंसे भावत्वविरहात् । एवं स श्यामो मित्रातनयत्वादित्यत्र शाकपाकजन्यत्वमुपाधिः । श्यामत्वस्य नीलघटेऽपि सत्त्वान्न केवलसाध्यव्यापकत्वं किं तु साधनावच्छिन्नसाध्यव्यापकत्वमेव । अष्टमे पुत्रे शाकपाकजन्यत्वविरहेण साधनाव्यापकत्वं चेत्यादिकमपि द्रष्टव्यम् ॥

( प० भा० )–' सोपाधिक० ' इत्यादि वाक्यानें व्याप्यत्वासिद्धाचें निरूपण करितात. अहो पण, हा उपाधि कोणता ! ( याचें स्वरूप काय ) याचें उत्तर ' साध्य० ' यानें दिलें आहे ' जो साधनाला अव्यापक ' तो उपाधि असें म्हटल्यास ' शब्द नित्य आहे. कारण त्याच्यावर कृतकत्व आहे ' या अनुमानांत ' सामान्यवत्त्व असून आमच्यासारख्यांच्या बाह्येंद्रियांनी ग्रहण होण्यास योग्य असणें ' ही उपाधि होऊं लागेल. याकरितां ' साध्यव्यापक ' असें म्हटलें आहे. त्यामुळें 'नित्य' या साध्याचें 'कृतकत्व' हें व्यापक नसल्यानें ती उपाधि होत नाहीं. आतां ' जो साध्याचा व्यापक तो उपाधि' असें म्हटल्यास सामान्यवत्त्वादिकांच्या योगानें अनित्यत्व सिद्ध करावयाचें असतां कृतकत्व ही उपाधि होऊं लागेल. या-

करण्यासाठी ' बाह्य ' असें पद घातलें आहे. हें घातलें नसतें तर द्रव्यत्वरूपी पक्षधर्मानें अवच्छिन्न जो आत्मा त्याचें प्रत्यक्ष मात्र होतें, पण याचेवर उद्भूतरूप नाहीं असा व्यभिचार आला असता. पण 'बाह्य' असें पद घातल्यानें आत्म्याचें प्रत्यक्ष आंतर आहे बाह्य नाहीं म्हणून अतिव्याप्ति नाहीं. जो प्रत्यक्षस्पर्शाला आश्रय होतो तो उद्भूतरूपवान् नसतो आणि अशारीतीनें उद्भूतरूप हें साधनाला अव्यापक होतें. कारण वायूवर प्रत्यक्षस्पर्श असून उद्भूतरूप नाहीं. तिसरा प्रकार असा—'प्रागभाव विनाशी आहे, कारण याच्यावर जन्यत्व आहे म्हणून.' येथें भावत्व ही उपाधि आहे. 'ज्याठिकाणीं नाशवंतपणा असतो त्याठिकाणीं भावत्व असतें' असें त्याला केवळ साध्यव्यापकत्व नाहीं कारण, प्रागभावावर विनाशित्व मात्र आहे. परंतु भावत्व नाहीं. तर जन्यत्वरूपी साधनानें अवच्छिन्न असा विनाशीपणा ज्याठिकाणीं असतो तेथें भावत्व असतें. अशा रीतीनें साधनावच्छिन्नसाध्यव्यापकत्वच आहे. 'ज्याठिकाणीं जन्यत्व असतें तेथें भावत्व नसतें असें' साधनाव्यापकत्व ध्वंसामध्यें आहे. कारण, ध्वंस हा जन्य असून त्याला भावत्व नाहीं. याच न्यायानें तो काळा आहे, कारण कीं तो मित्रानामक स्त्रीचा मुलगा आहे. याठिकाणीं भाजीपाला फार खाल्ल्यामुळें त्याच्या पाकापासून होणें ही उपाधि आहे. काळ्या घटावर देखील काळेपणा आहे परंतु तो शाकपाकजन्य नाहीं म्हणून हा उपाधि केवळसाध्यव्यापक नाहीं. तर साधनानें अवच्छिन्न जें साध्य त्याचा व्यापक आहे. जो मित्रेचा मुलगा असून श्याम आहे तो शाकपाकापासून उत्पन्न झाला आहे. अशा रीतीनें शाकपाकजन्यत्व ही उपाधि साधनानें अवच्छिन्न साध्याला व्यापक होते. पण आठवा मुलगा हा शाकपाकापासून उत्पन्न झालेला नसल्यामुळें म्हणजे त्याच्यावर मित्रातनयत्वरूपी साधन असतां शाकपाकजन्यत्वरूपी उपाधि नसल्यानें हा साधनाला अव्यापक होतो. आठव्या मुलाच्या वेळेला त्या बाईनें भाजी वगैरे बिलकूल खाल्लेली नव्हती. त्यामुळें तो काळा झाला नाहीं. अशा रीतीनें शाकपाकजन्यत्व हा उपाधि साधनाला अव्यापक होतो. ['जो साधनाला अव्यापक तो उपाधि' असें म्हटल्यास ' शब्द हा अनित्य आहे, कारण त्याच्यावर कृतकत्व आहे.' हें अनुमान वस्तुतः

योग्य असतांनाही या अनुमानांत सामान्यवत्त्व असून अस्मदादिबाह्येंद्रियग्रहणार्हत्व हा उपाधि होऊं लागेल. कारण, जेथें म्हणजे धर्म किंवा गुरुत्व या गुणावर कृतकत्व हा हेतु आहे परंतु सामान्यवत्व असून अस्मदादिबाह्येंद्रियग्रहणार्हत्व नाहीं. ( कारण ते गुण अतींद्रिय आहेत) तेथें हा उपाधि साधनास अव्यापक होतो. तो न व्हावा यासाठीं 'साध्याला व्यापक' असें म्हणावें. म्हणजे साध्य जें अनित्यत्व तें जेथें म्हणजे प्रागभाव किंवा गुरुत्व यांवर आहे. पण सामान्यवत्त्व असून अस्मादादिबाह्येंद्रियग्रहणार्हत्व नाहीं म्हणून तेथें तो साध्याला व्यापक नाहीं म्हणून तो उपाधिही होत नाहीं. आतां ' जो साध्याला व्यापक तो उपाधि' असें म्हटल्यास शब्दावर सामान्यवत्त्व हा हेतु ठेवून अनित्यत्व साध्य केल्यास येथेंही कृतकत्व हा उपाधि होऊं लागेल. कारण, हें कृतकत्वही साध्याला व्यापक होतें. तें असें कीं, ज्या ज्या ठिकाणीं अनित्यत्व आहे त्या त्या ठिकाणीं कृतकत्वही आहेच. जसें, घटावर अनित्यत्वही आहे व कृतकत्वही आहे. तेव्हां हा उपाधि न व्हावा म्हणून साधनाला अव्यापक म्हणावें म्हणजे कृतकत्व हें साधनाला होत नसल्यानें तें उपाधि होणार नाहीं. कारण, घटावर सामान्यवत्त्व हें साधन आहे व कृतकत्वही आहे. म्हणून हें साधनाला अव्यापक न होतां व्यापकच होतें म्हणून त्याला उपाधि म्हणतां येत नाहीं. आतां उपाधीचा भेद म्हणजे अन्योन्याभाव घेऊन असंभव दोष येतो. त्याचें निवारण करण्यासाठीं व्यापकाच्या शरीरांत (लक्षणांत) अत्यन्त हें पद घावें. असंभव दोष कसा येतो तें पहा— कोणताही उपाधि साध्याला व्यापक होत नाहीं. तो असा कीं–धूमरूपी साध्याच्या पर्वतरूपी अधिकरणावर राहणारा जो अभाव, म्हणजे आर्द्रेंधनसंयोगरूपी उपाधीचा अन्योन्याभाव, ( पर्वत हा आर्द्रेंधनसंयोग नव्हे असा अन्यांन्योभाव ) या अभावाचा प्रतियोगीच आर्द्रेंधनसंयोगरूपी उपाधि होत असल्यामुळें तो अप्रतियोगी होत नाहीं, म्हणून तो वर सांगितलेल्या लक्षणाप्रमाणें साध्याला व्यापकही नव्हे. तेव्हां असा असंभव न यावा यासाठीं व्यापकाच्या शरीरांत अत्यन्त हें पद घावें—म्हणजे साध्याधिकरण पर्वतावर आर्द्रेंधनसंयोगाचा अत्यन्ताभाव नसल्यानें व दुसऱ्या घटादिकांचा अत्यन्ताभाव असल्यानें

त्या अभावाचे प्रतियोगी घटादि होतात व अप्रतियोगी आर्द्रेंधनसंयोग होतो. म्हणून तो साध्याला व्यापक होऊं शकेल, यासाठींच व्यापकाच्या लक्षणांत 'अत्यन्त' हें पद पाहिजे आहे अन्योन्याभाव घेतल्यास आर्द्रेंधनसंयोग त्याचा प्रतियोगीच होईल. अप्रतियोगी होणार नाहीं. म्हणून, तो साध्यव्यापक होणार नाहीं. पण तो साध्यव्यापक व्हावा म्हणून 'अत्यन्त' पद द्यावें. असेंच हेतूचा भेद (अन्योन्याभाव) घेऊन तो हेतूचा उपाधि होऊं लागेल तो उपाधि न व्हावा यासाठीं अव्यापकाच्या शरीरात सुद्धां 'अत्यन्त' हें पद अवश्य दिलें पाहिजे. नाहीतर असें समजा कीं 'पर्वतो वन्हिमान् धूमात्' या ठिकाणीं धूमही साधनाला अव्यापक होत असल्यानें त्याचेवर (साध्याला व्यापक असून साधनाला अव्यापक) हें उपाधीचें लक्षण जातें. साधनाला अव्यापक म्हणजे साधन ज्या ठिकाणीं आहे त्याठिकाणीं असणाऱ्या अभावाचें (अन्योन्याभावाचें) प्रतियोगित्व होय. आतां, साधन म्हणजे धूम, हा पर्वतावर आहे. तेव्हां त्यावर असणारा अभाव म्हणजे धूमाचा अन्योन्याभाव येथें आम्ही मुद्दाम घेतों. म्हणजे 'पर्वत धूम नव्हे' हा होय. या अभावाचा प्रतियोगीच धूम आहे म्हणून तो साधनाला अव्यापक म्हणतां येईल. तेव्हां हा धूम हेतु उपाधि होऊं नये. म्हणून अव्यापकाच्या शरीरातही 'अत्यन्त' हें पद घाला म्हणजे साधनवान् पर्वत होय व त्यावर असणाऱ्या अत्यन्ताभावाचे (घटादिकाच्या अत्यन्ताभावाचे) प्रतियोगी घट पटादि होत. त्यामुळें धूम त्याचा प्रतियोगी होत नाहीं. कारण धूमाचा तेथें अत्यन्ताभावच नाहीं म्हणून तो प्रतियोगी होत नाहीं. त्यामुळें उपाधिही होत नाहीं.)

यस्य साध्याभावः प्रमाणान्तरेण निश्चितः स बाधितः।
यथा वह्निरनुष्णो द्रव्यत्वादिति। अत्रानुष्णत्वं साध्यं
तदभाव उष्णत्वं स्पार्शनप्रत्यक्षेण गृह्यते इति बाधितत्वम्॥

(त० भा०)—ज्याच्या साध्याचा अभाव दुसऱ्या प्रमाणांनीं निश्चित झालेला असतो तो बाधित होय. उदाहरणार्थ— वन्हि

१ बाध हा दोष सर्वांनीं नित्य मानिला आहे. हा अनित्य नव्हे. अनित्य दोष म्हणजे सविषयक ज्ञान झालें असतां दोष असतो व नें झालें नसतां तो दोष नसतो. असा अनित्य दोषाचा प्रकार आहे.

अनुष्ण आहे. कारण तो द्रव्य आहे. याठिकाणीं अनुष्णत्व हें साध्य आहे व त्याचा अभाव म्हणजे उष्णत्व हें वन्हीच्या ठिकाणीं आहे ह्याचें ज्ञान स्पर्शजन्यप्रत्यक्षानें आपल्याला होतें. म्हणून द्रव्यत्व हा हेतु बाधित आहे.

( न्या० ) यस्येति । यस्य हेतोः साध्यस्याभावः साध्याभावः । स च प्रमाणान्तरेण प्रत्यक्षप्रमाणेन निश्चितः स बाधित इत्यर्थः । तथा च मात्पक्षिक-साध्यबाधनिश्चये जाते साध्यानुमितिप्रतिबन्धः फलम् । बाधितसाध्यकत्वाद्बाधितहेतुरित्युच्यते ॥ इति न्यायबोधिन्यामनुमानपरिच्छेदः ॥

( न्या० भा० )–' यस्य ' म्हणजे ज्या हेतूचा, साध्याचा जो अभाव तो साध्याभाव. जो दुसऱ्या प्रत्यक्षप्रमाणानें निश्चित झालेला असतो तो बाधित होय. तात्पर्य, प्रत्यक्षानें साध्याच्या बाधाचा निश्चय झाला असतां साध्याविषयींची अनुमिति न होणें हें या हेत्वाभासाचें फळ आहे. साध्य बाधित झाल्यामुळें त्याच्या हेतूला बाधित म्हणतात. येथें न्यायबोधिनीचा अनुमानपरिच्छेद संपला.

( प० ) यस्येति। सद्धेतुवारणाय प्रमाणान्तरेणेति। घटादिवारणाय साध्येति॥ इति पदकृत्यकेऽनुमानखण्डः ॥

( प० भा० )–सद्धेतूवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं मूळग्रंथांत ' दुसऱ्या प्रमाणानें ' असें म्हटलें आहे. व घटादिकावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' साध्याचा अभाव ' असें म्हटलें आहे. तसें म्हटलें नसतें तर ज्या घटाचा अभाव प्रत्यक्षप्रमाणानें एखाद्या ठिकाणीं निश्चित झाला तो म्हणजे घट बाधित म्हणावा लागेल. म्हणजे बाधित हेत्वाभासाचें लक्षण त्या घटावर जाऊं लागेल. यासाठीं ' साध्य ' असें म्हटलें आहे. येथें पदकृत्यटीकेंतील अनुमानखंड संपले.

उपमितिकरणमुपमानम् । संज्ञासंज्ञिसंबन्धज्ञानमुपमितिः । तत्करणं सादृश्यज्ञानम् । तथाहि कश्चिद्गवयपदार्थमजानन्कुतश्चिदारण्यकपुरुषाद्गोसदृशो गवय इति श्रुत्वा वनं गतो वाक्यार्थं स्मरन्गोसदृशं पिण्डं पश्यति । तदनन्तरमसौ गवयशब्दवाच्य इत्युपमितिरुत्पद्यते ॥

( त० भा० )–उपमितीचें जें करण तें उपमान होय. संज्ञा आणि संज्ञी यांच्यामधील संबंधाचें जें ज्ञान तें उपमितिज्ञान होय.

त्या उपमितिज्ञानाचें करण सादृश्यज्ञान आहे. आणि अतिदेश-वाक्याच्या अर्थाचें स्मरण होणें हा अवान्तर व्यापार आहे. उदाहरणार्थ 'गवय' या शब्दाचा अर्थ काय आहे हें ज्याला माहीत नाहीं असा कोणी एक मनुष्य आपण घेऊं. अरण्यांत रहाणाऱ्या कोणा एका पुरुषाच्या तोंडून 'गवय गोसदृश-गाईसारखा असतो' असें ऐकून तो रानांत जातो तेथें गाईसारखा प्राणी त्याच्या नजरेस पडतो. त्याबरोबर 'गवय गोसदृश असतो' या वाक्यांतील अर्थाचें त्याला स्मरण होतें. त्यानंतर 'गवयशब्दवाच्य' गवयशब्दाचा अर्थ हाच प्राणी असला पाहिजे अशा प्रकारचें उपमितिज्ञान त्याला होतें.

( न्या० ) उपमान लक्षयति-उपमीतिकरणमिति। उपमितिं लक्षयति-संज्ञासंज्ञीति। संज्ञा नाम पदम्। संज्ञी अर्थः। तयोः संबन्धः शक्तिः। तथा च पदपदार्थसंबन्धज्ञानमुपमितिरित्यर्थः। उपमानं नामातिदेशवाक्यार्थज्ञानम्। अतिदेशवाक्यार्थस्मरणं व्यापारः। उपमितिः फलम्। गोसदृशो गवयपदवाच्य इत्याकारकवाक्याद्गोसादृश्यावच्छिन्नविशेष्यकगवयपदवाच्यत्वप्रकारकं यज्ज्ञानं जायते तदेव करणम्॥ इति न्यायबोधिन्यामुपमानपरिच्छेदः॥

( न्या० भा० )—'उपमितिकरणं' इत्यादि वाक्यानें उपमानाचें लक्षण करितात. 'संज्ञासंज्ञी' यानें उपमितीचें लक्षण करतात. संज्ञा म्हणजे पद व संज्ञी म्हणजे अर्थ आणि त्यांचा संबंध म्हणजे शक्ति अर्थात् पद व पदार्थ यांच्या संबंधज्ञानाला 'उपमिति' असें म्हणतात. उपमान म्हणजे अतिदेशवाक्यार्थाचें ज्ञान. अतिदेश म्हणजे एका पदार्थाचे धर्म दुसऱ्या पदार्थावर आहेत असें सांगणें. तसल्या अतिदेशवाक्यार्थाचें स्मरण हा व्यापार आहे. आणि उपमिति हें त्याचें फल आहे. गवय या शब्दाचा अर्थ-गवय पदार्थ गाईसारखा असतो. अशा प्रकारच्या वाक्यापासून गाईच्या सादृश्यानें युक्त हें ज्यांत विशेष्य आहे व गवय पदाचें वाच्यत्व हें ज्यांत विशेषण आहे. असें जें ज्ञान होतें तेंच उपमितीचें करण होय. येथें न्यायबोधिनी टीकेचा उपमान परिच्छेद संपला.

( प० ) अवसरसंगतिमभिप्रेत्यानुमानानन्तरमुपमानं निरूपयति—उपमितीति। उपमितेः करणमुपमानमित्यर्थः। कुठारादिवारणाय मितीति। प्रत्यक्षादिवारणाय उपेति। संज्ञासंज्ञीति। अनुमित्यादिवारणाय संबन्धेति। संयोगादिवारणाय

पदाचा वाच्य-अर्थ आहे.' या मूळांतील वाक्याचा-आपस्य ला अभिप्रेत असलेला जो गवय तो गवयपदवाच्य-असा भावार्थ आहे. त्यामुळे दुसऱ्या गवयाच्या ठिकाणीं शक्तीच्या ज्ञानाचा अभाव होण्याचा प्रसंग येतो, हें दूषण दूर झालें. कारण 'हा गवयपदाचा वाच्य होणार नाहीं.' म्हणजे त्याच्यावर त्या शब्दाच्या शक्तीचें ज्ञान होणार नाहीं, हें दूषण वरील अर्थानें नाहींसें झालें. अर्थात् गाईच्या सादृश्यानें विशिष्ट अशा पिंडाचें ज्ञान हें उपमितीचें करण आहे. पूर्वी ऐकलेल्या वाक्यार्थाचें स्मरण हा अवान्तर व्यापार आहे व उपमिति हें सादृश्यज्ञानाचें फल आहे. तें उपमान-सादृश्यविशिष्ट पिंडाचें ज्ञान, असाधारणधर्मानें विशिष्ट पिंडाचें ज्ञान व वैधर्म्यविशिष्ट पिंडाचें ज्ञान असें तीन प्रकारचें आहे. पैकीं पहिल्याप्रकारचें ज्ञान सांगितलेंच आहे. दुसरें असें खड्गमृग म्हणजे गेंडा कोणत्या प्रकारचा असतो असें विचारलें असतां 'ज्याच्या नाकावर एक शिंग असतें व जो गजापेक्षां मोठा नसतो,' तो गेंडा असें गेंड्याला जाणणाऱ्या लोकांपासून ऐकून कांहीं कालानें तसल्या प्रकारच्या पिंडाला पाहणारा पुरुष मागील वाक्यार्थाला स्मरतो. त्यानंतर 'हा खड्गमृगपदाचा वाच्य आहे' अशी उपमिति उत्पन्न होते. याठिकाणीं नाकावर असणारें एक शिंग हाच असाधारण धर्म आहे. तिसऱ्या प्रकारचें ज्ञान असें-उंट कशा प्रकारचा असतो? असें विचारलें असता 'ज्याची पाठ घोड्यासारखी सपाट नसते व मान आणि शरीर हीं आंखूड नसतात तो उंट' असें आप्तानें सांगितल्यावर तो पुरुष कांहीं कालानें तसल्या पिंडाला पाहतो, त्यामुळें त्याला वैधर्म्यविशिष्ट पिंडज्ञान होतें. नंतर पूर्वी ऐकलेल्या वाक्यार्थाचें स्मरण होतें व नंतर हा उष्ट्रपदाचा वाच्य आहे अशी उपमिति उत्पन्न होते. ( प्रत्यक्ष अनुमिति, उपमिति, व शाब्दबोध यांचे ठिकाणीं करण, व्यापार व फल हीं तीन आहेतच. पूर्वी प्रत्यक्ष व अनुमिति यांतील करणादिक सांगितलीं. उपमितीतील करणादिक अशीं-पुढचें प्रत्यक्षात्मक सादृश्यरूपी उपमान हें करण, वाक्यार्थाचें स्मरण हा व्यापार, व उपमिति हें फल आहे. अर्थावरील शब्दाच्या शक्तीचें ( पद व पदार्थ यांचा संबंध, किंवा वाच्य-

वाचक भाव अगर संकेत याचें) जें ज्ञान तीच उपमिति होय. उपमितीचा मानसप्रत्यक्ष, अनुमिति व शाब्दबोध यांत अंतर्भाव होत नाहीं. कारण, ' मी उपमित्यात्मकज्ञानवान् आहें. ' अशा अनुव्यवसायावरून उपमिति हें एक निराळ्या प्रकारचें ज्ञान आहे असें ठरतें व यावरून उपमान हें सुद्धां तिचें निराळें प्रमाण आहे असें सिद्ध होतें. येथें पदकृत्यकांतील उपमानखंड संपलें.

आप्तवाक्यं शब्दः । आप्तस्तु यथार्थवक्ता । वाक्यं पदसमूहः । यथा गामानयेति । शक्तं पदम् । अस्मात्पदादयमर्थो बोद्धव्य इतीश्वरसंकेतः शक्तिः ॥

( त० भा० )—आप्तानें उच्चारलेलें जें वाक्य तें शब्दप्रमाण होय. जो खरें बोलतो तो आप्त. वाक्य म्हणजे पदांचा समूह. उदाहरणार्थ—' गाईला आण ' हें वाक्य होय. जें शक्त असतें म्हणजे ज्याच्यामध्यें शक्ति असतें तें पद होय. अमुक पदापासून अमुक अर्थ बोधित व्हावा असा जो ईश्वराचा संकेत ती शक्ति होय.

( न्या० ) शब्दं लक्षयति—आप्तेति । आप्तोच्चरितत्वे सति वाक्यत्वं शब्दस्य लक्षणम् । प्रमाणशब्दत्वं लक्ष्यतावच्छेदकम् । वाक्यत्वमात्रोक्तावनाप्तोच्चरितवाक्येऽतिव्याप्तिरत आप्तोच्चरितत्वनिवेशः । तावन्मात्रोक्तौ जयगवदृशाद्यावनिव्याप्तिरतो वाक्यत्वम् । आप्तत्वं च प्रयोगहेतुभूतयथार्थज्ञानवत्त्वम् । तथा च प्रयोगहेतुभूतयथार्थज्ञानजन्यशब्दत्वमिति पर्यवसन्नोऽर्थः । वस्तुतस्तु पदज्ञानं करणम् । वृत्तिज्ञानसहकृतपदज्ञानजन्यपदार्थोपस्थितिर्व्यापारः । वाक्यार्थज्ञानं शाब्दबोधः फलम् । वृत्तिर्नाम शक्तिलक्षणान्यतररूपा । शक्तिर्नाम घटादिविशेष्यकघटादिपदजन्यबोधविषयत्वप्रकारक ईश्वरसंकेतः । ईश्वरसंकेतो नाम ईश्वरेच्छा । सैव शक्तिरित्यर्थः । शक्तिनिरूपकत्वमेव पदे शक्तत्वम् । विषयतासंबन्धेन शक्त्याश्रयत्वं शक्यत्वम् । शक्यसंबन्धो लक्षणा । सा द्विविधा गौणी शुद्धा चेति । गौणी नाम सादृश्यविशिष्टे लक्षणा । यथा सिंहो माणवक इत्यादौ सिंहपदस्य सिंहसादृश्यविशिष्टे लक्षणा । शुद्धा त्रिविधा । जहल्लक्षणा अजहल्लक्षणा जहदजहल्लक्षणा चेति । लक्ष्यतावच्छेदकरूपेण लक्ष्यमात्रबोधप्रयोजिका लक्षणा जहल्लक्षणा । यथा गङ्गायां घोष इत्यत्र गङ्गापदवाच्यप्रवाहसंबन्धस्तीरे सत्त्वात्तादृशशक्यसंबन्धरूपलक्षणाज्ञानाद्गङ्गापदात्तीरोपस्थितिः । लक्ष्यतावच्छेदकरूपेण लक्ष्यशक्योभयबोधप्रयोजिका लक्षणा अजहल्लक्षणा । यथा काकेभ्यो दधि रक्ष्यतामित्यत्र काकपदस्य दध्युपघातके लक्षणा । लक्ष्यतावच्छेदकं दध्युपघातकत्वम् । तेन रूपेण दध्युपघातकानां सर्वेषां काकबिडालश्वकुक्कुटसारमेयादीनां शक्यलक्ष्याणां सर्वेषां बोधात् । शक्यतावच्छेदकपरित्यागे

ऽभावेनात्र गेघप्रयोजिका लक्षणा जहदजहल्लक्षणा । यथा तत्त्वमसीयत्र सर्वज्ञत्वाकिंचिज्ज्ञत्वपरित्यागेन व्यक्तिमात्रबोधनात् । इयं च जीवब्रह्मणोरैक्य वदतां वेदान्तिनां मते ॥

( न्या० भा० )–' आप्त०' यानें शब्दाचें लक्षण करितात. आप्तानें उच्चारिलेलें असून वाक्यत्व हें शब्दाचें लक्षण आहे. प्रमाणशब्दत्व हें लक्ष्यतावच्छेदक आहे. ' जें वाक्य तेंच शब्दप्रमाण ' असें म्हटल्यास एखाद्या मूर्खानें उच्चारलेल्या वाक्यावर प्रमाणशब्दाचें लक्षण जाऊं लागेल. याकरितां ' आप्तानें उच्चारलेलें ' असें म्हटलें पाहिजे. आता 'जें आप्तानें उच्चारलेलें तें शब्दप्रमाण ' असें म्हटल्यास पाणिनीसारख्या आप्तानें उच्चारलेल्या ' जबगडदश् ' इत्यादि अक्षरावर अतिव्याप्ति न जावी म्हणून ' वाक्य ' असें म्हटलें आहे. हीं अक्षरें वाक्य नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. प्रयोगाला कारण होणारें यथार्थ ज्ञान ज्याला आहे तो आप्त होय. एकंदरीत प्रयोगाला कारण हाणाऱ्या यथार्थ ज्ञानापासून उत्पन्न होणारें शब्दत्व हें ज्याठिकाणीं आहे तो प्रमाणशब्द होय, असा अर्थ सिद्ध होतो. पण, वस्तुतः पदाचें ज्ञान करण आहे व ज्याला वृत्तिज्ञान सहकारी आहे असें पदाच्या ज्ञानापासून उत्पन्न होणारें पदार्थाचें स्मरण हा व्यापार आहे. वाक्यार्थाचें ज्ञान म्हणजे शाब्दबोध हें फळ आहे. शक्ति किंवा लक्षणा यांपैकीं एकीला वृत्ति असें म्हणतात. शक्ति म्हणजे 'ज्यांत घटादि विशेष्य आहे व घटादिपदापासून उत्पन्न होणाऱ्या ज्ञानाचें विषयत्व ( ज्ञानाचा विषय होणें ) हें ज्यांत विशेषण आहे असा ईश्वरसंकेतच होय. ' ईश्वरसंकेत म्हणजे ईश्वराची इच्छा होय. हिलाच शक्ति असें म्हणतात. शक्तीचें निरूपकत्व हेंच पदातील शक्तत्व होय. ( पद हें अर्थावरील आपली शक्ति दाखवीत असतें ). विषयतासंबंधानें जें शक्तीला आश्रय असणें तें शक्य होय. शक्यसंबंधाला लक्षणा असें म्हणतात. ती गौणी व शुद्धा अशी दोन प्रकारची आहे. सादृश्यानें युक्त असा वस्तुवर होणारी जी लक्षणा ती गौणी होय. जसें–'माणवक ( एक पुरुष ) सिंह आहे ' इत्यादि ठिकाणीं सिंह या पदाची सिंहसादृश्यानें युक्त अशा माणवकावर लक्षणा आहे. (क्रूरत्व, शूरत्व, इत्यादि गुणानीं सिंहसादृश्य होय. ) शुद्-

लक्षणा, अजहल्लक्षणा, व जहदजहल्लक्षणा अशी तीन प्रकारची शुद्धा लक्षणा आहे. लक्ष्यतावच्छेदकरूपानें फक्त लक्ष्याचाच बोध करून देणारी जी लक्षणा ती जहल्लक्षणा होय. जसें, गंगेवर गवळ्याचा वाडा आहे. या वाक्यांत गंगापदाचा–शक्य अर्थ जो प्रवाह त्याचा संबंध ( सामीप्यसंबंध ) तीरावर असल्यामुळें तसल्या शक्यसंबंधरूपी लक्षणेच्या ज्ञानानें गंगापदापासून तीराची उपस्थिति (ज्ञान) होते. ह्मणजे गंगापदाचा वास्तविक अर्थ प्रवाह हा सोडून तत्संबद्ध तीर असा अर्थ लक्षणेनें घेतला आहे. ( कारण प्रवाहावर वाडा असणें शक्यच नाहीं ) ह्मणून येथें जहल्लक्षणा होते. लक्ष्यतावच्छेदकाच्या रूपानें लक्ष्य व शक्य या दोघांचें ज्ञान करून देणाऱ्या लक्षणेला अजहल्लक्षणा ह्मणतात. जसें 'कावळ्यापासून तूं दह्याचें रक्षण कर' या वाक्यात काकपदाची दह्याचा नाश करणाऱ्या सर्व व्यक्तींवर लक्षणा होते. दह्याचें नाशकत्व हें लक्ष्यतावच्छेदक आहे. यास्तव त्या रूपानें दह्याचा नाश करणारा जो जो कावळा, मांजर, कोंबडा अगर कुत्रा इत्यादि शक्य अथवा लक्ष्य प्राणी या सर्वांचा बोध होतो. ह्मणून, ही अजहल्लक्षणा होय. कारण, मागील लक्षणेप्रमाणें हिच्यामध्यें काकशब्दाचा स्वार्थ–टाकलेला नाहीं ( तेथें गंगाशब्दाचा स्वार्थ–प्रवाह जहत्–सोडला आहे ह्मणूनच ती जहल्लक्षणा होय ). जें शक्यतावच्छेदक असेल तें टाकून फक्त व्यक्तीचेंच ज्ञान करून देणाऱ्या लक्षणेला जहदजहल्लक्षणा ह्मणतात. जसें–'तें तूं आहेस' याठिकाणीं सर्वज्ञत्व व किंचिज्ज्ञत्व या शक्यतावच्छेदकांचा त्याग करून–त्यांना सोडून फक्त यांना आश्रयभूत अशा व्यक्तीचेंच ज्ञान करून देत असल्यामुळें ही जहदजहल्लक्षणा होय. ( हिच्यामध्यें कांहीं भाग टाकला व कांहीं घेतला आहे ह्मणून जहत् व अजहत् लक्षणा होय. ) ही जीव व ब्रह्म यांचें ऐक्य सांगणाऱ्या वेदान्त्यांच्या मतानें होते.

( प० )अवसरसंगतिमभिप्रेत्योपमानानन्तरं शब्दं निरूपयति –आप्तेति । शब्द इति शब्दः प्रमाणमित्यर्थः । भ्रान्तविप्रलम्भकयोर्वाक्यस्य शब्दप्रमाणत्ववारणाय आप्तेति । ननु कोऽयमाप्त इत्यत आह–आप्तस्त्विति । यथार्थवक्ता यथाभूताबाधितार्थोपदेष्टा । वाक्यं लक्षयति–वाक्यमिति । घटादिसमूहवारणाय पदेति । शक्तमिति । निरूपकतासंबन्धेन शक्तिविशिष्टमित्यर्थः । अस्मादिति । घटपदा-

द्घटरूपोऽर्थोबोद्धव्य इतीश्वरेच्छैव शक्तिरित्यर्थः । अर्थस्मृत्यनुकूलपदपदार्थसंबन्धत्व तल्लक्षणम् । शक्तिरिव लक्षणापि पदवृत्तिः । अथ केयं लक्षणा । शक्यसंबन्धो लक्षणा । सा च त्रिधा । जहत्–अजहत्–जहदजहद्भेदात् । वर्तते च गङ्गायां घोष इत्यत्र गङ्गापदशक्यप्रवाहसंबन्धस्तीरे । लक्षणाबीज च तात्पर्यानुपपत्ति. अत एव प्रवाहे घोषतात्पर्यानुपपत्तेस्तीरे लक्षणा सेत्स्यति । छत्रिणो यान्तीत्यादौ द्वितीया । सोऽयमश्व इत्यादौ तृतीया ॥

( प०भा० )–पूर्वीप्रमाणेंच–अवसरसंगतीला स्वीकारून उपमान सांगितल्यावर ' आप्त० ' यानें शब्दाचें निरूपण करितात. शब्द म्हणजे शब्दप्रमाण असा अर्थ. भ्रांतिष्ट व फसविणारा याचें वाक्य सुद्धा शब्दप्रमाण होऊं लागेल, तें शब्द प्रमाण न व्हावें ह्मणून ' आप्त ' असें ह्मटलें आहे. बरें पण, आप्ताचें लक्षण काय ? या प्रश्नाचें उत्तर ' आप्तस्तु० ' यानें दिलें आहे. आप्त म्हणजे घडल्याप्रमाणें व बाधित न होणाऱ्या अर्थास सांगणारा जो पुरुष, तो आप्त होय. ' वाक्यं ' यानें वाक्याचें लक्षण करितात. केवळ समूहाला वाक्य म्हटल्यास घटांचा समूह सुद्धां वाक्य होऊं लागेल यासाठीं ' पद ' असें म्हटलें आहे. ह्मणजे घटसमूह हा कांहीं पदांचा समूह नसल्यानें त्याचेवर वाक्याच्या लक्षणाची अतिव्याप्ति जात नाहीं. शक्त म्हणजे निरूपकतासंबंधानें शक्तिविशिष्ट–शक्तियुक्त होय. घट या पदापासून घटरूपी अर्थ जाणावा, अशा ईश्वराच्या इच्छेलाच शक्ति म्हणतात अर्थाचें स्मरण होण्याला अनुकूल असा जो पद व पदार्थ यांचा संबंध हेंच शक्तीचें लक्षण आहे. शक्तिप्रमाणेंच लक्षणा ही देखील पदाची वृत्ति आहे. पण, लक्षणा म्हणजे काय ? तर शक्यसंबंधाला लक्षणा म्हणतात. ती जहत् अजहत् व जहदजहत् या भेदानें तीन प्रकारची आहे. ' गंगेवर गवळी वाडा आहे. ' याठिकाणीं गंगा पदाचा शक्य अर्थ ( गंगा या पदाच्या शक्तीनें दाखविलेला अर्थ ) जो प्रवाह त्याचा संबंध तीरावर आहे, म्हणून येथें जहल्लक्षणा होते. तात्पर्याची अनुपपत्ति असणें हें लक्षणा होण्यास कारण आहे. म्हणूनच प्रवाहावर वाडा असणें हें तात्पर्य योग्य रीतीनें जमत नसल्यामुळें तीरावर लक्षणा करावी लागते. ' छत्रीवाले लोक जातात ' याठिकाणीं अजहल्लक्षणा होते. कारण या वाक्याच्या अर्थात् शक्य ( छत्रीवाले ) व लक्ष्य ( छत्री-

रहित असलेले ) लोक या दोन्ही अर्थांचें ग्रहण होतें. ' तो हा घोडा ' येथें तिसरी जहदजहल्लक्षणा होते. कारण, येथें शक्यतावच्छेदक जें तत्कालीनत्व, व एतत्कालीनत्व, यांना सोडून घोडा या व्यक्तीचेंच ज्ञान होत आहे.

आकाङ्क्षा योग्यता संनिधिश्च वाक्यार्थज्ञाने हेतुः। पदस्य पदान्तरव्यतिरेकप्रयुक्तान्वयाननुभावकत्वमाकाङ्क्षा। अर्थाबाधो योग्यता। पदानामविलम्बेनोच्चारणं संनिधिः। तथा च आकाङ्क्षादिरहितं वाक्यमप्रमाणम्। यथा गौरश्वः पुरुषो हस्तीति न प्रमाणम्। आकाङ्क्षाविरहात्। वह्निना सिञ्चेदिति न प्रमाणं योग्यताविरहात्। प्रहरे प्रहरेऽसहोच्चारितानि गामानयेत्यादिपदानि न प्रमाणं सांनिध्याभावात् ॥

( त० भा० )—आकांक्षा, योग्यता आणि संनिधि या तीन गोष्टी वाक्यार्थाचें ज्ञान होण्याला कारण आहेत. दुसरें पद नसल्यामुळें एकाद्या पदाच्या अन्वयाचा बोध न होणें याला आकांक्षा असें म्हणतात. अर्थाचा बाध न होणें, याला योग्यता म्हणतात व विलंब न लावतां पदांचें उच्चारण करणें, त्याला संनिधि म्हणतात. तेव्हां आकांक्षा, योग्यता व संनिधि यांनीं रहित असें जें वाक्य असतें, तें वाक्य प्रमाणभूत नव्हे. म्हणजे अप्रमाण होय. उदाहरणार्थ ' गाय, घोडा, पुरुष, हत्ती ' हें अप्रमाण वाक्य आहे. कारण, येथील शब्दांत आकांक्षा नाहीं. ' अग्नीनें सिंचन करावें ' हें वाक्यही प्रमाणभूत नव्हे. कारण, यांत योग्यता नाहीं. कारण, पाण्यानें सिंचन करतां येतें. अग्नीनें येत नाहीं, अशा प्रकारच्या आपल्या नेहमींच्या अनुभवानें या वाक्यांतील अर्थ ( सेक करणें ) बाधित झाला आहे. ' गाईला आण ' या वाक्यांतील ' गाईला ' हा शब्द उच्चारल्यानंतर एक प्रहरानें ' आण ' हा शब्द उच्चारला तर अशा प्रकारचें वाक्यही अप्रमाण होईल. कारण, यांतील पदांत सांनिध्यरूपी कारण नाहीं.

( न्या० ) आकाङ्क्षां लक्षयति—पदस्येति । यत्पदविशेष्यकाव्यवहितोत्तरत्वादिसंबन्धेन तत्पदप्रकारकज्ञानव्यतिरेकप्रयुक्तो यादृशशाब्दबोधाभावस्तादृशशाब्दबोधे तत्पदे तत्पदवत्त्वमाकाङ्क्षा । यथा घटमित्यादिस्थलेऽव्यवहितोत्तर-

त्वादिसंबन्धेनाम्पदं घटपदवदित्याकारकाम्पदविशेष्यकघटपदप्रकारकज्ञानसत्त्वे घटीयं कर्मत्वमिति बोधो जायते । अम् घट इति विपरीतोच्चारणे तु तादृशज्ञानाभावात्तादृशशाब्दबोधो न जायते । अतस्तादृशाकाङ्क्षाज्ञानं शाब्दबोधे कारणम् । अर्थाबाध इति । बाधाभावो योग्यतेत्यर्थः । अग्निना सिञ्चेदित्यत्र सेककरणत्वस्य जलादिधर्मस्य वह्नौ बाधनिश्चयसत्त्वान्न तादृशवाक्यात्तच्छाब्दबोधः । संनिधिं निरूपयति–पदानामिति । असह्योच्चारितानि विलम्बोच्चारितानि ॥

( न्या० भा० )–'पदस्य०' यानें आकांक्षेचें लक्षण करितात. ज्या ज्ञानांत अव्यवहित उत्तरत्वादि संबंधानें जें पद विशेष्य आहे व त्याहून वेगळें पद ज्यांत प्रकार—विशेषण आहे असें ज्ञान नसल्यामुळें त्यापासून उत्पन्न होणारा जशा प्रकारच्या शाब्दबोधाचा अभाव होतो, त्या प्रकारचा शाब्दबोध व्हावयाचा असतां, त्या पदाला त्या दुसऱ्या पदाची आकांक्षा आहे असें ह्मणावें. जसें 'घटं' इत्यादि ठिकाणीं अव्यवहित (व्यवधान–अंतर नसलेलें ) उत्तरत्वादिसंबंधानें 'अम्' हें पद घटपदवान् आहे. अशा रीतीचें ह्मणजे 'अम्' हें पद ज्यांत विशेष्य आहे, व घट हें पद ज्यांत प्रकार आहे, असें ज्ञान झालें असतां, घटावर कर्मत्व आहे, असा बोध होतो. पण 'अम्' आणि 'घटः' असें उलट उच्चारलें असतां 'अम्' पदविशेष्यक व 'घट' पदप्रकारक असें ज्ञान होत नसल्यामुळें 'घट' कर्म आहे असा बोध होत नाहीं. म्हणून तसलें आकांक्षाज्ञान शाब्दबोधाला कारण आहे. बाधाच्या अभावाला योग्यता म्हणतात, अग्नीनें 'सिंचन करावें' या ठिकाणीं सेक करणें, या जलाच्या धर्माचा वन्हीवर बाधनिश्चय असल्यामुळें, तसल्या वाक्यापासून शाब्दबोध होत नाहीं 'पदानाम्' या वाक्यानें संनिधीचें निरूपण करितात. असह्योच्चारित म्हणजे वेळानें–विलंबानें उच्चारलेलीं पदें.

( प० ) असंभववारणाय पदान्तरव्यतिरेकप्रयुक्त इति । पुनरसंभववारणाय पदान्तरेति । अर्थेति आकाङ्क्षावारणाय अर्थेति । पदानामिति । असह्योच्चारितेष्वतिव्याप्तिवारणाय अविलम्बनेति । आकाङ्क्षावारणाय पदानामिति आकाङ्क्षादिशून्यवाक्यस्यात्र प्रमाणत्वं निषेधयति–तथा चेति । आकाङ्क्षादिकं शाब्दहेतुरित्युक्तं चेत्यर्थः । अनाकाङ्क्षाद्युदाहरणं दर्शयति–यथेति ॥

( प० भा० )–असंभवावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण

करण्यासाठीं ' पदांतरव्यतिरेकप्रयुक्त ' असा शब्द, आकांक्षेच्या लक्षणांत घातला आहे. पुनः असंभवाचें निवारण करण्याकरितां ' पदांतर ' असें म्हटलें आहे. आकांक्षेवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' अर्थ ' असें म्हटलें आहे ' नुसतीं पदें उच्चारणें ' हाच संनिधि आहे असें म्हटल्यास एकदम न उच्चारलेल्या पदांचे ठिकाणीं संनिधि नसतांना, तेथें संनिधीचें लक्षण जातें. तें न जावें यासाठीं ' अविलंबानें ' असें म्हटलें आहे. आतां विलंबानें उच्चारलेल्या पदावर संनिधीचें लक्षण जात नाहीं. आकांक्षेचें निवारण करण्यासाठीं 'पदानाम्' असें म्हटलें आहे. 'तथा च०' यानें आकांक्षादिकांनीं शून्य असलेलें वाक्य प्रमाण नाहीं असा निषेध करितात. ' तथा च ' म्हणजे आकांक्षादिक हे शाब्दज्ञानाला हेतु आहेत असें म्हटलें असतां. ' यथा- ' यानें ज्यांत आकांक्षादिक नाहींत असें उदाहरण दाखवितात. ( वरील आकांक्षेच्या लक्षणांत पद शाब्दबोधाचा उत्पन्न करणारें नसणें यास आकांक्षा असें म्हटल्यास असंभवच येतो. कारण पद म्हटलें की तें शक्त असावयाचेंच; म्हणजे आपासून कांहींतरी बोध व्हावयाचाच. तेव्हां हा असंभव न यावा म्हणून ' पदान्तरव्यतिरेकप्रयुक्त ' असें म्हटलें आहे. आतां एक पद दुसरें पद नसल्यामुळें मात्र पूर्ण शाब्दबोधाला उत्पन्न करूं शकणार नाहीं. म्हणून त्या पदाला त्या दुसऱ्या पदाची आकांक्षा आहे. त्यामुळें असंभव नाहीं. तसेंच ' योग्यते'च्या लक्षणांत नुसत्या अबाधास 'योग्यता' असें म्हटल्यास 'वह्निना सिंचेत्' या ठिकाणीं सुद्धां आकांक्षा म्हणजे 'एका पदाला दुसऱ्या पदाची अपेक्षा असणें' ही आहेच. तेव्हां एका पदावर अवलंबून दुसरें पद असणें या गोष्टीचा अबाध आहेच. म्हणून योग्यतेचें लक्षण आकांक्षेवर जातें, ही अतिव्याप्ति न जावी म्हणून ' अर्थाचा ' असें म्हटलें आहे म्हणजे ' वह्निना सिंचेत्' येथें अर्थाचा अबाध होत नसल्यानें तर वन्हीचे ठिकाणीं, सेकाचें करण होणें एतद्रूपी अर्थाचा, बाधच होत असल्यानें आतां त्या आकांक्षेवर अतिव्याप्ति जात नाहीं. असेंच संनिधीच्या लक्षणांतही ' अविलंबानें उच्चारणें ' यास संनिधि असें म्हटल्यास आकांक्षेत देखील अविलंबानेंच उच्चारण होत असल्यानें

तिच्यावर अतिव्याप्ति जाते. पण, 'पदांचें' असें म्हटल्यानें आतां जात नाहीं. कारण, एखाद्या ठिकाणीं पदांचें विलंबानें उच्चारण केलें तरी, म्हणजे 'घटम्' असें म्हटल्यावर थोड्या वेळानें जरी 'आनय' असें म्हटलें तरी येथें आकांक्षा आहेच. पण, संनिधि नाहीं, तेव्हां संनिधि हा आकांक्षेहून भिन्न आहे म्हणून 'पदानाम्' असें म्हटल्यानें आतां संनिधीच्या लक्षणाची आकांक्षेवर अतिव्याप्ति जात नाहीं.

वाक्यं द्विविधम्। वैदिकं लौकिकं च। वैदिकमीश्वरोक्तत्वात्सर्वमेव प्रमाणम्। लौकिकं त्वाप्तोक्तं प्रमाणम्। अन्यद्प्रमाणम्॥

(त० भा०)—एक वैदिक व दुसरें लौकिक असें दोन प्रकारचें वाक्य असतें. वेद हा ईश्वरानें उच्चारलेला असल्यामुळें सर्वच वैदिक वाक्यें प्रमाण होत व लौकिक वाक्यापैकीं जीं आप्तांनीं उच्चारलेलीं असतील तीं प्रमाण. बाकीचीं सर्व अप्रमाण.

(न्या०) वैदिकमिति। वेदवाक्यमित्यर्थः। इदमुपलक्षणम्। वेदमूलकस्मृत्यादीन्यपि प्रमाणानि। लौकिकं त्विति। वेदवाक्यभिन्नमित्यर्थः। आप्तत्वं च प्रयोगहेतुभूतयथार्थज्ञानवत्त्वम्॥ इति न्यायबोधिन्यां शब्दपरिच्छेदः॥

(न्या०भा०)—वैदिक म्हणजे वेदासंबंधीं-वेदवाक्य असा अर्थ, हें उपलक्षण[1] आहे. म्हणून वेद ज्यांना मूळ आहे असे स्मृति इत्यादि ग्रंथहि वेदशब्दानें घ्यावे लौकिक म्हणजे 'वेदवाक्याहून भिन्न' असा अर्थ प्रयोगाला कारण असणारें खरें ज्ञान ज्याला असतें तो आप्त होय. येथें न्यायबोधिनींतील शब्दपरिच्छेद झाला.

वाक्यार्थज्ञानं शाब्दज्ञानम्। तत्करणं शब्दः॥

(त० भा०)-वाक्यार्थज्ञानाला शाब्दज्ञान म्हणतात. व त्याचें करण शब्द आहे.

(प०) नन्वेतावता शाब्दलक्षणं अपरिष्कृतं। अप्रामाणिकजनकवाक्ये शाब्दस्याप्युद्भूतत्वेन तत्कुतो न प्रदर्शितमित्यत आह-वाक्यार्थेति। शाब्दत्वं च शब्दात्प्रत्येमीत्यनुभवसिद्धा जातिः। शाब्दबोधक्रमो यथा-चैत्रो ग्रामं गच्छतीत्यत्र ग्रामकर्मकगमनानुकूलवर्तमानकृतिमांश्चैत्र इति शाब्दबोधः। द्वितीयायाः कर्मत्वमर्थः। धातोर्गमनम्। अनुकूलत्वं च संसर्गमर्यादया भासते। लटो वर्त-

[1] नेहमीं लक्ष्याचें ठिकाणीं नसूनहि जे व्याप्ति करितें तें उपलक्षण होय.

मानत्वमाख्यातस्य कृतिः । तत्संबन्धः संसर्गमर्यादया भासते । रथो गच्छतीत्यत्र गमनानुकूलव्यापारवान् रथ इति शाब्दबोधः । स्नात्वा गच्छतीत्यत्र गमनप्रागभावावच्छिन्नकालीनस्नानकर्ता गमनानुकूलवर्तमानकृतिमानिति शाब्दबोधः । क्त्वाप्रत्ययस्य कर्ता पूर्वकालीनत्वं चार्थः । एवमन्यत्रापि वाक्यार्थो बोध्यः ॥ इति पदकृत्ये शब्दपरिच्छेदः ॥

(प० भा० )-अहो अशा रीतीनें शाब्दज्ञानाला लागणाऱ्या सामग्रीसंबंधानें विवेचन केलें. परंतु ज्ञानाचा विभाग करणाऱ्या वाक्यांत शाब्दज्ञान सांगितलें असतांना त्याचें स्वरूप वगैरे कां दाखविलें नाहीं ? असें विचाराल तर ' वाक्यार्थ ' इत्यादि वाक्यानें तें दाखविलें आहे. शाब्दत्व म्हणजे ' शब्दावरून मी जाणतों ' अशा अनुभवानें सिद्ध झालेली जाति होय. नैयायिकांच्या मतानें शाब्दबोधाचा असा क्रम आहे.—'चैत्र नांवाचा पुरुष गांवाला जातो' या ठिकाणीं गांव हें जिचें कर्म आहे अशा गमनाला अनुकूल, व वर्तमानकालीन अशा कृतीनें युक्त, चैत्र आहे, असा शाब्दबोध होतो. येथें द्वितीयेचा अर्थ कर्म आहे. ' गम् ' धातूचा गमन असा अर्थ आहे. आणि अनुकूलपणा संसर्गमर्यादेनें भासत आहे. ' गच्छति ' यातील ' लट् ' या प्रत्ययाला वर्तमानत्व आहे. आख्याताचा अर्थ क्रिया आहे. त्यांचा संबंध संसर्गानें भासतो. ' रथ जातो ' या ठिकाणीं गमनाला अनुकूल अशा व्यापारानें युक्त असा रथ आहे. असा शाब्दबोध होतो. तो चैत्रासारखा कृतिमान् असल्याचा बोध होत नाहीं. कारण, त्याचे ठिकाणीं चैतन्य नाहीं. ' स्नान करून जातो ' याठिकाणीं ज्या काळीं गमनाचा प्रागभाव आहे, त्याकाळीं स्नान करणारा व गमनाला अनुकूल अशी वर्तमान कृति ज्याचेवर आहे असा हा चैत्र आहे, असा शाब्दबोध होतो. ' क्त्वा ' प्रत्ययाचा कर्ता व पूर्वकाळीं असणें असा अर्थ आहे. अशाच रीतीनें दुसऱ्या ठिकाणींही वाक्यार्थ समजावा. येथें पदकृत्यकांतील शब्दपरिच्छेद संपला. याविषयीं थोडीशी माहिती.—सर्व शाब्दबोधांत धातूचा अर्थ हाच मुख्य विशेष्यस्वरूपेंकरून विषय होतो असें वैयाकरण मानितात. उदाहरण ' चैत्र तांदुळ शिजवितो ' या वाक्यांतील ' तो ' या प्रत्ययाचा ' कर्ता ' असा अर्थ असून चैत्रास कर्त्याचें अभेदेंकरून विशेषण मानितात. तेव्हां 'चैत्र या कर्त्याचें शिजविणें ' असा

वरील वाक्यापासून वैयाकरण बोध मानितात. या बोधांत धातूचा ' शिजविणें ' हा मुख्य अर्थ विशेष्यस्वरूपेंकरून विषय आहे. पण नैयायिक सर्व शाब्दबोधांत प्रथमाविभक्त्यन्ताचा अर्थ हाच मुख्य विशेष्यस्वरूपेंकरून विषय होतो, असें मानितात. तो असा; पूर्वोक्त उदाहरणांतील ' तो ' या प्रत्ययाचा 'कृति' असा अर्थ असून तिचा चैत्राचे ठिकाणीं समवायसंबंधेंकरून संबंध होतो, तेव्हां ' तांदुळ-स्वरूपी कर्माचें जें शिजविणें त्यास अनुकूल जी कृति तद्वान् चैत्र ' असा पूर्वोक्त वाक्यापासून नैयायिक बोध मानितात. या ज्ञानांत चैत्र हाच मुख्य विशेष्यस्वरूपेंकरून विषय आहे आणि मीमांसक सर्व शाब्दबोधांत व्यापार हाच मुख्य विशेष्यस्वरूपेंकरून विषय होतो, असें मानितात. त्यांच्या मतें ' शिजण्याला अनुकूल असा चैत्राचा व्यापार ' असा बोध होतो. या ज्ञानांत व्यापार हा मुख्य विशेष्य-स्वरूपेंकरून विषय आहे. असो; एकंदरींत शाब्दबोधाला पदाचें ज्ञान करण, पदार्थाचें स्मरण हा व्यापार म्हणजे द्वार, आणि शक्तीचें ज्ञान हें सहाय होय. शाब्दबोध हें फळ जाणावें. तात्पर्य, पदज्ञान झाल्यानंतर म्हणजे शब्द ऐकिल्यानंतर शक्तिज्ञानाच्या साह्यानें तें शब्दाच्या अर्थाची–विषयाची उपस्थिति ( आठवण ) होते. त्यानंतर वाक्यार्थज्ञानस्वरूपी शाब्दबोध होतो. पदाचें ज्ञानाला करण मानिल्यानें एखाद्या वेळीं पदें उच्चारलीं नसताही हस्तचेष्टा इत्यादि-कांवरून शाब्दबोधाच्या उपयोगी अशीं पदें मनामध्यें उमजतात व तेणेंकरून पदाचें ज्ञान संभवतें.

> अयथार्थानुभवस्त्रिविधः संशयविपर्ययतर्कभेदात् । एक-स्मिन्धर्मिणि विरुद्धनानाधर्मवैशिष्ट्यावगाहि ज्ञानं सं-शयः । यथा स्थाणुर्वा पुरुषो वेति ॥

( त० भा० )–अयथार्थानुभव तीन प्रकारचा आहे. संशय, विपर्यय व तर्क हे तीन प्रकार होत. एकाच धर्मीवर परस्परविरुद्ध अशा वेगवेगळ्या धर्मांच्या संबंधाचें जें ज्ञान होतें, त्यास संशय

---

१ वृत्ति म्हणजे पद व पदार्थ यांचा संबंध. तो संबंध शक्ति किंवा लक्षणा एतत्स्वरूपी असतो. शक्तिस्वरूपी संबंधाचें शक्त व शक्य असे दोन संबंधी आहेत. पद हें शक्त असून अर्थ हा शक्य आहे.

म्हणतात. उदाहरणार्थ ' हा खांब आहे किंवा पुरुष आहे ' हा संशय होय.

( न्या० ) यथार्थानुभवं निरूप्यायथार्थानुभवं विभजते–संशयेत्यादिना । एकेति । एकधर्मावच्छिन्नविशेष्यतानिरूपितभावाभावप्रकारकज्ञानं संशय इत्यर्थः। भावद्वयकोटिकसंशयाप्रसिद्धेः । स्थाणुर्वेत्यत्र स्थाणुत्वस्थाणुत्वाभावपुरुषत्वपुरुषत्वाभावकोटिक एव ॥

( न्या० भा० )–यथार्थ अनुभवाचें निरूपण करून आतां ' संशय० ' इत्यादि वाक्यानें अयथार्थ अनुभवाचें निरूपण करितात. एका धर्मानें युक्त असलेल्या वस्तूवरील विशेष्यतेनें दाखविलेल्या आणि भाव व अभाव हे ज्यांत प्रकार आहेत, अशा ज्ञानास संशय म्हणतात. ज्यांत दोन्ही भाव-कोटया असतात, असा संशयच प्रसिद्ध नसल्यामुळें ' स्थाणुर्वा ' याठिकाणीं स्थाणुत्व आहे, किंवा स्थाणुत्वाचा अभाव आहे, व पुरुषत्व आहे, किंवा पुरुषत्वाचा अभाव आहे, अशा प्रकारचा हा. ज्यांत एक भावकोटि व दुसरी अभावकोटि असते असा हा संशय होय.

( प० ) अयथार्थानुभवं विभजते–अयथार्थेति । सशयं लक्षयति–एकस्मिन्निति । एकस्मिन्धर्मिणि एकस्मिन्नेव पुरोवर्तिनि पदार्थे विरुद्धा व्यधिकरणा ये नानाधर्माः स्थाणुत्वपुरुषत्वादयस्तेषां वैशिष्ट्यं संबन्धः तदवगाहि ज्ञानं संशय इत्यर्थः । घटपटाविति समूहालम्बनज्ञानस्य घटत्वपटत्वरूपविरुद्धनानाधर्मवैशिष्ट्यावगाहित्वादतिप्रसक्तिवारणाय एकस्मिन्निति । घटः पृथिवीति ज्ञानस्यैकस्मिन्धर्मिणि घटे घटत्वपृथिवीत्वरूपनानाधर्मवैशिष्ट्यावगाहित्वादतिप्रसङ्गवारणाय विरुद्धेति । घटत्वविरुद्धघटत्ववान् घट इति ज्ञानेऽतिव्याप्तिवारणाय नानेति ॥

( प०भा० )–' अयथार्थ० ' इत्यादि वाक्यानें अयथार्थ अनुभवाचें निरूपण करितात, ' एकस्मिन्० ' यानें संशयाचें लक्षण करितात. एका धर्मीवर म्हणजे पुढें असणाऱ्या एखाद्या पदार्थावर, विरुद्ध म्हणजे वेगवेगळ्या अधिकरणावर राहणारे जे स्थाणुत्व पुरुषत्व इत्यादिक वेगवेगळे धर्म, यांचा संबंध ज्या ज्ञानांत विषय असतो अशा ज्ञानास संशय म्हणतात, ' घटपटौ ' या समूहालंबन ज्ञानांत सुद्धां घटत्व-पटत्वरूपी विरुद्ध व वेगवेगळ्या धर्मांचा संबंध असल्यामुळें त्या ज्ञानावर संशयलक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं ' एकावर ' असें म्हटलें आहे. म्हणजे समूहालंबनज्ञानांत घटत्व व पटत्वरूपी वेगवेगळे धर्म घट व पट या वेगवेगळ्या व्यक्तींवर रहात

असल्यानें त्या ज्ञानावर अतिव्याप्ति जात नाहीं. तसेंच 'घट हा पृथ्वी आहे' अशा ज्ञानांत एक धर्मी जो घट त्याचेवर घटत्व व पृथ्वीत्वरूपी वेगवेगळ्या धर्मांचा संबंध भासत असल्यामुळें या ज्ञानावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'विरुद्ध' असें म्हटलें आहे. त्यामुळें घटत्व व पृथ्वीत्व हे धर्म विरुद्ध नसल्यानें म्हणजे एके ठिकाणीं राहणें शक्य असल्यानें हे धर्म ज्यांत आहेत, त्या वरील ज्ञानावर अतिव्याप्ति जात नाहीं. बरें, विरुद्ध धर्मांचा संबंध ज्यांत भासतो आहे, अशा ज्ञानास संशय म्हटल्यास 'पटत्वाच्या विरुद्ध जें घटत्व तद्वान् हा घट आहे.' अशा ज्ञानावर संशयाचें लक्षण जातें. कारण हें ज्ञान सुद्धां पटत्वाच्या विरुद्ध जें घटत्व, त्याचा संबंध घटावर दाखवितें, म्हणून ही अतिव्याप्ति घालविण्याकरितां 'वेगवेगळे' असें म्हटलें आहे. म्हणजे या ज्ञानांत पटत्वाच्या विरुद्ध घटत्व हा एकच धर्म आहे, ते वेगवेगळे धर्म नाहींत, म्हणून या ज्ञानावर अतिव्याप्ति नाहीं.

मिथ्याज्ञानं विपर्ययः। यथा शुक्तौ 'रजतम्' इति॥

( त० भा० )—विपर्यय म्हणजे मिथ्याज्ञान होय. उदाहरणार्थ, आपल्यापुढें वास्तविक शुक्ति—शिंप असतांना 'हें रजत आहे' असें जर आपल्याला मिथ्याज्ञान झालें तर तो विपर्यय होय.

( न्या० ) मिथ्याज्ञानमिति। अयथार्थज्ञानमित्यर्थः। विपर्ययो नाम भ्रमः॥

( न्या० भा० )—मिथ्या ज्ञान म्हणजे खोटें ज्ञान होय व विपर्यय म्हणजे भ्रम होय.

( प० ) मिथ्येति। यथार्थज्ञानवारणाय मिथ्येति। अयथार्थवारणाय ज्ञानेति॥

( प० भा० )—ज्ञानालाच विपर्यय म्हटल्यास यथार्थ ज्ञानावर अतिव्याप्ति जाईल. यासाठीं 'मिथ्या' म्हटलें आहे. त्यामुळें यथार्थ ज्ञान मिथ्या नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति नाहीं. अयथार्थावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'ज्ञान' असें म्हटलें आहे.

व्याप्यारोपेण व्यापकारोपस्तर्कः। यथा यदि वह्निर्न स्यात्तर्हि धूमोऽपि न स्यादिति॥

( त० भा० )—व्याप्याच्या आरोपावरून व्यापकाचा आरोप

करणें हा तर्क होय. उदाहरणार्थ, जर एखाद्या स्थळीं वन्हि नसेल तर धूमही नसला पाहिजे.

( न्या० ) व्याप्यारोपेणेति । तर्के व्याप्यस्य व्यापकस्य च बाधनिश्चयः कारणम् । अन्यथा बाधनिश्चयाभाव इष्टापत्तिदोषेण तर्कानुत्पत्तेः ॥

( न्या० भा० )–तर्कामध्यें व्याप्य व व्यापक यांच्या अभावाचा निश्चय कारण असतो, नाहीं तर बाधाचा निश्चय जर नसेल तर इष्टापत्ति या दोषानें तर्क उत्पन्न होणार नाहीं.

( प० ) तर्कं लक्षयति–व्याप्यारोपेणेति । असंभववारणाय व्याप्यारोपेणेति । पुनरसंभववारणाय व्यापकारोप इति । अत्र वह्न्यभावो व्याप्यः धूमाभावो व्यापकः । यद्यपि तर्कस्य विपर्ययात्मकत्वेन पृथग्विभागोऽनुचितः । तथापि प्रमाणानुग्राहकत्वात् स उदित इति बोध्यम् । स्वप्नस्तु पुरीतद्बहिर्देशान्तर्देशयोः संधौ इडानाड्या वा मनसि स्थितेऽदृष्टविशेषेण धातुदोषेण वा जन्यते । स च मानसविपर्ययान्तर्भूतः ॥

( प० भा० )–' व्याप्यारोपेण० ' या वाक्यानें तर्काचें लक्षण करितात. असंभवावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' व्याप्याच्या आरोपानें ' असें म्हटलें आहे. पुनः असंभवावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' व्यापकाचा आरोप ' असें म्हटलें आहे. येथें वन्हीचा अभाव हा व्याप्य आहे, व धूमाचा अभाव हा व्यापक आहे. तर्क हा विपर्ययरूपीच असल्यामुळें त्याचा वेगळा विभाग करणें, अयोग्य आहे. परंतु तो प्रमाणाला साहाय्य करणारा असल्यामुळें वेगळा सांगितला आहे. पुरीतती नामक नाडीचा बाह्य देश किंवा आंतील देश यांच्या संधींत किंवा इडा नाडींत मन राहिलें असता विशेष अदृष्टानें किंवा धातूंच्या वैषम्यानें स्वप्न पडत असतें. त्याचा अंतर्भाव मानसविपर्ययांत होतो.

स्मृतिरपि द्विविधा । यथार्था अयथार्था च । प्रमाजन्या यथार्था । अप्रमाजन्या अयथार्था ॥ सर्वेषामनुकूलवेदनीयं सुखम् ॥

---

१ पर्वतावर धूम आहे तेव्हां अग्निही असला पाहिजे, अशा अनुमानावर, जर कोणी म्हणेल कीं पर्वतावर धूम आहे एवढें मात्र खरें आहे. पण त्यावर अग्नि आहे हें खोटें आहे तर त्याला असें उत्तर देतां येईल कीं तुझ्या म्हणण्याप्रमाणें येथें जर अग्नि नाहीं असें मानिलें, तर धूमही असूं शकणार नाहीं, कारण अग्नीवाचून धूम कधींही नसतो. ही जी बाधाला अनिष्टापत्ति दाखवितात तिलाच " तर्क " असें म्हणतात.

( त० भा० )–एक यथार्थ व दुसरी अयथार्थ अशी स्मृति सुद्धां दोन प्रकारची आहे. जी प्रमेपासून उत्पन्न होते, ती यथार्थ व जी अप्रमेपासून उत्पन्न होते ती अयथार्थ होय. जें सर्वांना अनुकूल वाटतें तें सुख होय.

( न्या० ) सुखं निरूपयति–सर्वेषामिति । इतरेच्छाऽनधीनेच्छाविषयत्वमिति निष्कर्षः । यथाश्रुते अनुकूलत्वप्रकारकवेदनाविशेष्यत्वस्य घटोऽनुकूल इत्याकारकज्ञानदशायामनुकूलत्वप्रकारकज्ञानविशेष्यत्वस्य घटादावपि सत्त्वाद्घटादावतिव्याप्तिरिति निष्कृष्टलक्षणमुक्तम् । भोजनादावतिव्याप्तिवारणाय इतरेच्छानधीनेतीच्छाविशेषणम् । सुखेच्छायाः सुखत्वप्रकारकज्ञानमात्रजन्यत्वात् ॥

( न्या० भा० )–' सर्वेषा० ' इत्यादि वाक्यानें सुखाचें निरूपण करितात. इतरांच्या इच्छेच्या अधीन नसणारी जी इच्छा तिचा जें विषय होतें तें सुख होय. असा मूळांतील लक्षणाचा निष्कर्ष आहे. असा निष्कर्ष न काढतां वर सांगितल्याप्रमाणेंच सुखाचें लक्षण ठेवल्यास अनुकूलत्व हा जिच्यामध्यें प्रकार आहे अशा वेदनेचें विशेष्यत्व ' हा घट अनुकूल म्हणजे उपयोगी आहे ' अशा प्रकारच्या ज्ञानातही आहे. कारण, अनुकूलत्व हा ज्यांत प्रकार आहे अशा ज्ञानाचें विशेष्यत्व घटादिकांवरही असल्यानें त्याचे वर अतिव्याप्ति जाते ती न जाण्यासाठीं निष्कृष्ट लक्षण सांगितलें आहे. ' जें इच्छेचा विषय तें सुख असें ' म्हटल्यास भोजनही भोजनाच्या इच्छेचा विषय होत असल्यानें त्याचेवर सुखाच्या लक्षणाची अतिव्याप्ति जाते; ती न जाण्यासाठीं ' इतर इच्छेच्या अधीन नसणारी ' असें इच्छेला विशेषण लाविलें आहे. म्हणजे भोजन हें अशा इच्छेचा विषय होत नसल्यानें त्याचेवर सुखाच्या लक्षणाची अतिव्याप्ति जात नाहीं. कारण, सुखाची इच्छा सुखत्व हा ज्यांत प्रकार आहे अशा ज्ञानापासूनच फक्त उत्पन्न होत असते.

( प० ) सुखं निरूपयति–सर्वेषामिति । सर्वात्मनामनुकूलमिति वेद्य यत्तत्सुखमित्यर्थः । अहं सुखीत्यनुभवसिद्धसुखत्वजातिमत्, धर्ममात्रासाधारणकारणो गुणो वा सुखम् । शुद्धदुःखवारणाय सर्वेषामिति ॥

( प० भा० )–' सर्वेषां० ' इत्यादि वाक्यानें सुखाचें निरूपण करितात. सर्व आत्म्यांना अनुकूल म्हणून जें वाटतें म्हणजे जें मला नेहमीं हवें असें वाटतें तेंच सुख होय. ' मी सुखी आहें '

ज्याच्या योगानें आपल्यां पूर्वीच्या स्थितींत येऊन राहते त्याला स्थिति-स्थापक संस्कार म्हणतात. हा धर्म चटई आदिकरून पार्थिव द्रव्यावर राहतो.

( न्या० ) संस्कारं विभजते—संस्कार इति । भावनां लक्षयति—अनुभवेति । अनुभवजन्यत्वे सति स्मृतिहेतुत्वं भावनाया लक्षणम् । अत्रानुभवजन्यत्वे सतीति विशेषणानुपादाने आत्ममनःसंयोगेऽतिव्याप्तिरात्ममनःसंयोगस्य ज्ञानमात्रं प्रत्यसमवायिकारणत्वेन स्मृतिं प्रत्यपि कारणत्वादतस्तदुपादानम् । आत्ममनःसंयोगस्यानुभवजन्यत्वाभावान्नातिव्याप्तिः । तावन्मात्रे कृतेऽनुभवध्वंसेऽतिव्याप्तिः । ध्वंसं प्रति प्रतियोगिनः कारणत्वेनानुभवध्वंसस्याप्यनुभवजन्यत्वात् । अतः स्मृतिहेतुत्वोपादानम् । अनुभवध्वंसे स्मृतिहेतुत्वाभावान्नातिव्याप्तिः । नन्वत्र विशिष्टबुद्धिं प्रति विशेषणज्ञानस्य कारणता सकलतान्त्रिकमतसिद्धा । यथा दण्डविशिष्टबुद्धिं प्रति दण्डज्ञानं कारणम् । दण्डविशिष्टबुद्धिर्नाम दण्डप्रकारकज्ञानम् । तथा च दण्डप्रकारकबुद्धित्वावच्छिन्नं प्रति दण्डज्ञानत्वेन कारणत्वमिति व्यवस्थितम् । दण्डप्रकारकबुद्धिर्दण्डी पुरुष इत्याकारकबुद्धिस्तत्र दण्डज्ञानं कारणम् । न हि दण्डमजानानः पुमान् दण्डी पुरुष इति प्रत्येति । एवं च यत्राथ दण्ड इति प्रत्यक्षं जातं तदनन्तरं दण्डी पुरुष इत्याकारकप्रत्यक्षमुत्पन्नं तत्र दण्डी पुरुष इत्याकारकप्रत्यक्षेऽतिव्याप्तिः । तद्धि स्वाव्यवहितपूर्वक्षणोत्पन्नदण्डज्ञानात्मकानुभवजन्यं जनिष्यमाणे दण्डी पुरुष इत्याकारकस्मरणे कारणं च स्मृतिं प्रत्यनुभवस्य कारणत्वात् । तथा चानुभवजन्यत्वे सति स्मृतिहेतुत्वरूपभावनालक्षणस्य यथोक्तदण्डी पुरुष इत्याकारकानुभवे विद्यमानत्वादतिव्याप्तिरिति चेत् । अत्र ब्रूमः—अनुभवजन्यत्वं अनुभवनिष्ठकारणतानिरूपितकार्यताश्रयत्वम् । तत्र

तथाहि—दण्डप्रकारकबुद्धित्वावच्छिन्नकार्यतानिरूपितदण्डज्ञाननिष्ठकारणताया न दण्डानुभवत्वमवच्छेदकं दण्डानुभवादिव दण्डस्मरणादपि दण्डप्रकारकबुद्धेरुत्पत्तेः । अतो दण्डप्रकारकबुद्धित्वावच्छिन्नं प्रत्यनुभवस्मरणसाधारणदण्डज्ञानत्वेनैव दण्डज्ञानस्य कारणतायाः स्वीकरणीयत्वेन दण्डज्ञानत्वस्यैव तदवच्छेदकत्वात् । तथा चानुभवत्वावच्छिन्नकारणतानिरूपितकार्यताश्रयत्वस्योक्तप्रत्यक्षेऽभावान्नातिव्याप्तिः । भावनायां तु लक्षणमिदं वर्तते । तथाहि—अनुभवेनैव भावनाख्यसंस्कारोत्पत्त्या भावनात्वावच्छिन्नं प्रत्यनुभवस्यानुभवत्वेनैव कारणतया भावनात्वावच्छिन्नकार्यतानिरूपितानुभवनिष्ठकारणतायामनुभवत्वमवच्छेदकम् । अतोऽनुभवत्वावच्छिन्नकारणतानिरूपितकार्यताश्रयत्वं भावनायां वर्तत इति नासंभवः । नन्वेवं स्मृतिहेतुत्वविशेषणवैयर्थ्यमापद्यते । तद्ध्यनुभवध्वंसेऽतिव्याप्तिवारणाय प्रागुपात्तम् । नहि यथोक्तानुभवजन्यत्वविवक्षायामनुभवध्वंसेऽतिव्याप्तिः प्रसज्यते । तथाहि—ध्वंसत्वावच्छिन्नं प्रति प्रतियोगिनः कारणत्वं प्रतियोगित्वेन रूपेण । तत्तद्ध्वंसत्वावच्छिन्नं प्रति तत्तत्प्रतियोगिव्यक्तेस्तत्तद्व्यक्तित्वेन च कारणत्व-

मित्येवं ध्वंसप्रतियोगिनोः कार्यकारणभावः । तथा च ध्वंसनिष्ठकार्यतानिरूपिता यानुभवनिष्ठा कारणता तस्यां प्रतियोगित्वमवच्छेदकं तत्तद्व्यक्तित्वं च । न त्वनुभवत्वमपीति सिद्धान्तः । एवं चानुभवत्वावच्छिन्नकारणतानिरूपितकार्यताश्रयत्वरूपानुभवजन्यत्वविरहेणैवातिव्याप्तिवारणसंभवात्कृतं स्मृतिहेतुत्वविशेषणेनेति चेत् । न । स्मृतावतिव्याप्तिवारणायैव तद्विशेषणप्रवेशात् । तथाहि–स्मृतिं प्रत्यनुभव एव कारणं न तु स्मृतिरप्यतो घटस्मृतित्वावच्छिन्नं प्रति घटानुभवस्य घटानुभवत्वेनैव कारणत्वं न तु घटज्ञानत्वेन । इत्थं चानुभवत्वावच्छिन्नकारणतानिरूपितकार्यताश्रयत्वस्य स्मृतौ विद्यमानत्वात्तत्रातिव्याप्तिः । उक्तविशेषणदाने तु नहि स्मृतिः स्मृतिहेतुर्भवतीति तद्व्युदासः ॥

(न्या० भा०)–'संस्कार' इत्यादि ग्रंथानें संस्काराचा विभाग करितात. 'अनुभव०'इत्यादिकांनीं भावनेचें लक्षण करितात. अनुभवापासून उत्पन्न होणारी असून जी स्मृतीला कारण होते, ती भावना होय. असें भावनेचें लक्षण झालें. येथें 'अनुभवजन्यत्व' हें विशेषण जर दिलें नाहीं, व केवळ 'स्मृतिहेतुत्व' हेंच भावनेचें लक्षण केलें तर आत्मा व मन यांच्या संयोगावर अतिव्याप्ति जाते. कारण, हा संयोग सर्वच ज्ञानांचें असमवायिकारण असल्यानें स्मृतीलाही कारण आहेच, म्हणून 'अनुभवजन्य' असें विशेषण दिलें आहे. आत्मा व मन यांचा संयोग जरी स्मृतीला कारण असला तरीसुद्धां तो अनुभवापासून उत्पन्न होत नसल्यानें अतिव्याप्ति नाहीं. 'जी अनुभवजन्य तीच भावना' म्हटल्यास अनुभवाचा ध्वंस देखील अनुभवापासूनच होत असल्यामुळें त्यावर या लक्षणाची अतिव्याप्ति जाते, कारण, ध्वंसाला प्रतियोगी हा कारण असल्यामुळें अनुभवाच्या ध्वंसाला सुद्धां अनुभवरूपी प्रतियोगी कारण आहे, म्हणून 'स्मृतिहेतु' असें म्हटलें आहे. त्यामुळें अनुभवाचा ध्वंस, स्मृतिला कारण नसल्यामुळें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. अहो पण 'विशिष्ट

१. विशिष्टबुद्धि म्हणजे विशिष्टज्ञान व पूर्वी सांगितलेलें सविकल्पक ज्ञान हीं एकच होत. सविकल्पक ज्ञानांत विशेषण व विशेष्य असलेंच पाहिजे. टाच्या सविकल्पक ज्ञानांतही घटत्व हें विशेषण व घट हें विशेष्य आहेच. पण टाचा व चक्षूचा संयोग होतांच हें ज्ञान होत नाहीं. कारण सविकल्पक म्हजे विशिष्टज्ञान आहे. परंतु विशेषणाच्या ज्ञानाशिवाय त्या विशेषणानें विशिष्टाचें ज्ञान होणें शक्य नाहीं. म्हणून मध्यें निर्विकल्पक ज्ञान मानिलें आहे. निर्विकल्पकांत घट व घटत्वाचें सामान्य ज्ञान जरी झालें तरी घट हा घटत्वानें वैशिष्ट आहे असें ज्ञान होत नाहीं.

नित्येवं ध्वंसप्रतियोगिनोः कार्यकारणभावः । तथा च ध्वंसनिष्ठकार्यतानिरूपिता यानुभवनिष्ठा कारणता तस्यां प्रतियोगित्वमवच्छेदकं तत्तद्व्यक्तित्वं च । न त्वनुभवत्वमपीति सिद्धान्तः । एवं चानुभवत्वावच्छिन्नकारणतानिरूपितकार्यताश्रयत्वरूपानुभवजन्यत्वविरहेणैवातिव्याप्तिवारणसंभवात्कृतं स्मृतिहेतुत्वविशेषणेनेति चेत् । न । स्मृतावतिव्याप्तिवारणार्थेव तद्विशेषणप्रवेशात् । तथाहि—स्मृतिं प्रत्यनुभव एव कारणं न तु स्मृतिरप्यतो घटस्मृतित्वावच्छिन्नं प्रति घटानुभवस्य घटानुभवत्वेनैव कारणत्वं न तु घटज्ञानत्वेन । इत्थं चानुभवत्वावच्छिन्नकारणतानिरूपितकार्यताश्रयत्वस्य स्मृतौ विद्यमानत्वात्तत्रातिव्याप्तिः । उक्तविशेषणोपादाने तु नहि स्मृतिः स्मृतिहेतुर्भवतीति तद्व्युदासः ॥

(न्या० भा०)—'संस्कार' इत्यादि ग्रंथानें संस्काराचा विभाग करितात. 'अनुभव०'इत्यादिकांनीं भावनेचें लक्षण करितात. अनुभवापासून उत्पन्न होणारी असून जी स्मृतीला कारण होते, ती भावना होय. असें भावनेचें लक्षण झालें. येथें 'अनुभवजन्यत्व' हें विशेषण जर दिलें नाहीं, व केवळ 'स्मृतिहेतुत्व' हेंच भावनेचें लक्षण केलें तर आत्मा व मन यांच्या संयोगावर अतिव्याप्ति जाते. कारण, हा संयोग सर्वच ज्ञानांचें असमवायिकरण असल्यानें स्मृतीलाही कारण आहेच, म्हणून 'अनुभवजन्य' असें विशेषण दिलें आहे. आत्मा व मन यांचा संयोग जरी स्मृतीला कारण असला तरीसुद्धां तो अनुभवापासून उत्पन्न होत नसल्यानें अतिव्याप्ति नाहीं. 'जी अनुभवजन्य तीच भावना' म्हटल्यास अनुभवाचा ध्वंस देखील अनुभवापासूनच होत असल्यामुळें त्यावर या लक्षणाची अतिव्याप्ति जाते, कारण, ध्वंसाला प्रतियोगी हा कारण असल्यामुळें अनुभवाच्या ध्वंसाला सुद्धां अनुभवरूपी प्रतियोगी कारण आहे, म्हणून 'स्मृतिहेतु' असें म्हटलें आहे. त्यामुळें अनुभवाचा ध्वंस, स्मृतिला कारण नसल्यामुळें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. अहो पण 'विशिष्ट

---

१. विशिष्टबुद्धि म्हणजे विशिष्टज्ञान व पूर्वी सांगितलेलें सविकल्पक ज्ञान हीं एकच होत. सविकल्पक ज्ञानांत विशेषण व विशेष्य असलेंच पाहिजे. घटाच्या सविकल्पक ज्ञानांतही घटत्व हें विशेषण व घट हें विशेष्य आहेच. पण घटाचा व चक्षूचा संयोग होतांच हें ज्ञान होत नाहीं. कारण सविकल्पक म्हणजे विशिष्टज्ञान आहे. परंतु विशेषणाच्या ज्ञानाशिवाय त्या विशेषणानें विशिष्टाचें ज्ञान होणें शक्य नाहीं. म्हणून मध्यें निर्विकल्पक ज्ञान मानिलें आहे. निर्विकल्पकांत घट व घटत्वाचें सामान्य ज्ञान जरी झालें तरी घट हा घटत्वानें विशिष्ट आहे असें ज्ञान होत नाहीं.

बुद्धीला विशेषणाचें ज्ञान कारण असतें, हें सगळ्या शास्त्रकारांच्या मतानें सिद्ध आहे. जसें दंडविशिष्ट बुद्धीला दंड या विशेषणाचें ज्ञान असलें पाहिजे. दंडविशिष्ट बुद्धि म्हणजे ज्यांत दंड हा प्रकार आहे असें ज्ञान. अर्थात् दंडप्रकारकबुद्धित्वानें अवच्छिन्न असलेल्या बुद्धीला दंड ज्ञानत्वानें तें दंडज्ञान कारण आहे असें प्राप्त झालें. दंडप्रकारक बुद्धि म्हणजे 'दंडी पुरुषः' अशी बुद्धि होय. येथें दंडज्ञान हें कारण आहे, ज्याला दंड माहीत नाहीं अशा पुरुषाला 'दंडी पुरुषः' असें ज्ञान केव्हांही होत नाहीं. म्हणून जेथें 'हा दंड' असें प्रत्यक्ष झालें, व त्यानंतर 'दंडी पुरुषः' असें प्रत्यक्षज्ञान उत्पन्न झालें, तेथें या प्रत्यक्षावर भावनालक्षणाची अतिव्याप्ति जाते. कारण हें प्रत्यक्ष होण्याच्या अव्यवहित पूर्वक्षणींच उत्पन्न झालेल्या दंडज्ञानरूपी अनुभवापासून तें झालेलें असून, पुढें होणाऱ्या 'दंडी पुरुषः' अशा स्मरणाला कारण होणारें आहे, कारण स्मृतीला अनुभवच हेतु आहे. म्हणून 'अनुभवापासून उत्पन्न होणारें असून, स्मरणाला कारण होणें' हें भावनेचें लक्षण वर सांगितलेल्या 'दंडी पुरुषः' या अनुभवावर येत असल्यामुळें अतिव्याप्ति येते, असें जर म्हणाल तर त्याविषयीं आम्ही असें म्हणतों कीं, 'अनुभवजन्य' म्हणजे 'अनुभवावर असणाऱ्या कारणतेनें दाखविलेली जी कार्यता तिला आश्रय असणें' हें होय व ही कारणता 'अनुभवत्वानें अवच्छिन्न असली पाहिजे' असाही त्यांत निवेश करितों, म्हणजे अनुभवत्वानें अवच्छिन्न (ज्ञानत्वानें नव्हे) जी अनुभवावर असणारी कारणता तिनें दाखविलेली जी कार्यता तिला जें आश्रय असतें, तें 'अनुभवजन्य' होय, असा याचा निष्कर्ष निघतो. त्यामुळें वरील अतिव्याप्ति येत नाहीं. ती अशी कीं– जिच्यांत दंड हा प्रकार आहे अशा बुद्धित्वानें अवच्छिन्न झालेल्या बुद्धीवर असणाऱ्या कार्यतेनें दाखविलेली जी दंडाच्या ज्ञानावर असणारी कारणता, हिचें दंडानुभवत्व हें अवच्छेदक होत नाहीं. (दंडज्ञानत्व हें त्याचें अवच्छेदक होतें) कारण दंडाच्या अनुभवाप्रमाणें दंडाच्या स्मरणापासूनसुद्धां दंडप्रकारक बुद्धि उत्पन्न होऊं शकते. म्हणून जिच्यांत दंड विशेषण आहे अशा बुद्धीला अनुभव व

स्मरण या दोघांचाही ज्यांत समावेश होतो असें दंडज्ञानच दंड-ज्ञानत्वेंकरून कारण म्हणून स्वीकारल्यामुळें, दंड ज्ञानत्व हेंच त्या कारणतेचें अवच्छेदक आहे. म्हणून अनुभवत्वानें अवच्छिन्न अशा-कारणतेनें दाखविलेल्या कार्यतेचा आश्रय प्रत्यक्ष होत नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. पण भावनेवर हें लक्षण जातें, कसें तें पहा—अनुभवापासूनच भावनानांवाचा संस्कार उत्पन्न होतो, म्हणजे भावना त्वानें अवच्छिन्न अशा भावनेला अनुभव अनुभवत्वानेंच कारण होतो. यास्तव भावनात्वानें अवच्छिन्न अशा भावनेवर असणाऱ्या कार्यतेनें दाखविलेली जी अनुभवावर असणारी कारणता तिचें अनुभवत्व हें अवच्छेदक आहे, म्हणून अनुभवत्वानें अव-च्छिन्न असलेल्या अनुभवावर असणाऱ्या, कारणतेनें दाखविलेल्या कार्यतेला, भावना ही आश्रय होत असल्यामुळें अतिव्याप्ति नाहीं.

' अहो पण अनुभवजन्य ' याचा असा अर्थ केल्यास, ' स्मृतीला हेतु ' हें विशेषण व्यर्थ होऊं लागेल म्हणून म्हणाल तर तसें नाहीं. कारण पूर्वी अनुभवध्वंसावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण कर-ण्यासाठीं तें घातलें होतें, पण आतां म्हणजे अनुभवजन्य याचा वरील-प्रमाणें अर्थ केल्यानें अनुभवध्वंसावर अतिव्याप्ति जातच नाहीं. ती अशी कीं ध्वंसत्वानें अवच्छिन्न अशा ध्वंसाचा प्रतियोगी, प्रतियोगित्वरू-पानें कारण आहे. त्या त्या ध्वंसत्वानें अवच्छिन्न अशा ध्वंसाला, ती ती प्रतियोगी व्यक्ति त्या त्या व्यक्तित्वरूपानें कारण आहे, अशा री-तीनें ध्वंस व त्याचा प्रतियोगी यांचा कार्यकारणभाव आहे. एकं-दरीत, ध्वंसावर असणाऱ्या कार्यतेनें दाखविलेली जी अनुभवावर असणारी कारणता तिचें अवच्छेदक प्रतियोगित्व होतें, किंवा तें तें व्यक्तित्व होतें, अनुभवत्व होत नाहीं, असा सिद्धांत आहे. मग असें जर आहे तर, अनुभवत्वानें अवच्छिन्न जो अनुभव त्यावर असणाऱ्या कारणतेनें दाखविलेली जी कार्यता तिचें आश्रयत्वरूपी जें अनुभव-जन्यत्व ते या ध्वंसावर नसल्यामुळेंच अनुभवध्वंसावरील अतिव्याप्ति दूर होत असतां ' स्मृतीचें हेतुत्व ' हें विशेषण देऊन काय कराव-याचें आहे ? असें जर म्हणाल तर स्मृतीवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं तें विशेषण लक्षणांत पाहिजेच आहे. ती अति-

जाति ज्याच्यावर आहे त्याला स्थितिस्थापक म्हणतात. 'पृथ्वीवर समवायसंबंधानें राहणारा व जो जातिमान् असतो तो स्थिति-स्थापक' असें म्हटल्यास गंधत्व घेऊन या लक्षणाची गंधावर अतिव्याप्ति जाते, कारण गंध देखील पृथ्वीवर समवायसंबधानें राह-णारा असून गंधत्व या जातीनें युक्त आहे म्हणून त्यावर अतिव्याप्ति न जावी यासाठी 'संस्कारत्वानें व्याप्यजातिमान्' असें म्हणावें, म्हणजे गंधत्व ही जाति संस्कारत्वानें व्याप्य नसल्यामुळें व संस्कारत्वव्याप्य जा-तीनें गंधयुक्त नसल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति होत नाहीं. आतां 'संस्का-रत्वानें व्याप्यजाति ज्यावर असते त्यास स्थितिस्थापक' म्हटल्यास भावनेवर अतिव्याप्ति जाते. कारण, भावनात्व ही जाति संस्कार-त्वानें व्याप्य आहे व ती ज्या भावनेवर राहते, तिचेवर स्थिति-स्थापकाचें लक्षण जातें. त्याचें निवारण करण्याकरितां 'पृथ्वीसम-वेत' म्हणावें. म्हणजे भावनात्व जाति, पृथ्वीवर समवायसंबधानें राहत नसल्यामुळें तिचेवर अतिव्याप्ति जाणार नाहीं. स्थितिस्थापक व रूप यांचें अन्यतरत्व घेऊन म्हणजे या दोघांवर असणारा एक धर्म घेऊन रूपावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'जाति' असें म्हणावें. अन्यतरत्व हा धर्म, जाति नसल्यानें त्यानें युक्त रूपावर अतिव्याप्ति नाहीं. 'द्रव्य व कर्म यांहून भिन्न असून ज्यावर सामान्य ( जाति ) राहते त्यास गुण' असें म्हणतात. 'जो सामान्यवान् असतो त्यास गुण' असें म्हटल्यास द्रव्य व कर्म यांव-रही सामान्य रहात असल्यामुळें त्यांचेवर अतिव्याप्ति जाते. तिचें निवारण करण्यास्तव 'द्रव्य व कर्म यांहून भिन्न' हें विशेषण दिलें आहे. हें स्वतःहूनच भिन्न नसल्यामुळें अतिव्याप्ति नाहीं. 'द्रव्य व कर्म यांहून भिन्न पदार्थास गुण' म्हटल्यास सामान्य इत्यादिकही द्रव्य-कर्माहून भिन्न असल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जाते, ती न जावी म्हणून 'सामान्यवान्' हें विशेष्य दिलें आहे. सामान्यादिकांवर सामान्य ( जाती ) रहात नसल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति होत नाहीं.

चलनात्मकं कर्म । ऊर्ध्वदेशसंयोगहेतुरुत्क्षेपणम् । अधो-देशसंयोगहेतुरपक्षेपणम् । शरीरस्य संनिकृष्टसंयोगहेतु-राकुञ्चनम् । विप्रकृष्टसंयोगहेतुः प्रसारणम् । अन्यत्सर्वं गमनम् ॥

( द० भा० )–जें चलनात्मक असतें तें कर्म होय. त्याचे उत्क्षेपण, अपक्षेपण, आकुंचन, प्रसारण, आणि गमन असे पांच भेद आहेत. उर्ध्व देशाशीं ( वरील बाजूच्या स्थलविशेषाशीं ) संयोग होण्याला जें कर्म कारण होतें, तें उत्क्षेपण होय. अधोदेशाशीं संयोग होण्याला कारण होणारें कर्म अपक्षेपण होय. आपल्या शरीराच्या संनिध असणाऱ्या वस्तूशीं संयोग होण्याला कारण होणाऱ्या कर्मास आकुंचन ह्मणतात. आपल्या शरीरापासून दूर असणाऱ्या वस्तूशीं संयोग होण्याला कारण होणारें कर्म तें प्रसारण होय व याहून बाकी राहिलेलें सर्व प्रकारचें जें कर्म तें गमन होय. ( कर्म हें पृथ्वी, जल, तेज, वायु, आणि मन यांवर मात्र राहतें.

( प० ) चलनेति । संयोगभिन्नत्वे सति संयोगासमवायिकारणं कर्म । हस्तपुस्तकसंयोगवारणाय सत्यन्तम् । घटादिवारणाय विशेष्यदलम् । ऊर्ध्वेति । अपक्षेपणवारणाय ऊर्ध्वेति । कालादिवारणाय असाधारणेत्यपि बोध्यम् । अधोदेशेति । उत्क्षेपणवारणाय अधोदेशेति । कालादिवारणाय असाधारणेत्यपि देयम् । शरीरेति । प्रसारणादिवारणाय शरीरसंनिकृष्टेति । कालादिवारणाय असाधारण देयम् । विप्रकृष्टेति । उत्क्षेपणादिवारणाय विप्रकृष्टेति । कालादिवारणाय असाधारणमप्यावश्यकम् ॥

( प० भा० )–जें संयोगाहून भिन्न असून संयोगाचें असमवायि कारण असतें त्यास कर्म असें ह्मणतात. हस्त व पुस्तक यांच्या संयोगावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' संयोगाहून वेगळें असून ' अशा अर्थाचें मुळांतील ' सति ' शब्दापर्यंतचें पद दिलें पाहिजे. तें न दिल्यास हा संयोग शरीर व पुस्तक यांच्या संयोगाचें असमवायि कारण असल्यानें त्यावर कर्माच्या लक्षणाची अतिव्याप्ति जाऊं लागेल. पण हस्तपुस्तकसंयोग हा संयोगाहून वेगळा नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति नाहीं. आतां ' जें संयोगाहून वेगळें त्यासकर्म ' असें म्हटल्यास घटादिक वस्तूही संयोगाहून वेगळ्या असल्यामुळें त्याचेवर अतिव्याप्ति जाते. तिचें निवारण करण्यासाठीं ' संयोगाचें असमवायिकारण ' असें म्हणावें. म्हणजे घटादिक संयोगाचें असमवायिकारण नसल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जात नाहीं, याकरितां हें विशेष्य दल आहे. केव्हांही गुण व कर्मच असमवायिकारण होत असतें. द्रव्य असमवायिकारण होत

म्हणून घटादिक असमवायिकारण होत नाहींत. ‘ देशाच्या संयोगाला जें कारण होतें तें उत्क्षेपण ’ असें म्हटल्यास, खालच्या देशाच्या संयोगाला कारण होणाऱ्या अपक्षेपणावर लक्षण जातें, म्हणून ‘ वरच्या देशाच्या ’ असें म्हणावें. अपक्षेपण वरच्या देशाच्या संयोगाला कारण नसल्यानें, त्यावर अतिव्याप्ति नाहीं. आतां कालादिक वरच्या देशाच्या संयोगाचेंही कारण होत असल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जाते, ती न जावी यासाठीं ‘ असाधारण ’ असेंही पद द्यावें. काल साधारण कारण आहे, तो असाधारण नसल्यानें अतिव्याप्ति नाहीं. ‘ जें संयोगाला कारण तें आकुंचन ’ म्हटल्यास प्रसारणादिकही लांबच्या देशाच्या संयोगाला कारण होत असल्यानें, त्यांचेवर अतिव्याप्ति जाते, ती न जावी या साठीं ‘ शरीराच्या जवळच्या देशाच्या संयोगाला ’ असें म्हणावें, म्हणजे प्रसारणादिक शरीराच्या समीपदेशाच्या संयोगाचें कारण नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति नाहीं. शरीराच्या समीप देशाशीं संयोग होण्यास कालादिकही कारण असल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति न जावी म्हणून ‘ असाधारण ’ असें म्हणावें. काल साधारण कारण असल्यामुळें त्याचेवर अतिव्याप्ति नाहीं. ‘ जें संयोगाचें कारण त्यास प्रसारण ’ म्हटल्यास उत्क्षेपणादिकही वरील देशाच्या संयोगाला कारण असल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति न जावी म्हणून ‘ दूर देशाच्या ’ असें म्हटलें आहे. उत्क्षेपणादिक, दूर देशाच्या संयोगाला कारण नसल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति नाहीं. आतां दूर देशाच्या संयोगाचें कालादिक कारण असल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं ‘ असाधारण’ हें पद अवश्य दिलें पाहिजे.

नित्यमेकमनेकानुगतं सामान्यम्। द्रव्यगुणकर्मवृत्ति।
पर सत्ता। अपर द्रव्यत्वादि ॥

( व० भा० )–जें नित्य, एक आणि अनेकानुगत असतें, तें सामान्य होय. तें द्रव्य, गुण, आणि कर्म यांच्यावर राहतें. पर आणि अपर असें तें दोन प्रकारचें आहे. सत्ता हें परसामान्य होय व द्रव्यत्वादिक अपर सामान्य होय.

( न्या० ) सामान्यं निरूपयति–नित्यमेकमिति। नित्यत्वे सत्यनेकसमवेतत्वं सामान्यलक्षणम्। नित्यत्वविशेषणानुपादानेऽनेकसमवेतत्वस्य संयोगादौ सत्त्वा-

तत्रातिव्याप्तिरुद्धारणाय नित्यत्वविशेषणम्। अनेकसमवेतत्वानुपादाने नित्यत्वमात्रोपादाने आकाशादावतिव्याप्तिरुद्धारणायानेकसमवेतत्वम्। अनेकसमवेतत्वानुपादाने नित्यत्वविशिष्टसमवेतत्वमात्रोक्तावाकाशगतैकत्वपरिमाणादौ जलपरमाणुगतरूपादौ चातिव्याप्तिः। जलपरमाणुगतरूपादेराकाशगतैकत्वपरिमाणादेर्नित्यत्वात् समवेतत्वाच्च। अतः अनेकेति समवेतविशेषणम्॥

( न्या० भा० )–'नित्यमेकं०' यानें सामान्याचें निरूपण करितात. जें नित्य व एक असून अनेकांवर समवायसंबंधानें राहतें त्यास सामान्य म्हणतात. येथें ' नित्य ' हें विशेषण न घेतल्यास अनेकावर समवायसंबंधानें राहणाऱ्या संयोगादिकावर अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं ' नित्य ' हें विशेषण द्यावें. म्हणजे संयोगादिक हे एक व अनेकांवर जरी समवेत असले तरी नित्य नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति नाहीं. ' अनेकावर समवायसंबंधानें राहणारें ' हें पद न घेतल्यास व जें एक व नित्य असतें तें सामान्य असें म्हटल्यास आकाशादिकही एक व नित्य असल्यानें त्याच्यावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' अनेकांवर समवायसंबंधानें राहणारें ' असें म्हणावें म्हणजे आकाश हें अनेकांवर समवायसंबंधानें राहणारें नसल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति नाहीं. तसेंच 'अनेक समवेतत्व ' हें विशेषण न दिल्यास व ' जें नित्य आणि समवेत असतें त्यास सामान्य ' असें म्हटल्यास आकाशावरील एकत्व या परिमाणावर आणि जलपरमाणूंच्या रूपावर अतिव्याप्ति जाते. कारण तें परिमाण व परमाणुरूप हीं नित्य असून समवेतही आहेत. यास्तव ' अनेकांवर समवायसंबंधानें राहणारें ' असें म्हणावें. म्हणजे आकाशावरील एकत्व परिमाण समवायसंबंधानें अनेकावर राहत नसल्यामुळें व परमाणूचें रूपही अनेकावर समवायसंबंधानें राहणारें नसल्यामुळें त्याच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. तात्पर्य जलपरमाणूवरचें रूप व आकाशावरील एकत्व हें परिमाण नित्य व समवेत आहे म्हणून अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं 'अनेक' असें ' समवेताला ' विशेषण दिलें आहे.

( प० ) नित्यमिति। संयोगादिवारणाय नित्यमिति। कालादिपरिमाणवारणाय अनेकेति। अनेकानुगतत्वं च समवायेन बोध्यम्। तेन नात्यन्ताभावेऽतिव्याप्तिः॥

( प० भा० )–संयोगादिकांवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' नित्य ' असें म्हणावें. संयोगादिक नित्य नाहींत ( तो अनित्य संबंध आहे ) म्हणून अतिव्याप्ति नाहीं. आतां कालादिकांच्या नित्य परिमाणावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठींच ' अनेक ' असें म्हणावें. तें परिमाण जरी एक, नित्य व समवेत असलें तरी अनेकांवर समवायसंबंधानें राहणारें नसल्यामुळें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. ( कारण तें कालादि एकावरच राहतें ). ' अनेकावर अनुगत असणें ' याचा अर्थ ' समवायसंबंधानें अनुगत असणें ' असा आहे असें समजावें. म्हणजे अत्यन्ताभाव जरी अनेकांवर अनुगत असला तरी तो समवायसंबंधानें नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. ( नाहीं तर तोही एक, नित्य, व अनेकानुगत आहेच. )

नित्यद्रव्यवृत्तयो व्यावर्तका विशेषाः ॥

( त० भा० )–ज्यांच्यायोगानें नित्यद्रव्यामध्यें परस्पर भेद उत्पन्न होतो ते विशेष होत. ते नित्यद्रव्यावर राहतात.

( प० ) नित्यद्रव्यवृत्तय इति । घटत्वादिवारणाय नित्यद्रव्यवृत्तय इति । आत्मत्वमनस्त्ववारणाय आत्मत्वमनस्त्वभिन्ना इत्यपि बोध्यम् ॥

( प० भा० )–जे भेदक असतात त्यांस विशेष म्हटल्यास घटत्वादिक धर्मही घटादिद्रव्यांना बाकीच्या वस्तूंपासून पृथक् करून दाखविणारे असल्यामुळें त्यांचेवर विशेषलक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी म्हणून ' नित्यद्रव्यावर राहणारे ' असें म्हणावें. घटत्वादिक नित्यद्रव्यावर रहाणारे नसल्यानें त्यांच्यावर अतिव्याप्ति जात नाहीं. आतां नित्यद्रव्यावर राहणारे, व व्यावर्तक आत्मत्व व मनस्त्वही आहे. त्यामुळें त्यांवर विशेषलक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी यासाठीं ' आत्मत्व व मनस्त्व यांहून भिन्न ' असें म्हणावें. म्हणजे ते धर्म स्वतःहून भिन्न नसल्यानें त्यांचेवर अतिव्याप्ति जाणार नाहीं.

नित्यसंबन्धः समवायः । अयुतसिद्धवृत्तिः । ययोर्द्वयोर्मध्ये एकमविनश्यदवस्थमपराश्रितमेवावतिष्ठते तावयुतसिद्धौ । यथा अवयवावयविनौ गुणगुणिनौ क्रियाक्रियावन्तौ जातिव्यक्ती विशेषनित्यद्रव्ये चेति ॥

(त० भा०)—समवाय म्हणजे नित्यसंबंध होय. तो अयुतसिद्धांच्या ठिकाणीं राहतो. ज्या दोहोंपैकीं एक विनाश पावेपर्यंत दुसऱ्याचा आश्रय करूनच राहतो, ते दोन्ही अयुतसिद्ध होत. जसें–अवयव आणि अवयवी, गुण आणि गुणी, क्रिया आणि क्रियावान्, जाति आणि व्यक्ति, व विशेष आणि नित्यद्रव्यें, हीं अयुतसिद्ध आहेत.

(न्या०) समवायं निरूपयति–नित्येति। संबन्धत्वं विशिष्टप्रतीतिनियामकत्वम्। तावन्मात्रोक्तौ संयोगेऽतिव्याप्तिरतो नित्य इति विशेषणम्। (ययोर्द्वयोर्मध्ये इति। यन्निष्ठकालनिरूपिताधेयतासामान्यं यदवच्छिन्नं तदुभयान्यतरत्वमयुतसिद्धत्वमित्यर्थः॥)

(न्या० भा०)–' नित्यद्रव्य०' यानें समवायाचें निरूपण करितात. विशिष्टाचें ज्ञान होण्याला जो कारण त्यास संबंध म्हणतात. पण ' संबंध ' हेंच समवायाचें लक्षण केल्यास, संयोगसुद्धां तसाच संबंध असल्यानें त्यावर समवायाच्या लक्षणाची अतिव्याप्ति जाते. ती न जावी म्हणून ' नित्य ' असें विशेषण दिलें आहे. म्हणजे संयोगसंबंध नित्य नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति जात नाहीं.

(प०) नित्येति। आकाशादिवारणाय संबन्ध इति। संयोगवारणाय नित्येति। स्वरूपसंबन्धवारणाय तद्भिन्न इत्यपि बोध्यम्॥

(प० भा०)–' जो नित्य असतो तो समवाय ' असें म्हटल्यास आकाशादिकही नित्य असल्यानें[1] त्याचेवर समवायलक्षणाची अतिव्याप्ति जाऊं नये म्हणून ' संबंध ' असें म्हणावें. आकाशादिक संबंध नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. आतां जो ' संबंध ' असतो त्यास समवाय म्हटल्यास संयोगही संबंध असल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति न जावी म्हणून ' नित्य ' असें म्हणावें. म्हणजे तो नित्यसंबंध नसल्यामुळें त्यावर अतिव्याप्ति जाणार नाहीं. आतां स्वरूपसंबंध हा नित्यसंबंध असल्यामुळें त्याचेवर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं ' स्वरूपसंबंधाहून भिन्न असून जो नित्यसंबंध असतो तो समवाय ' असें समवायसंबंधाचें लक्षण करावें. म्हणजे स्वरूपसंबंध हा स्वतःहून भिन्न नसल्यानें त्यावर अतिव्याप्ति नाहीं, असें समजावें.

---

[1] नैयायिक समवायसंबंध प्रत्यक्ष मानितात व वैशेषिक अप्रत्यक्ष मानितात.

म्हणजे ध्वंस हा प्रागभावाचा प्रतियोगीच असतो अप्रतियोगी अस नाहीं. ह्मणून त्यावर अतिव्याप्ति नाहीं. ध्वंसाचा प्रागभाव आ म्हणूनच तो त्याचा प्रतियोगी होतो. असेंच प्रागभावाचा अप्रति योगी असून अन्योन्याभावाहून वेगळा असून ज्याच्यावर अभाव येतें त्यास अत्यंताभाव म्हटल्यास प्रागभाव हा सुद्धां प्रागभावाचे अप्रतियोगीच आहे. कारण प्रागभावाचा पुनः दुसरा प्रागभा नाहीं, व तो अन्योन्याभावाहून भिन्न असून अभावही आहे, म्हणू अत्यंताभावाचें लक्षण प्रागभावावर जातें, तें न जावें यासा ' ध्वंसाचा अप्रतियोगी असला पाहिजे ' असें म्हटलें आहे. म्हण प्रागभावाचा नाश होत असल्यामुळें तो ध्वंसाचा प्रतियोगीच होते अप्रतियोगी होत नाहीं, म्हणून त्यावर अतिव्याप्ति नाहीं. आ ' प्रागभावाचा अप्रतियोगी असून ध्वंसाचा अप्रतियोगी अस ज्याच्यावर अभावत्व येतें तो अत्यंताभाव ' एवढेंच लक्षण केल्या अन्योन्याभावसुद्धां प्रागभावाचा अप्रतियोगी आहे व ध्वंसाचा अप्रतियोगी आहे व त्याच्यावर अभावत्वही आहे. म्हणून त्याव अतिव्याप्ति जाते. ती न जाण्यासाठीं ' अन्योन्याभावाहून भिन्न असें पद घालावें, म्हणजे अन्योन्याभाव हा अन्योन्याभावाहून वेगळ नसल्यानें त्याचेवर अतिव्याप्ति नाहीं. आतां प्रागभावाचा अप्रति योगी असून व ध्वंसाचा अप्रतियोगी असून जो अन्योन्याभावाहू भिन्न असतो तो अत्यंताभाव असें म्हटल्यास आकाशसुद्धां नि असल्यानें प्रागभावाचें अप्रतियोगी आहे, व ध्वंसाचेंही प्रतियो नाहीं, आणि अन्योन्याभावाहून भिन्नही आहे, ह्मणून त्यावर अत्यंत भावाचें लक्षण जातें, तें न जावें यासाठीं ' तो अभाव ' अस पाहिजे असें ह्मणावें. म्हणजे आकाशादिकावर अभावत्व नसल्या त्याचेवर अत्यंताभावाच्या लक्षणाची अतिव्याप्ति जात नाहीं. वास्त विक तादात्म्यसंबंधाहून भिन्न अशा संबंधानें ज्याची प्रतियोगि अवच्छिन्न असते त्यास संसर्गाभाव म्हणतात ध्वंस व प्रागभा यांची प्रतियोगिता संसर्गावच्छिन्न नसल्यानें संसर्गावच्छिन्न म्ह ण्यानेंच त्यांच्यावरील अतिव्याप्ति दूर होते. तिचें निवारण करण्य

ठी 'त्रैकालिक' हें वेगळें पद घालण्याचें कारण नव्हतें. पण तें यंताभावाचें स्वरूप दाखविण्याकरितां घातलें आहे, असें समजावें.

(प० ) अत्यन्ताभावं लक्षयति–त्रैकालिकेति । त्रैकालिकत्वे सति संसर्गा-च्छिन्नप्रतियोगिताकोऽत्यन्ताभावः । ध्वंसप्रागभाववारणाय त्रैकालिकेति । वारणाय संसर्गेत्यादि ॥

(प० भा० )–'त्रैकालिक०' यानें अत्यन्ताभावाचें लक्षण रितात. त्रैकालिक असून ज्याची प्रतियोगिता संसर्गावच्छिन्न सते अशा अभावास अत्यन्ताभाव म्हणतात. आता ध्वंस व गभाव यांची प्रतियोगितासुद्धां संसर्गावच्छिन्न असल्यानें त्याचेवर तिव्याप्ति जाऊं लागेल ती न जावी याकरिता 'त्रैकालिक' हणजे 'तीन्ही काळीं असणारा' असें म्हटलें आहे. ध्वंस व प्राग-भाव हे तीन्ही काळीं नसल्यामुळें त्याचेवर अतिव्याप्ति जात नाहीं. म्हणजे प्रागभाव हा आपला ध्वंस झाल्यावर असत नाहीं व ध्वंस आपल्या प्रागभावकाळीं नसतो, म्हणून ते त्रैकालिक नव्हेत. भेदावर जाणाऱ्या अतिव्याप्तीचें निवारण करण्यासाठीं 'संसर्ग' असें म्हटलें आहे.

तादात्म्यसंबन्धावच्छिन्नप्रतियोगिताकोऽन्योन्याभावः । यथा घटः पटो नेति ॥

(त० भा० )–ज्याचा प्रतियोगी तादात्म्यसंबंधानें अवच्छिन्न असतो त्यास अन्योन्याभाव म्हणतात. घट हा पट नव्हे हें अन्यो-न्याभावाचें उदाहरण आहे.

(न्या० ) अन्योन्याभावं निरूपयति–तादात्म्येति ॥

(न्या० भा० )–'तादात्म्य०' यानें अन्योन्याभावाचें निरूपण करितात.

(प० ) अन्योन्याभावं लक्षयति–तादात्म्येति । प्रागभावप्रध्वंसाभाववार-णाय तादात्म्येति । अत्यन्ताभाववारणाय तादात्म्यत्वेन संबन्धो विशेषणीयः ॥

(प० भा०)–प्रागभाव व प्रध्वंसाभाव यावर अतिव्याप्ति जाऊं नये म्हणून 'तादात्म्यसंबंधानें' असें म्हटलें आहे. नाहीं तर प्राग-भाव व प्रध्वंसाभाव याची प्रतियोगिता देखील कोणत्या तरी संबं-धानें ( संयोग अगर समवायानें ) अवच्छिन्न असते, म्हणून त्याचेवर अन्योन्याभावाचें लक्षण न जावें याकरिता 'तादात्म्यसंबंधानें' असें

ध्वंस प्रागभावाच्या समानकालीन असतो. असमानकालीन असे नाहीं. तेव्हां असें न व्हावें म्हणून 'स्वसमानाधिकरण' प्रागभावाला विशेषण दिलें आहे, हें दिल्यानें आतां वामदेवादिकांचे दुःखध्वंस हा त्यांच्या दुःखाच्या प्रागभावाशीं असमानकालीं असतो समानकालीं असत नाहीं, म्हणजे त्यावेळीं त्यांच्या कोणत्याही दुःखा चा प्रागभाव नसल्यामुळें दुःखाच्या ध्वंसाचा काळ व दुःखप्रागभा वाचा काळ एक होत नाहींत, म्हणून त्यांना मुक्त म्हणण्यास हरकत नाहीं शरीर, सहा इंद्रियें, सहा विषय, सहा बुद्धी, सुख, दुःख हीं एकवीस दुःखें होत. दुःखाला अनुषंगी असल्यानें शरीरादिकांना गौणदुःखत्व आहे. 'मैत्रेयि, आत्म्याला साक्षात् जाणावें, त्याचें श्रवण, मनन, निदिध्यास करावें' अशी श्रुति बृहदारण्यक उपनिषदांत आहे. त्यामुळें आत्मज्ञा नाचीं साधनें अशीं जीं निदिध्यासन व मनन, त्यांचें साधन पदार्थ ज्ञान आहे, असें ओघानेंच प्राप्त होतें. ( कारण पदार्थच जर सम जले नाहींत तर मनन तरी कोणाचें करावयाचें? ) त्यामुळें तत्त्वज्ञान झालें असतां शरीरावर आत्मत्व व पुत्रादिकांवर स्वीयत्व या अभि मानरूपी मिथ्याज्ञानाचा नाश होतो. त्या योगानें दोषांचा अभाव होतो व त्यामुळें प्रवृत्तीची उत्पत्ति होत नाहीं. त्यानंतर त्या काळच्या देहानें किंवा वेगवेगळे देह उत्पन्न करून त्यांच्या योगानें प्रारब्धकर्मांच्या भोगानें किंवा तत्त्वज्ञानानें कर्मांचा नाश होतो. कर्मनाश झाल्यावर जन्माचीच प्राप्ति होत नाहीं. कारण 'नित्य व नैमित्तिक कर्मांनींच पापाचा क्षय करणाऱ्या व ज्ञानाला शुद्ध करणाऱ्या साधकानें वारं वार अभ्यासानें ज्ञानाला पक्क करावें. अभ्यासामुळें ज्याचें ज्ञान परि- पक्क झालें आहे असा मनुष्य कैवल्यास प्राप्त होतो.' इत्यादि वचनें व आत्म्याला जाणून मनुष्य मोक्षाला प्राप्त होतो, अशा श्रुति असल्या- मुळें सगुणोपासना व काशीमध्यें मरण हें सुद्धां तत्त्वज्ञानाच्या द्वाराच मुक्तीला कारण होतें. म्हणूनच 'परमेश्वर काशीमध्यें तारक- मंत्राचा उपदेश करितो' इत्यादि वचनांतीलही हेंच सार होय. असो. चंद्रजसिंह नांवाच्या पुरुषानें इतरांवर उपकार करणारें असें हें शुभ 'पदकृत्य' केलें. त्यास माधव, पूर्ण कृपायुक्त होऊन पाहो. अशा रीतीनें पूज्यगुरु दत्तसिंहाचे शिष्य श्रीचंद्रजसिंह यांनीं केलेली पदकृत्य नांवाची टीका समाप्त झाली.

श्रीकृष्णार्पणमस्तु.